आंतरभारतीय पुस्तकमाला

# बंगाली लघुकथा

संपादक
अरुणकुमार मुखोपाध्याय
अनुवाद
सुमती सरन



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

## अनुक्रमणिका

# प्रस्तावना

भारतीय वाचकांसाठी नॅशनल बुक ट्रस्टने आपली 'आदान-प्रदान' योजना सुरू केली. भारतीय राज्यघटनेने मान्य केलेल्या भारतीय भाषांमधील कथांचे संकलन व विभिन्न भारतीय भाषांमधील त्यांच्या अनुवादाचे कार्य या योजनेनुसार हाती घेण्यात आले आहे. प्रस्तुत बंगाली कथासंग्रह त्यापैकीच एक होय. या संग्रहातून आपल्या देशकालाच्या मानवाचे व मानवी समाजाचे चित्र पहावयास मिळते.

बंगाली कथेचे पहिले यशस्वी शिल्पकार आहेत- रवींद्रनाथ ठाकूर. त्यांच्याच हस्ते बंगाली कथेची प्राणप्रतिष्ठा झाली, तिचा आश्चर्यकारक विकास झाला. कथेच्या सर्व पैलूंवर त्यांच्या प्रतिभेची छाप उमटलेली दिसते प्रेम, निसर्ग, सामाजिक समस्या, तत्त्वज्ञान, काव्यात्मता, प्रणय, इतिहास, उपहास–इत्यादि सर्व क्षेत्रांत त्यांनी मुक्त विहार केला. १८९० ते १९४० पर्यंतच्या अर्धशतकात ते सतत कथालेखन करीत राहिले.

रवींद्रनाथांनंतर त्रैलोक्यनाथ मुखोपाध्याय, प्रभातकुमार मुखोपाध्याय, शरच्चंद्र चट्टोपाध्याय आणि प्रमथ चौधुरी यांनी आपल्या बहुविध लेखनाने बंगालीचे कथाभांडार समृद्ध केले.

प्रस्तुत कथासंग्रहात आपल्या देशकालाच्या कथाक्षेत्रातील कथांची निवड केलेली आहे. रवींद्रनाथ आणि शरच्चंद्र हे खऱ्या अर्थाने आमच्या काळाचे प्रतिनिधी नाहीत. रवींद्र आणि शरत् नंतरच्या बंगाली कथेत गेल्या चाळीस वर्षांतील बंगाली मनःस्थितीची बहुमुखी अभिव्यक्ती झालेली आहे. म्हणूनच बंगाली कथेचा शरत् नंतरच्या कालापासून ते सांप्रतच्या कालापर्यंत जो कथाविस्तार मिळतो त्यातूनच या कथा निवडलेल्या आहेत.

बंगाली साहित्यात रवींद्रनाथ - शरच्चंद्र यांच्यानंतर लगेच जे युग सुरू होते त्या युगाला कल्लोल युग म्हणतात. १९२३ ते १९३९ हा या युगाचा कालखंड. 'कल्लोल' आणि 'काळी लेखणी' मंडळांचे कथाकार विश्वव्यापक आर्थिक मंदी व स्वातंत्र्याची चळवळ चालू असूनही ढोबळ मानाने शांतता व स्थैर्याने कथा लिहिण्यात यशस्वी झाले होते. ताराशंकर बंद्योपाध्याय, अचिन्त्यकुमार सेनगुप्त, प्रेमेंद्र मित्र, बुद्धदेव बसु, मणीश घटक (युवनाश्व), प्रबोधकुमार सान्याल, भवानी

मुखोपाध्याय, 'विचित्रा' आणि 'शनिवारेर चिठि'च्या पानांमधून दिसून येणारे विभूतिभूषण बंद्योपाध्याय, माणिक बंद्योपाध्याय, अन्नदाशंकर राय, बनफूल, विभूतिभूषण मुखोपाध्याय, शरदिन्दु बंद्योपाध्याय, रवींद्रनाथ मैत्र, परिमल गोस्वामी, सजनीकांत दास, प्रेमांकुर आतर्थी, सरोजकुमार रायचौधुरी, प्रमथनाथ विशी, गजेंद्रकुमार मित्र, आशापूर्णा देवी, मनोज बसु, विमल मित्र हे सर्व या युगाचे लेखक आहेत. उपरोधिक व विनोदी कथा लिहिणारे परशुराम (राजशेखर बसु) हे देखील याच युगाचे !

कल्लोल परवर्ती युगाच्या नावाने जो कालखंड ओळखला जातो त्याची पूर्व सीमा म्हणजे द्वितीय महायुद्धाचं आगमन आणि उत्तर सीमा म्हणजे स्वातंत्र्यप्राप्ती व देशाची फाळणी (१९३९-४७). दहा वर्षांचा हा लहानसा कालखंड बंगाली समाज व देशाच्या कालांतराचा कालखंड आहे. दुष्काळ, हवाई हल्ले, कन्ट्रोल व रेशन, मिलिटरी सप्लाय व काळाबाजार, समाजजीवनाची अधोगती, अर्थनैतिक विपर्यय, नैतिक मूल्यांची अवनती, दंगे, स्वातंत्र्य, फाळणी व निर्वासितांचे लोंढे- अशा मोठमोठ्या अत्यंत प्रतिकूल घटना या कालखंडात घडल्या आहेत.

या युगात ज्या लेखकांनी कथालेखनास सुरुवात केली त्यांना साहित्य क्षेत्रातील नवजागृतीबरोबरच समाजाला खोलवर ढवळून काढणाऱ्या या सर्व प्रतिकूल घटनांचादेखील प्रत्यक्ष अनुभव मिळाला आहे. या युगातील सामाजिक वातावरण भयंकर अस्वस्थ व प्रक्षुब्ध होतं. या वातावरणाने त्यांचा दृष्टिकोन थोडाफार आहत, तीक्ष्ण आणि वास्तववादी करून टाकला. कल्लोल युगातील रोमँटिकपणा, बोहेमियन मनोभावना आणि निर्बंधमुक्त प्रेम हे या युगातील कथेत आढळत नाही. या युगात आमच्या समाजामध्ये अनेक बदल घडून आले आणि ते देखील अत्यंत जलद गतीने घडले. विनाश आणि पुनर्निर्माण, नित्य नव्या समस्या आणि असामान्य उलथापालथ या सर्वांनी मिळून व्यक्ती आणि समाज यांच्या जीवनात जो एक प्रबळ प्रवाह निर्माण केला त्याने कथाकारालाही खडबडून जागं केलं आणि त्याच्या संवेदनशीलतेची धार तीक्ष्ण केली. प्रचलित विधिनियम शिथिल पडले आहेत, पावलोपावली विस्कळीतपणा आणि अस्वाभाविकपणा दिसू लागला आहे, कित्येक प्रकारच्या सूक्ष्म अतृप्तींनी मानव पीडला आहे, नव्या रुचीच्या आकांक्षेत कुणास ठाऊक किती रुचिविकार व्यक्त झाले आहेत, नव्या नव्या शपथा आणि उद्दिष्टांनी जीवनसंघर्ष नवी रूपे धारण करीत आहे. युद्धपूर्व काळात या सर्वांची कल्पनादेखील अशक्य होती. युद्ध हा एक भयंकर भूकंप होता. त्याच्या परिणामी संस्कृतीची आवरणं, नीतीचे रक्षक कवच, कौटुंबिक मानमर्यादा, माया-ममता, अनुगमन - अनुशीलन आणि धर्मसंस्कार हे सर्व उध्वस्त झाले. याच विनाशातून ऐकू येते नवसमाजाच्या निर्मितीचे स्वप्न आणि प्रतिबद्धतेचे स्वर.

या सर्व परिवर्तनाचे प्रतिबिंब ज्यांच्या कथांमधून उमटते ते लेखक आहेत-

सुबोध घोष, सतीनाथ भादुडी, संतोषकुमार घोष. नारायण गंगोपाध्याय, नरेंद्रनाथ मित्र, नवेंदु घोष, ननी भौमिक, सुशील जाना आणि ज्योतिरिंद्र नंदी. यांच्या-बरोबरच ज्या पूर्वागत कथाकारांची नावे उल्लेखनीय आहेत ते आहेत कल्लोल युगाचे- जगदीश गुप्त, माणिक बन्द्योपाध्याय, अचिन्त्यकुमार सेनगुप्त, प्रबोधकुमार सान्याल आणि 'विचित्रा' व 'शनिवारेर चिठि'च्या मंडळाचे विभूतिभूषण बंद्योपाध्याय, ताराशंकर बंद्योपाध्याय, मनोज बसु, सरोजकुमार रायचौधुरी, आशापूर्णा देवी, प्रमथनाथ बिशी, परिमल गोस्वामी, 'बनफूल', बानी राय आणि चारुचंद्र चक्रवर्ती.

या युगानंतर लगेच आले रक्तरंजित स्वातंत्र्य, निर्वासितांचे लोंढे, आणि त्याहीपेक्षा अधिक महत्त्वाचे म्हणजे संपूर्ण सामाजिक समतोलच ढळला. स्वातत्र्याच्या उंबऱ्यावर आशा-आकांक्षा, हर्ष-उल्हास यांचे जे स्वर निनादू लागले होते त्या निर्वासितांच्या व सर्वस्व हरपलेल्यांच्या किंकाळ्यांनी दडपून टाकले. या प्रक्षुब्ध आणि रक्तरंजित मातृभूमीत कथालेखकांचे एक नवीन दल दिसले समरेश बसु, विमल कर, रमापद चौधुरी, सैयद मुस्तफा अली, हरिनारायण चट्टोपाध्याय, प्रभात देव सरकार, शांतिरंजन बंद्योपाध्याय, स्वराज बंद्योपाध्याय, प्राणतोष घटक, सुधीररंजन मुखोपाध्याय, सुशील राय, रंजन, शचींद्रनाथ बंद्योपाध्याय, सुलेखा सान्याल, गौरकिशोर घोष, आशुतोष मुखोपाध्याय, सत्यप्रिय घोष, आशीष बर्मन, अमिय भूषण मजुमदार, कमलकुमार मजुमदार, गौरीशंकर भट्टाचार्य, दीपक चौधुरी, महश्वेतादेवी इत्यादी.

या युगाचे कथाकार आपल्या पूर्वीच्या अगदी लगतच्या युगातील कथाकारांचे सहप्रवासी आहेत. या दोन युगातील कथालेखकांना सहसा वेगळे करून पाहता येत नाही. नरेंद्रनाथ मित्र, नारायण गंगोपाध्याय, संतोषकुमार घोष, समरेश बसु, विमल कर, रमापद चौधुरी, नवेंदु घोष, ननी भौमिक, सुशील जाना, शांतिरंजन बंद्योपाध्याय, स्वराज बंद्योपाध्याय, प्राणतोष घटक, आशुतोष मुखोपाध्याय- या सर्वांचा जन्म १९१६ ते १९२२ च्या दरम्यान झालेला आहे. दुसऱ्या महायुद्धाच्या आगमनाच्या वेळी आणि कलकत्ता तसेच बंगालच्या आर्थिक परिवर्तनाच्या गोंधळलेल्या वेळी या सर्वांनी तारुण्यात पदार्पण केले होते. तेव्हापासून आजवर ते सातत्याने लेखन करीत आहेत. समाज व व्यक्ती जीवनातील बहुविध परिवर्तनांना साक्ष असलेल्या यांच्या कथा १९४० ते १९७० पर्यंतच्या या तीस वर्षांत लिहिल्या गेल्या आहेत.

चालू शतकाच्या उत्तरार्धात बंगाली कथेचे आणखी एक युग अवतीर्ण झाले आहे. या युगाच्या तरुण कथाकारांचा जन्म बहुतेक १९३० ते ४० च्या दरम्यान झालेला आहे. खरे म्हणजे हे नव्या पिढीचे लेखक आहेत. सैयद मुस्तफा सिराज, मति नंदी, सुनील गंगोपाध्याय, श्यामल गंगोपाध्याय, बरेन गंगोपाध्याय, शीर्षेन्दु

मुखोपाध्याय, प्रफुल्ल राय, अतीन बंद्योपाध्याय, दिव्येंदु पालित, दीपेंद्रनाथ बंद्योपाध्याय, देवेश राय, संदीपन चट्टोपाध्याय, कविता सिंह, लोकनाथ भट्टाचार्य हे सर्व या युगातील विख्यात लेखक होत.

नव्या पिढीच्या या कथाकारांची आपल्या अगोदरच्या युगाच्या कथाकारांशी काही एक नातं नाही. ही सर्व नव्या दमाची मंडळी आहेत.

यांनी पूर्वीच्या घटना काही पाहिलेल्या नाहीत. यांच्यापाशी वारसदाराची कृतज्ञता वा स्मृती यांचा अभाव आहे. ब्लॅक आउट, दुष्काळ, दंगली आणि रक्तरंजित स्वातंत्र्याच्या लगेच नंतर, उखडलेल्या जनसमूहाच्या काठी वा बाहेर यांचा जन्म झाला आणि तेथेच ते वाढले. पूर्वीच्या लेखकांच्या मते हे सर्व नव्या रक्ताचे लोक आहेत. पूर्वीच्या लेखकांशी यांचा काही संबंध नाही. यांनी वयात येऊन लेखनाला सुरुवात केली तोवर सहजीवनाची सौम्य इमारत पार जमीनदोस्त झाली होती. श्रद्धा-भक्तीच्या गोष्टी या निव्वळ पोपटपंचीसारख्या वाटू लागल्या होत्या. मूळ पाया तोच असला तरी स्त्री-पुरुषांचे संबंध बदलले होते, कुठलीही जुनी मायावी स्मृती उरली नव्हती. कधी कधी एकत्र येऊन वा एकत्र असल्याचं ढोंग करून हे भौतिक जगात राहण्याची तयारी करतात. पण खरे म्हणजे अगदी निस्संग व एकाकी असतात. आणि तरीदेखील नेहमी प्रक्षुब्ध असतात, अनंत विकारांमध्ये आपला प्रतिकार शोधीत असतात; नाहीतर मग स्नायूंच्या तापाने थरथरत असतात.

जुन्या पिढीचे लेखक या तरुण कथाकारांकडे याच नजरेने बघतात. एकमेकांपासून विभक्त झालेल्या दोन बेटांसारखे या दोन पिढ्यांचे कथालेखक आहेत असे वाटते. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळच्या लेखकांची कल्लोल युगाच्या लेखकांशी जितकी मानसिक तफावत व एकमेकांच्या दृष्टिकोनात अंतर होते, त्यापेक्षा या तरुण लेखकांशी दुसऱ्या महायुद्धाच्या वेळच्या लेखकांचे जास्तच अंतर आहे. कल्लोल युगातील रोमँटिसिझम परवर्ती युगात नव्हता; पण जीवनात आनंद होता आणि जीवनमूल्यांवर श्रद्धा होती. सध्याच्या तरुण लेखकांमध्ये ते नाही. या क्षेत्रातील त्यांची कामगिरी, त्यांचे नावीन्य, वेगळेपण हे दुर्बोध व काही काही बाबतीत तर अतर्क्य आहे.

हे वेगळेपण फक्त मानसिक बाबीमध्येच नव्हे तर भाषा व शैलीतही आहे, फक्त मानसिक बाबीमध्येच नव्हे तर भाषा व शैलीतही आहे, फक्त जीवनदृष्टीतच नव्हे तर जीवनाच्या नानाविध उपकरणांच्या अभिनव उपयोगातही आहे.

अशाप्रकारे स्पष्टपणे दिसून येते की फक्त रवींद्रनाथ म्हणजेच काही बंगाली कथेचा चरम उत्कर्षबिंदू नव्हे. बंगाली कथेची वाटचाल सतत पुढे चालू आहे. वेळोवेळी त्यात नवीन वळणे आलेली आहेत. आणि जीवनाकडे नव्या दृष्टीने पाहण्याचा उत्साह कधी कमी झालेला नाही.

ठराविक अटी मान्य करून ठराविक पानांत समाविष्ट होऊ शकतील इतक्या

ठराविक संख्येच्याच कथा निवडण्याच्या बंधनातून मी ज्या काही कथांची निवड करू शकलो त्या सर्वांच्या पसंतीस उतरतीलच असे नाही. मला तरी तशी आशा नाही. पण अनेक अटी व मर्यादा असल्या की नाइलाज होतो. रवींद्र-शरत्-परवर्ती बंगाली कथांची तिन्ही युगे इतकी बहुविध, समृद्ध व वैभवशाली आहेत की कितीही चोखंदळपणे निवड केली तरी समाधान होत नाही. म्हणून वाचकांच्या सहृयतेवर विश्वास ठेवण्याखेरीज मला गत्यंतर नाही.

वंगभाषा व साहित्य विभाग — **अरुणकुमार मुखोपाध्याय**

कलकत्ता विश्वविद्यालय

९-१०-१९७२

# अखेरची गोष्ट

## ताराशंकर बंद्योपाध्याय

भरतपूर तालुका. पूर्वचक्र परगणा. तिथली इस्टेट खूप मोठी आहे. लोक म्हणतात सोन्याची इस्टेट आहे. झाडांची सुपासारखी मोठमोठाली पानं, मुसळासारख्या फांद्या, वाटलेल्या हरिचंदनासारखी मऊ माती – अंगाला लावताच कसं गार वाटतं. पेरणीसाठी बी टाकायचा अवकाश, बघता बघता शेत उभ्या पिकानं डोलू लागतं. भरतपुरात सारं काही मिळतं. सोन्याच्या इस्टेटीची गोष्ट नुसती बोलाचीच नाही. पूर्वी खरंच लोक नदीच्या रेतीतून सोन्याचे कण काढायचे. मातीखाली खरोखरच सोनं आहे. अवघी प्रजा मूर्खांचा बाजार आहे. शेती करून खातात, मार खाऊन हसतात. म्हणतात, 'तुम्ही परके थोडीच आहात?' गुडघ्यापर्यंत धोतर, कपाळावर टिळा, गळ्यात तुळशीची माळा, काळा वर्ण या सर्वांवरून मूर्खपणाच दिसून येतो. शेतीवर उपजीविका करतात. सर्वजण शेतकरी आहेत. जमीनदाराच्या पक्षाचे लोक म्हणतात, पूर्वी शेतकरी चांगले होते. शेती कसायचे, पोटभर खायचे, प्यायचे, पूजाअर्चा करायचे, शांतपणे झोपायचे. गेले ते दिवस. वाटतं, कलियुगं आलं आहे. म्हणून तर हल्ली शेतकरी अर्धपोटी राहतात, रोगाने ग्रासलेले असतात, जेमतेम कशीबशी शेती करतात, काही लोक देवाचे स्मरण करतात, तर काही करीत नाहीत, म्हणजेच काही लोक अश्रू गाळत राहातात, तर काही दात- ओठ खात राहतात.

सध्या पद्मा नदी पलीकडचे साहूसाहेब भरतपूरचे जमीनदार आहेत. पूर्वी मंगलकोटच्या मियाँ लोकांची जमीनदारी होती. त्यावेळी साहूसाहेब व्यापारासाठी इथे आले होते, मियाँ लोकांत भाऊबंदकी सुरू झाली होती तेव्हा एका पक्षाच्या मंडळींनी साहूकडून काही रुपये कर्जाऊ घेतले होते. कर्ज जेव्हा हजार वाटांनी वाढू लागलं तेव्हा कुणीही त्याच्या तावडीतून वाचणं शक्य आहे का? त्यातून या शेतकरी प्रजेचे जे पुढारी होते त्यांच्यापैकी बहुतेकांनी त्यावेळी या प्रकरणात साक्ष दिली होती – या साहूंच्या वतीने.

असो, जाऊ द्या त्या गोष्टी. तसं पाहिलं तर हल्ली ते सर्वजण आपला धिक्कार करतात, स्वतःलाचा शिव्याशाप देतात. पण त्यालाही काही अर्थ नाही. जुन्या गोष्टी उगाळण्यात काही तथ्य नाही. तपशीलवार सांगत बसलो तर कथेची लांबण वाढेल. अगदी सरळ सरळ हल्लीची गोष्ट सांगणंच इष्ट. पद्मा नदी पलीकडचे

साहूसाहेब आता जमीनदार आहेत. गावोगावी कचेऱ्या आहेत. प्रत्येक कचेरीत नायब आहे. मुख्य कचेरीत मुख्य नायब. याखेरीज पद्मा नदी पलीकडच्या आपल्या इलाख्यातून शिपायांचं टोळकं आयात करून साहूसाहेबांनी पुरता बंदोबस्त करून ठेवला आहे. शिवाय साहूसाहेबांच्या कुटुंबीय मंडळीपैकी बऱ्याच जणांनी इथे येऊन दुकानं थाटून चांगला धंदा वाढवला आहे. काही कारखाने देखील घातले आहेत. हल्ली इथले बरेच लोक कारखान्यातूनही काबाडकष्ट करतात. या लोकांपैकीदेखील काहीजण दातओठ खात असतात, काही जण अश्रू गाळत असतात. जाऊ दे – रडोत नाहीतर दातओठ खावोत – कसेबसे दिवस रेटले जात आहेत हे खरं ! हे लोक जमीनदाराच्या कर्मचाऱ्यांशी झाडांच्या उत्पन्नाच्या बाबतीत भांडणतंटा करतात, जमिनीच्या हक्काविषयी वाद घालतात, प्याद्यांची खुराकी आणिा भत्ता यांच्या बाबतीत अनिच्छा दर्शवितात, नकार देतात, साहू दुकानदारांशी मीठ, मिरची, तेल, कापड यांच्या भावाच्या बाबतीत कचकच करतात. कारखान्यातल्या मजुरीविषयी झगडा करतात, तऱ्हेतऱ्हेच्या बोलाचालीत, आरडाओरड्यात कसेबसे दिवस रेटले जात आहेत. घाण्याला जुंपलेल्या बैलासारखं, डोळ्यांवर कातडं ओढून खाली मान घालून सर्वजण फिरत आहेत. तेल निघत आहे. ते तेली घेत आहे आणि उरलेला चोथा बैल खात आहेत.

अचानक भूकंप झाल्यासारखं सर्व काही हादरलं. भयंकर प्रकरण निर्माण झालं. सीमेच्या प्रश्नावर हल्दीबाडीच्या साई जमीनदारांशी साहू जमीनदारांची फौजदारी सुरू झाली. नुसती फौजदारी ! काही बोलणं नाही की चालणं नाही, नोटीस नाही की पत्र नाही, साईंच्या माणसांच्या टोळ्यांच्या टोळ्या अचानक झाडंझुडपं तोडीत, काठ्या लाठ्या, भाले बर्च्या घेऊन भरतपूरच्या शेजारच्या विभागावर धर्मपूरवर चालून आल्या. कचेऱ्यात घुसून मारपीट, धरपकड आणि खूनबिन करून सर्व गोष्टींवर कब्जा केला. साहूंच्या दलाने येऊन भरतपूरच्या कचेरीत मुक्काम ठोकला. इतकेच नव्हे, साईंच्या माणसांचा उपद्व्याप बघून भरतपूरच्या बाबतीतही काळजी वाटू लागली. काठ्यालाठ्यांना तेल चोपडून, तलवारींना धार लावून त्यांनी असे काही डावपेच लढवले की पुढेमागे भरतपूरमध्ये घुसून तिथेही काही दंगा केल्याशिवाय ते राहणार नाहीत याविषयी कसलाच संदेह राहिला नाही. चहूकडे गडबड गोंधळ उडाला. भरतपूरच्या कचेऱ्यातून जोरात तयारी सुरू झाली.

शेतकरी बिचारे दचकले. दोन रानरेड्यांच्या टकरीत पायदळी तुडविल्या जाणाऱ्या गवतासारखी त्यांची अवस्था झाली. सर्वजण अस्वस्थ झाले.

म्हातारा लालमोहन पांडे हा भरतपूरच्या शेतकऱ्यांचा पुढारी होता. केस गळून गेलेले, दात पडलेले, हळूहळू बोलायचा. मंद मंद स्मित करायचा. काळजी वाटू लागली की डोक्यावर हात फिरवायचा.

भरतपूर विभागातल्या लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊन म्हाताऱ्यापाशी बसल्या.

म्हाताऱ्याने सर्वांना आदरपूर्वक नमस्कार केला. मग आपल्या वडिलांना, काकांना, बहीण–भावंडांन. पाहून आईच्या मांडीवरचं मूल जसं हसतं तसं हसत म्हातारा म्हणाला, 'या पंच महाराज.'

सर्वजण बसले. त्यांनी फक्त एकच शब्द उच्चारला, 'मालक !'

त्या एकाच शब्दात सर्व काही आले. मालकदेखील सारं उमजला.

म्हातारा सुखातही हसायचा, दुःखातही हसायचा, काळजीतही हसायचा. विचार करता करता म्हातारा हसू लागला.

गौरपूरचा एकजण म्हणाला, साहूसाहेबांना आमच्या जमिनीवरचा आमचा हक्क मान्य नाही. आम्ही का म्हणून आमची जमीन अशी सहजासहजी सोडावी? साहूदेखील जमीनदार आहेत, साईदेखील जमीनदार आहेत - तर मग साईंना जमिनीवरचा आमचा हक्क मान्य असल्यास आम्ही त्यांच्या वतीने साक्ष का देऊ नये मालक?

म्हाताऱ्याने मान हलवली, ' छे, छे - पाप लागेल.'

एकजण म्हणाला, 'तर मग आपणदेखील लूटमार करून फौजदारी करू या, चला-'

म्हाताऱ्याने पुन्हा मान हलवली, 'अं हूं !'

'का भीती वाटते?' एक पोरगं चिडलं.

म्हातारा हसला. त्या विशाल हास्यासमोर तो मुलगा खुजा वाटू लागला. म्हातारा हसून म्हणाला, 'भीती नाही बाबा, पाप लागेल, पाप'.

'तर मग? पाप लागणार नाही असं काय करायला हवं ते तरी सांगा !'

'हं. जरा थांबा बाबांनो, मनाला विचारतो. मन देवाला विचारील. मग मी सांगतो.'

रतनलाल म्हणाला, 'जे काय असेल ते लवकर ठरवून टाका मालक. तुम्ही सांगाल तसं करीन मी.'

म्हातारा हसला. रतनवर त्याचा विश्वास आहे. फारच चांगला मुलगा आहे. तितकाच धाडसीही !

* * *

ठक् ठक् करीत म्हातारा कचेरीत हजर झाला, 'राम राम, नायबसाहेब !'

'कोण, लालमोहन? ये, ये.'

'आलो, हजर आहे.'

'हजरबिजर नाही नुसतं. आता कंबर कसून लागा कामाला. या मेल्या साईंना मारून हाकलून द्यायचं आहे. छाटून टाकायचं आहे.'

म्हातारा हसला, 'हे काय बोलताय नायब साहेब?'

'का?'

'वा ! छाटल्याने रक्त सांडेल की ! लोक मरतील. पाप लागेल.' म्हाताऱ्याच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले.

म्हाताऱ्याचा हा मानभावीपणा बघून नायब आतल्या आत जळफळला. तरीदेखील कामाचा माणूस आहे असा विचार करून राग आवरून संयमाने म्हणाला, 'हो, समजलं. त्यांचं रक्त बघून तुमचे डेळे भरून येतात. सगळं समजलं बरं मला.' इतकं बोलून कर्र कर्र करीत थोडं लिहून तो पुढे म्हणाला, 'आणि त्यांनी आमच्या माणसांना जखमी केलं, रक्ताचे पाट वाहायला लावले, त्याचं काय–'

म्हाताऱ्याचे ओठ थरथरू लागले, डोळ्यातले अश्रू आणखीन वाढले, 'अरे देवा, हे कानावर येताच मी इतका रडलो आहे नायबसाहेब ! अरेरे, किती लागलं असेल त्या बिचाऱ्यांना ! त्यांच्या जखमा बघून माझ्याच उरात घाव बसल्यासारखं वाटतंय मला.'

नायब तीक्ष्ण दृष्टीने म्हाताऱ्याकडे बघत राहिला. हा माणूस पक्का कावेबाज आहे की खरंच साधाभोळा आहे? शेळीच्या शिंगाला घासून हिऱ्याची धारदेखील बोथट होत असावी. नायबची लोखंडाचं पाणी चढलेली कठोर तीक्ष्ण बुद्धीदेखील म्हाताऱ्याच्या बोथट बुद्धीच्या घराच्या दाराला छिद्र पाडू शकत नव्हती. बराच वेळ त्याच्या चेहऱ्याकडे पहात राहिल्यावर नायब म्हणाला, 'तर मग? काय करायला हवं सांगा बघू?'

'तेच सांगायला आलोय.' अश्रूंमधूनच म्हाताऱ्याच्या चेहऱ्यावर हास्य झळकलं.

'काय?'

'सांगतो. आमच्या जमिनीवरचा आमचा हक्क मान्य करा आणि आपली सगळी माणसं, शिपाई वगैरे घेऊन इथून निघून जा. मग बघा आम्ही साईंना घालवून देतो की नाही.'

'तुम्ही घालवून द्याल? तुम्हाला फौजदारी करता येते? शेती करून पोट भरता. लाठी चालवता येते? बर्ची चालवता येते?'

म्हातारा हसला.

'हसतोस?'

'हो. तुमच्या बोलण्याचं हसू येतंय. अहो, आम्ही काठ्या, बर्च्या हाती घेणारच नाही मुळी.'

'तर मग कसं अडवणार त्यांना?'

'ते येतील तेव्हा आम्ही पाठ फिरवून उभे राहू. घ्या, मारा काठी. छाती पुढे काढून आम्ही त्यांना सांगू, चालवा तुमच्या बर्च्या. आमचं रक्त वाहू लागेल, जमीन

लाल होऊन जाईल. आम्ही प्राण देऊ. त्यांना अक्कल येईल, त्यांचे डोळे उघडतील, छाती धडधडू लागेल, डोळे भरून येतील. देव त्यांना सुबुद्धी देईल आणि शरमेने ते परत फिरतील.'

नायब खो खो करून हसू लागला. 'हीच तुमची युक्ती होय?'

पण म्हातारा चांगलाच खमक्या होता. नायबच्या हसण्याने मुळीच गोंधळला नाही. त्याच्या बोळक्या तोंडावर तेच लहान मुलासारखं हास्य उमटलं. 'असं देखील होतं हो जगात ! माझ्या मनाने देवाला विचारलं तेव्हा देवाने हेच सांगितलं. तुम्हा लोकांची मनं देवाला कधी विचारीतच नाहीत. नाहीतर माझं बोलणं तुमच्या लक्षात आलं असतं.'

* * *

जसा देव तशी त्याची देवी. म्हाताऱ्याची म्हातारी अगदी वेड्याच्या वेडीसारखीच होती.

सगळं काही ऐकून ती पार गंभीर विचारात पडली. म्हाताऱ्याप्रमाणे तिला देखील साहू-नायबांची काळजी वाटत होती. 'ही तर अगदी सोपी गोष्ट आहे. अगदीच सरळ. त्या लोकांना समजत कशी नाही? का हो असं का?'

'अग, तोच तर विचार करतोय मी.'

'तर मग काय होईल? तुम्ही काय कराल?'

'मी?' बराच विचार करून म्हातारा हसला,

'हो, तेच ठीक राहील.'

'काय?'

'मी जीव देईन.'

'जीव देणार?'

'हो, जीव देईन. मी जर मेलो तर त्यांना वाईट वाटेल. देव त्यांना सुबुद्धी देईल आणि मग आमचं बोलणं त्यांना समजेल.'

म्हातारी थोडा वेळ विचार करीत राहिली. विचार केल्यावर ती खूष झाली. हसून पुन्हा पुन्हा मान हलवीत म्हणाली, 'हो, खरंय तुमचं म्हणणं.'

'आहे ना?' हसत म्हाताऱ्याने म्हातारीकडे बघितलं.

'हो, तसंच करा. जीव द्या. जीव देऊन त्यांना समजावा.'

बाहेरून हाक आली, 'मी रतनलाल आलोय, मालक !'

'ये बाळ, ये.' लालमोहनचा चेहरा आनंदाने फुलला.

रतनलाल येऊन स्मित करीत उभा राहिला. म्हणाला, 'मालक, सगळे जण जमलेत. काय झालं, आता काय करायचं आहे सांगा.'

रतन ज्वाळेसारखा धगधगत होता.

म्हातारा बाहेर आला.

पण त्यापूर्वीच एक गडबड झाली. साहूंच्या शिपायांनी बरकंदाजांनी येऊन सर्वांना घेरून टाकलं. साहूंचा मुख्य नायब चारुशील मोठा जबरदस्त माणूस होता. तो कुणाचीच पर्वा करीत नसे. त्याने इथल्या नायबला हुकूम सोडला की वेड्याला पकडून कैदेत टाका. नुसतं वेड्यालाच नव्हे, तर रतनलाल वगैरे त्याच्या अनुयायांनाही कैदेत टाका.

म्हातारा हसून म्हणाला, 'चला.'

रतनलाल वगैरेंच्या तोंडाकडे बघून तो पुन्हा म्हणाला, 'चला, बाळांनो.'

म्हातारी तोंडभर हसत पुढे येऊन म्हणाली, 'आणि मी?'

साहूच्या माणसाने म्हटलं, 'हो, हिलाही धरायचा हुकूम आहे.'

म्हातारी म्हणाली, 'थांबा दादा. जरा दम धरा बाळांनो. म्हाताऱ्याची लंगोटी, माझं लुगडं आणि तांब्या घेऊन येते. त्या तांब्यात पाणी प्यायल्याशिवाय माझी तहान भागत नाही.'

म्हाताऱ्याने हसून मान हलवली. 'कितीही झालं तरी अखेर बाई ती बाईच ! तांब्याचा मोह काही सोडवत नाही.'

साहूंनी म्हाताऱ्याला नीट काळजीपूर्वक नजरकैदेत ठेवलं. त्यात जरा देखील हयगय केली नाही. पण म्हातारा तो म्हाताराच. कैदेतही हसायचा. देवाचा धावा करायचा आणि विचार करीत रहायचा. मनातल्या मनात म्हणायचा, 'देवा आता मी काय करू ते तूच सांग. जीव देऊ का? मी मेल्याने त्यांना वाईट वाटेल का? तू त्यांना सुबुद्धी देशील?'

म्हातारी कैदेत येरझाऱ्या घालीत रहायची. म्हाताऱ्यासाठी स्वैपाक करायची, त्याचं अंथरूण घालायची, कांबळं झटकून ठेवायची, तांब्या लख्ख ठेवायची. तिला जणू हे सगळं आवडत होतं. म्हातारा तिच्या जवळ आला होता. बाहेर म्हाताऱ्याला शेकडो कामं असायची. घटकाभर बसून घरसंसाराविषयी बोलायला उसंत नसायची. त्याचं सगळं बोलणं भरतपूरविषयी असायचं नाहीतर मानवतेविषयी असायचं. आज इथे, उद्या तिथे, अमुक तमुक माणसं येताहेत सारखी ! म्हाताऱ्याभोवती सतत माणसांचा गराडा असायचा. इथे म्हाताऱ्यापाशी तीच काय ती एकटी होती. म्हणून त्याच्या आणखी जवळ येऊ शकली होती. पण थोड्याच दिवसात म्हातारीचा भ्रमनिरास झाला. म्हातारा तो म्हाताराच. लोकांची गर्दी नसली म्हणून काय झालं. त्याच्या डोक्यातील काळज्यांची गर्दी मुळीच कमी झाली नव्हती. बाहेर लोक म्हणायचे, म्हातारा दगडासारखा घट्ट आहे. म्हातारीला वाटू लागलं, लोक म्हणायचे ते काही खोटं नाही.

ती म्हणायची, 'ऐकलंत का?'

'आँ?' म्हातारा तिच्याकडे बघायचा. पण म्हातारीला वाटायचं की म्हातारा तिच्याकडे नव्हे तर पलीकडे तिकडे बघतोय. अगदी दूरवर पार क्षितिजापर्यंत. त्या तिकडे डोंगरावर जे देऊळ आहे त्या देवळाच्या शिखराकडे त्याची नजर लागली आहे.

'कसला विचार चाललाय?'

'चाललाय कसला तरी.' म्हातारा हसायचा.

'हसू नका. तुमचं हे हसणं मला नाही आवडत'.

'हं !' एवढाच संक्षिप्त उद्गार काढून म्हातारा चूप बसायचा.

भय आणि विस्मयाने म्हातारी अवाक् व्हायची. त्याचबरोबर मनातल्या मनात प्रार्थना करायची. 'देवा, म्हाताऱ्याला उदंड आयुष्य दे. नाहीतर इतक्या सर्व गोष्टी कोण सांगील?'

* * *

अचानक एक दिवस म्हातारा म्हणाला, 'मी मरणार.'

म्हातारीचा जणू ऊर फुटायची वेळ आली. पण ते बोलून दाखवायची सोय नव्हती. म्हाताऱ्याने ते ऐकून तिची टर उडवली असती.

तिने फक्त एवढेच विचारलं, 'का म्हणून?'

'मरणार, साहूसाहेबांनी माझ्यावर आळ घेतलाय की मी फौजदारी व दंगल करण्यासाठी बाहेरून माणसं बोलावली आहेत. त्या बाहेरच्या माणसांची साहूंच्या शिपायांशी मारपीट झाली आहे. तिकडे आमच्या लोकांनी देखील मारझोड केली आहे. खूप नुकसान झालं आहे. साहेब म्हणतात हे सर्व मीच शिकवलं आहे.'

रतनलाल म्हणाला, 'पण मालक, त्यासाठी तर साहेबांच्या शिपायांनी देखील लोकांना खूप मारलं आहे.'

म्हातारा मान हलवून हसला. म्हणाला, 'इतकंच नाही रतन. आपल्या लोकांनी जेव्हा मारपीट केली तेव्हा लोकांना पाप लागलं. मी मरणार. मरून देवाला प्रार्थना करणार की देवा तू या पापाची क्षमा कर. फक्त आमच्याच पापाला नव्हे तर त्या शिपायांच्या पापांनाही क्षमा कर आणि –'

'आणि काय मालक?'

म्हातारा हसला. 'आणि तेव्हा त्यांना कळेल की मी पापी नाही.'

* * * *

म्हाताऱ्याने जीव द्यायचा निश्चय केला. अन्न, जल वर्ज्य केलं. बस्. चुपचाप पडून रहायचा.

म्हातारीचं देखील सांगणं बोलणं ऐकणं सारं जणू संपलं. ती चुपचाप बसल्या बसल्या नुसती पहात रहायची. अरे देवा, तिचा म्हातारा चाललाय. तिच्याकडे साधं

एक नजर बघायची देखील त्याला फुरसद नाही. रडायची लाज वाटायची. तिला रडतादेखील येत नव्हतं.

तुरुंगाबाहेर गडबड उडाली. 'देवा, आमच्या म्हाताऱ्याला वाचव.'

रतनलाल आणि बाकी सर्वजण खिन्न झाले.

म्हातारीला आता रहावेना. पण म्हाताऱ्याला काही बोलायचं धाडस तिला होत नव्हतं. मनातल्या मनात ती देवाचा धावा करायची. म्हणायची, 'देवा, म्हाताऱ्याला वाचव. इतक्या लोकांचा विचार कर. माझ्याकडे बघ.' म्हातारीला वाटायचं, म्हताऱ्यापेक्षा देवाचंच मन मृदू आहे. देव हसत असल्यासारखं तिला वाटायचं.

म्हातारा खरंच मेला नाही. मृतप्राय अवस्था झाली होती. साहूंनी मोठमोठे वैद्य पाठविले. त्यांनी देखील आपल्या हातात काही नाही म्हणून सांगितलं. अन्न घेतल्याशिवाय माणूस जगत नाही, जगू शकत नाही. तरीदेखील म्हातारा जगला. विलक्षण म्हातारा. क्षणभरही त्याच्या चेहऱ्यावरून ते बालसुलभ स्मित मावळलं नाही.

हळूहळू मृत्यूची सारी लक्षणं नाहीशी झाली. दृष्टी कमी झाली होती ती सुधारली आणि श्वेतकमलाच्या पाकळ्यासारखी प्रभा फाकली. चेहऱ्यावर देखील लहान मुलासारखी झळाळी आली.

म्हातारा म्हणाला, 'मी वाचलो. देवाने माझ्या मनाला सांगितलं की तुझा काहीच अपराध नाही. तू पापी नाहीस.'

म्हातारीचा चेहरा फुलला.

ती म्हणाली, 'आता मी मरणार.'

'का?'

'मला ताप आल्यासारखं वाटतंय. आणि –'

'आणि काय?'

पण म्हातारीने काही केल्या ते सांगितलं नाही.

नुसती हसत राहिली.

म्हातारी खरोखरच वारली. साधा ताप आला होता. त्याच तापात ती वारली. अखेरच्यावेळी ती टक लावून म्हाताऱ्याच्या चेहऱ्याकडे बघत राहिली होती.

दगडाचा म्हातारा. लोक खोटं नव्हते बोलत.

अचानक म्हातारीला वाटलं होतं, लोक खोटं बोलतात त्यांचं म्हणणं खरं नाही, मुळीच खरं नाही. म्हाताऱ्याच्या डोळ्यात पाणी आहे. हो, हो, म्हाताऱ्याच्या डोळ्यात पाणी आहे !

ती म्हणाली होती, 'ऐकलंत का?'

डोळे भरले होते तरी म्हाताऱ्याच्या चेहऱ्यावर हसू आलं होतं. म्हाताऱ्याने विचारलं होतं, 'काय? काय सांगत होतीस?'

'मृत्यू फार चांगला आहे. खरंच फार चांगला आहे!'

म्हातारा हसू लागला होता. डोळ्यातले अश्रू ओघळत राहिले होते. म्हातारीच्या कपाळावर म्हातारा ते अश्रू पुसू लागला होता. पण, म्हातारी म्हणाली होती, 'नको. राहू देत.'

# मतदात्री सावित्रीबाला

## बनफूल

विचित्रच नाव होतं त्याचं. रिपुनाश. त्याच्या थोरल्या भावाचं नाव होतं तमोनाश. पण दैवाचं चक्रच असं आहे की कुणीच कुणाचा नाश करू शकलं नाही. स्वतःच नष्ट झाले. तमोनाशाच्या जीवनात प्रकाशाचा अजिबात प्रवेश झाला नाही. अ आ इ ई देखील शिकू शकला नाही तो. पार अक्षरशत्रू होता. ब्राह्मणाघरी जन्मले होते म्हणून दोघांचं संस्कृत नामकरण झालं होतं. त्यांचे वडील होते – त्या मोहल्ल्याचे पंडित, तर्कतीर्थ मोहनाश. संक्षेप करून लोक त्यांना मोहन पंडित म्हणायचे. सध्या समाजात संस्कृत विद्वानांना मान नाही. ते फार गरीब होते. भिक्षुकी करायचे. ते मृत्यू पावले त्यावेळी तमोनाशाचं वय होतं सहा वर्षांचं आणि रिपुनाशाचं तीन वर्षांचं. त्यांची आई लोकांघरी स्वैपाक करून संसाराचा गाडा रेटू लागली. सोळाव्या वर्षीच तमोनाश 'सज्ञान' झाला. मस्तीत भटकू लागला. गुंडांची एक टोळीदेखील त्याने तयार केली. टोळीत त्याचं नाव होतं तमना. गुंडगिरी करून तो थोडंफार मिळवायचा. त्यातले काही पैसे आईला आणून द्यायचा. बाकीचे स्वतःच्या चैनीत उडवायचा. पण हे फार दिवस चालू शकलं नाही. गुंडगिरी करता करताच एक दिवस कुणीतरी सुरा भोसकल्याने जखमी होऊन मरण पावला. काही वेळ त्याचं प्रेत फुटपाथवर पडून राहिलं. मग उत्तरीय तपासणीसाठी पोलीस त्याचं प्रेत उचलून घेऊन गेले. डॉक्टरांनी त्याच्या प्रेताची चिरफाड केली. अखेरीस लोकांनी ते ताब्यात घेतले. तमोनाशाच्या आईने त्याचं प्रेत मागितलंच नाही. लोकांची गर्दी जमवून प्रेतावर अंत्यसंस्कार करण्यासाठी जे पैसे लागतात ते तिच्यापाशी नव्हते. चारी बाजूंनी कर्जाचा डोंगर तिच्याभोवती उभा होता. त्यात आणखी भर घालायची तिची इच्छा नव्हती. मांगांनी तमोनाशच्या प्रेतातून हाडं काढून स्वच्छ केली आणि मग ती 'ॲनॉटॉमी'च्या विद्यार्थ्यांना विकून थोडे पैसे मिळविले. तमोनाशचा जीवनवृत्तांत इथेच संपला. तमोनाशच्या आईने सावित्रीने काही फारसा शोक केला नाही. तिच्या डोळ्यात आणि चेहऱ्यावर एकप्रकारचा सुप्त अग्नी सतत धगधगत असे.

सावित्री ज्यांच्या घरी काम करायची त्या गृहस्थांनी तमोनाशाच्या मृत्यूनंतर तिच्या पगारात दोन रुपयांची वाढ करायची तयारी दर्शविली. पण सावित्रीने ते मान्य केलं नाही. इतकंच फक्त म्हणाली, 'काही गरज नाही.'

रिपुनाश रस्त्यावर भटकायचा. ज्यांना घरात जागा नसते, त्यांचं आयुष्य रस्त्यावर भटकण्यातच जातं. कुठलाही खेळ, कुठलीही घटना, कुठलीही गर्दी ज्यांना आकृष्ट करते असे लोकच रिपुनाशचे मित्र होते. त्याच्या टोळीत त्याचं नाव होतं 'रिपने'. पण रिपने काही तमनासारखा आडदांड नव्हता. किरकोळ शरीर व किरकोळ चेहरा. बाजारात भटकायचा, हमाली करून थोडे पैसे मिळवायचा. विडी ओढायला शिकला होता. विडीचं एक बंडल रोज खरेदी केल्यावर जे काही शिल्लक राहायचं ते आईला द्यायचा. अशा तऱ्हेनं काम चाललं होतं. रिपने सोळा–सतरा वर्षांचा होता तेव्हा अचानक एके दिवशी एक गोष्ट घडली. टोपलीतून वह्यांचा गठ्ठा आणून एका साहेबाच्या मोटारच्या कॅरियरवर तो वह्या ठेवत होता. त्याचवेळी त्याच्या गळ्यात कसंनुसं होऊन त्याला खोकल्याची जोरदार उबळ आली. मोटारवाला साहेब त्याच्या मजुरीचे बारा आणे त्याला देऊन निघून गेला आणि रिपने फूटपाथवर बसून खोकू लागला. खोकता खोकता थुंकीबरोबर रक्त बाहेर आलं. रिपने थोडा वेळ टक लावून त्या रक्ताकडे बघत राहिला. मग घरी निघून गेला.

सवित्री त्याला मोहल्ल्याच्या डॉक्टरांपाशी घेऊन गेली. त्याची छाती व पाठ तपासून त्यांनी सांगितलं, 'क्षय रोग झाला आहे.' नंतर त्यांनी हे सांगितलं की, मला काही फी नको पण औषधं व इंजेक्शन्स खरेदी करावी लागतील. अंडी, मांस, मासे, फळं, लोणी वगैरे खायला द्यावं लागेल.' सावित्री डॉक्टरकडे नुसती पाहातच राहिली. तिच्या डोळ्यातील व चेहऱ्यावरील धगीने डॉक्टरांच्या मनाला कुठेतरी स्पर्श केला. ते म्हणाले, 'तुमची ऐपत नसेल तर इस्पितळात ठेवणंच अधिक बरं राहील. मी एक पत्र लिहून देतो. ते घेऊन इस्पितळात जा.' पत्र घेऊन सावित्री आठवडाभर इस्पितळाच्या गर्दीत धक्के खात राहिली. पण काही उपयोग झाला नाही. एका रोग्यानं सांगितलं, 'पैशांशिवाय काही होत नाही, लाच द्यावी लागते.' ते ऐकल्यावर सावित्रीने पुन्हा इस्पितळाच्या दारात पाऊल टाकलं नाही. इतके रुपये कुठून आणायचे? उपचाराशिवायच त्याचे दिवस जाऊ लागले. रिपने पुन्हा रस्त्यावर हमाली करू लागला. एके दिवशी त्याच्या मित्राने त्याला म्हटलं, 'हे बघ, मला एक कल्पना सुचली आहे. तू कसंही करून सहा महिने अलीपूरच्या तुरुंगात काढलेस तर तुझा क्षय रोग बरा होईल –'

'हे काय बोलतोस? तुरुंगात गेल्याने का क्षयरोग बरा होत असतो?'

सुरुवातीला रिपनेचा त्याच्या बोलण्यावर विश्वासच बसला नाही.

मित्राने सांगितलं, 'हरू तुरुंगातून बरा होऊन परत आलाय. त्यालादेखील क्षयरोग झाला होता. तिथे फार चांगलं इस्पितळ आहे. फुकटात उपचार करतात. तू तुरुंगात जा.'

थोड्याच दिवसात ट्रॅममध्ये खिसा कापताना मुद्देमालासकट रिपने पकडला गेला. अगोदर लोकांनी त्याला चांगला बदडून काढला. मग पोलिसांच्या हवाली केला.

न्यायालयात न्यायाधीश म्हणाले, 'तुला आपल्या बचावासाठी वकील नेमता येईल. तेवढी तुझी ऐपत नसल्यास आम्ही तुझ्यासाठी एक वकील देऊ.' रिपने हात जोडून म्हणाला, 'नको मायबाप. वकिलाची काही जरूर नाही. पोलिसांनी जे सांगितलं ते खरं आहे. चोरी करण्यासाठीच मी त्या माणसाच्या खिशात हात घातला होता.'

न्यायाधीशांनी निकाल सुनावला, 'पन्नास रुपये दंड. दंड न दिल्यास एक महिना कैद.'

रिपने पुन्हा हात जोडून म्हणाला, 'मायबाप दंडाचे रुपये भरणं मला शक्यच नाही. पण महिन्याऐवजी सहा महिन्यांची कैदेची शिक्षा आपण मला द्यावी.'

न्यायाधीश थक्क झाले.

'सहा महिन्यांची कैद कशासाठी हवी?'

'मला क्षयरोग झाला आहे. अलीपूर तुरुंगात क्षयरोगावर चांगले उपचार होतात असं ऐकलंय. सहा महिन्यात मी बरा होईन.'

पण न्यायाधीशांनी निकाल बदलला नाही. तुरुंगातल्या इस्पितळात थोडे फार उपचार झाले, पण रोग काही गेला नाही. महिन्यानंतर रिपने खोकत खोकत तुरुंगाबाहेर आला. त्यानंतर तो जेमतेम महिनाभर जिवंत राहिला. एके दिवशी मध्यरात्री त्याला खोकल्याची मोठी उबळ आली आणि अखेर आईच्या पायावर रक्ताची उलटी करून बिचाऱ्याने इहलोकाचा निरोप घेतला.

सावित्री निस्तब्ध बसून राहिली. तिचे डोळे धगधगू लागले. तिने अश्रूचा एकही थेंब गाळला नाही.

त्यानंतर दोन महिन्यानी निवडणुका झाल्या. सावित्रीबालादेखील मतदात्री होती. मत मागणारी एक विख्यात व्यक्ती तिच्या दारी येऊन हजर झाली.

अग्निदृष्टीने त्यांच्याकडे बघून सावित्री म्हणाली, 'तुम्हाला मत देऊ? कशासाठी? तुम्ही माझं काय भलं केलं आहे? तुमचं राज्य होतं तेव्हा माझे विद्वान पती एखाद्या सामान्य भिकाऱ्यासारखे मरण पावले. माझ्या थोरल्या मुलाला मी शिक्षण देऊ शकले नाही म्हणून अखेरीस तो गुंड बनला आणि सुऱ्याने जखमी होऊन मारला गेला. धाकट्या मुलाला क्षयरोग झाला. त्याला औषधपाणी मिळू शकलं नाही. सगळे लाच मागतात. मी का म्हणून तुम्हाला मत द्यायचं? मी कुणालाच मत देणार नाही –'

मत मागणारे गृहस्थ सांगू लागले, 'पण हे बघा, गणतंत्रात –'

पण सावित्रीने त्यांना पुरतं बोलू दिलं नाही. तीव्र स्वरात किंचाळली, 'जा,चालते व्हा इथून –' ते गृहस्थ चटकन बाहेर निघून गेले.

सावित्रीने धाडदिशी दार लावून घेतलं.

# नावाड्यांचा सरदार

## अचिन्त्यकुमार सेनगुप्त

आईने नासिमला मारलं. तिने मारलं तर मारलं. पण तो का मारतो? तो कोण लागून गेलाय?

गायीगुरांची राखण करीन; नाहीतर नाही करणार, शेती करीन; नाहीतर नाही करणार, त्यात त्याचं काय जातं? जमीन उलते उलू देत. त्याला का त्याची डोकेदुखी? छपरावरची कौलं बदलायची जरूर आहे की नाही ते आमचं आम्ही बघून घेऊ. भिजावंच लागलं तर आम्ही मायलेक भिजू. डोकेफोड करण्यासाठी त्याला बोलवायला कुणी जाणार नाही.

पण नाही. गुलबानू म्हणते, ''यापुढे गौहरअलीच देखरेख करील.''

''कोण गौहरअली?'' नासिम मानेला झटका देत भडकतो.

''मोठा माणूस आहे. पाच बिघे जमीन आहे. दारी कचेरी आहे. कित्येक कामं चालू आहेत.''

''आम्हाला काय त्याचं?''

''त्याच्याबरोबर राहिलो तर जमीन ठीक राहील. खाण्यापिण्याचे हाल व्हायचे नाहीत, झोपडीच्या जागी एखाद दिवशी पत्र्याचं घर उभं राहील.''

''आम्हाला नको. आपली ही पडकी झोपडीच बरी आहे. आपण कंदमुळं, फळं खाऊन राहू. तू त्याला हाकलून दे.''

चांगलं झोडपून काढलं आहे गौहरअलीने. गुलबानूने देखील त्याला हातभार लावला आहे.

आज अबाजान जिवंत असते तर काय बिशाद होती कुणाची त्याला असं मारायची? शेतावर जाण्यासाठी कुणी अशी जोरजबरदस्ती केली नसती. अबाजान म्हणायचे, ''बाजारात तुला कटपीसचं एक दुकान घालून देईन.'' त्यावर नासिम म्हणायचा, ''त्यापेक्षा मला एक नाव विकत घेऊन द्या. जमिनीपेक्षा मला नदीचं पाणी आवडतं.''

नाव खरेदी करायची अब्बाजानची ऐपत नव्हती. नासिम अजून फेरीची नाव चालवण्याइतका मोठा झालेला नाही. त्याच जाळं केव्हाच फाटून गेलं आहे. तरीदेखील जाळ्याची धुंदी काही त्याला विसरता येत नाही. नदीकाठी चुपचाप बसून रहातो. गालांवरून अश्रुधारा वहात असतात.

त्याच्या कानावर आलं आहे, आई गौहरअलीशी निका लावणार आहे. दोघं मिळून संसार थाटणार आहेत. मग नासिम कुठं राहील? मागच्या दारी? लोक जेव्हा आईला विचारतील की, ''हा कोण?'' तेव्हा ती सांगेल की, ''माझ्या पहिल्या नवऱ्याचा मुलगा.'' लोक जेव्हा नासिमला विचारतील की, '' कुणाच्या अन्नावर जगतोय?'' तेव्हा त्याला सांगावं लागेल की, ''गौहरअलीच्या अन्नावर!'' नासिमच्या उरात आगडोंब भडकतो.

मैलभर अंतरावर ब्रांच लाईनची स्टीमर येऊन उभी रहाते. पाटाच्या शेतापाशी. धक्का किंवा एखादा उंचवटा वगैरे काही नाही. बदामाच्या झाडाच्या बुंध्याला दोर बांधून स्टीमर काठाला लावतात. आश्चर्याची गोष्ट म्हणजे, कधी टक्कर होत नाही. किनाऱ्यावरच दोन शिड्या सोडल्या जातात. शिडीच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत बांबूचा झेला पकडून दोन खलाशी उभे रहातात. प्रवासी चढतात, उतरतात. घाट सरकार बदामाच्या झाडाखाली बसून एका लहानशा पत्र्याच्या पेटीतून तिकिटे विकतो. जे लोक उतरतात त्यांच्याकडून तिकिटं घेतो आणि जी मंडळी नजर चुकवून इथवर पोचतात त्यांना बाजूला नेऊन बोलणी पक्की करतो. त्यानंतर जहाजाच्या अधिकाऱ्याबरोबर हिशोब करण्यासाठी स्टीमरवर जातो. घाट – सरकार जाईपर्यंत शिडी उचलली जात नाही. एक शिडी उचलली की दुसरी तशीच ठेवतात. घाट–सरकारला बांबूच्या झेल्याची गरजच लागत नाही.

जमीन खोलगट आहे. बहुधा नेहमीच पाणी साचलेलं असतं. झाडापाशीच काय ती जरा उंचशी जागा आहे. प्रवासी पाण्यातून चालत गावाची वाट धरतात. हातांनी ढकलायची एक लहानशी नाव आहे. सामान असेल तर तिचा आधार घेतात. पोरंबाळं खांद्यावर बसून जातात. लहानगी सूनबाळ असेल तर कडेवर उचलून आणतात.

''शिडी उचल'', नावाड्यांचा सरदार दुसऱ्या मजल्यावरून हुकूम सोडतो. घाट–सरकार अजून उतरला नाही? नाही. हा घ्या, नुकताच वेडंवाकडं चालत उतरला. अखेर शिडी उचलली गेली. साखळदंडाला बांधलेला नांगर खडखडाट करीत उचलला जाऊ लागला.

एक माणूस बहुधा घाईमुळे लवकर उतरू शकला नाही. कुठे आहे तो? एक दहाबारा वर्षांचा पोर आहे. प्रवासी आहे का? कुणास ठाऊक? कदाचित जहाज बघायला वर आला असेल. जाऊ दे. पुढच्या पाताकाटा घाटावर उतरायला सांग. कुठल्या तरी कोळ्याच्या नावेत बसून जाईल निघून. अंधार होईल. घरी कसा जाईल? आईवडलांना किती काळजी वाटेल? काय त्यांची अवस्था होईल देव जाणे!

लहानशी स्टीमर आहे. वरच्या डेकवर फक्त तिसरा वर्ग आहे. समोरच्या बाजूला पहिल्या वर्गाची दोन खुराडी आहेत. आणि त्याच्याच समोर कोपऱ्यातल्या मोकळ्या जागेत नावाड्यांच्या सरदाराचं व्हील आहे. नासिम अचानक तिथेच जाऊन

थडकला.

अगोदर त्याच्याकडे कुणी लक्षच दिलं नाही. बघूनही न बघितल्यासारखं केलं. त्यांना वाटलं, आला असेल असाच कुणी तरी यंत्रबिंत्र बघायला. पण छे, पोरगं हलायचं लक्षण दिसत नाही.

''काय रे?'' नावाड्यांच्या सरदारानं मान वळवून विचारलं. पायात चपला, डोक्यावर नावेसारखी टोपी. उभ्या उभ्या तो हुक्का ओढीत होता.

''हुजुरांना गड्याची जरूर असेल तर मला ठेवून घ्यावं.''

''घर कुठंय तुझं?'' सरदार थोडा वेळ नासिमच्या चेहऱ्याकडे बघत राहिला.

''इथंच हुजूर, कनकरिया.''

''आईबाप?''

''कुणी नाही.''

सरदार थोडा वेळ न्याहाळून बघत राहिला. विचारलं, ''काम जमेल तुला?''

''काय काम आहे हुजूर?''

''हेच आपलं-स्वैपाकपाणी, धुणीभांडी, साफसफाई, दुसरं काय? करशील? ठीक आहे तर. लाग कामाला. फुकटात एक पोऱ्या मिळाला तर काय वाईट आहे?'' व्हीलवरच्या याद अलीच्या नजरेला नजर भिडवून सरदार पुढे म्हणाला, ''निदान हुक्का तरी भरून देईल आणि गरज लागली तर हातपाय चेपून देईल."

याद अलीने विचारलं, ''पगार नाही देणार?''

''डोंबल्याचा पगार आलाय'', सरदार भडकला.

''पाण्यातल्या शेवाळाची भाजी शिजवून खावी लागेल. राहिला तर ठीक. नाहीतर लाथ मारून देईन हाकलून. काय रे तिकीट आहे?''

''नाही हुजूर. मला पगार नको.''

जहाजवर जागा मिळाली हेच नासिमला खूप झालं. बाप नाही, काका नाही, मालक नाही, पाटील नाही, उगाच फालतू लोकांचा तोंड दाबून बुक्क्यांचा मार नाही, हे काय थोडं झालं? अज्ञाताच्या ओढीने तो अमर्यादाकडे वहात चालला आहे हीच त्याच्या दृष्टीने सर्वात सुखाची गोष्ट आहे.

''नीट मन लावून काम केलंस तर जहाजावरच ठेवून घेईन, इथंच काम देईन. अगोदर शिडीवर, मग डेकवर, त्यानंतर हळूहळू नावाडी, आणि अखेरीस एकदम सरदार. कुणी सांगावं? सुरुवातीला बिनपगारी नोकर नि अखेरीला या जहाजाचा सरदार?'' सरदार आपल्या पांढऱ्याशुभ्र दाढीवर हात फिरवू लागला.

पण पहिल्याच दिवशी रात्री नासिमला सरदाराच्या हातचा मार खावा लागला. निष्काळजीपणामुळे काचेचं एक भांडं त्याच्या हातून फुटलं होतं. आता काय करणार? कुठं जाणार? सरदार अवाक्षर बोलला नाही. त्याने दाणदाण हाणायलाच सुरुवात केली. पाठ नाही की पोट नाही, तोंड नाही की मान नाही, कुठं काही न

बघता नुसता मारत सुटला. बोलायची सोय नाही. नाहीतर हातपाय बांधून पाण्यात फेकून द्यायचा.

नासिमला वेदनांपेक्षाही आश्चर्यच जास्त वाटलं. पण त्यात आश्चर्य वाटण्यासारखं काही नाही. ही तर इथली रीतच आहे. सगळ्यांनाच सरदाराच्या हातचा मार खावा लागतो. शिडी लावणारे, डेक धुणारे, नांगर सोडणारे–ओढणारे, दोर खेचणारे, दिवा सांभाळणारे, कुणाच्याही कामात जराशी जरी चूक झाली तरी दाणदाण दणके सुरू होतात. खालचा विभाग मिस्त्रीकडे आहे. कोळसेवाला, आगवाला आणि इंजिनवाला हे त्याच्या हाताखाली काम करतात. पण सर्वांच्या वर हुकूमत आहे ती सरदारचीच! कुणी जरादेखील चूक केली, एका यंत्राऐवजी दुसरं यंत्र फिरवलं, एका काठीच्या जागी दुसरी काठी उभारली तर धडगत नाही. लाथाबुक्क्या, अर्वाच्य शिव्या, जोडे, सगळं काही. आणि या उप्परही कुणी सरळ झालं नाही तर मग नोकरीवरून हकालपट्टी!

आणि असं का होऊ नये? कंपनी फक्त सरदारालाच ओळखते. तो जहाजाचा कलेक्टर आहे. सगळी जबाबदारी त्याचीच. स्टीमरने जर पाण्यात एखादी नाव बुडवली तर सरदारालाच दंड भरावा लागतो. समजा, अपघाताने स्टीमरच बुडाली तर जबाबदारी कुणाची? कंपनीच्या साहेबाची नव्हे. स्टीमरविषयक जितके म्हणून खटले होतील त्या सर्वांच्या नफ्यानुकसानीची जबाबदारी सरदाराची! वादळाच्या तडाख्यातून बचावून स्टीमर सहीसलामत किनाऱ्याला लावली तर त्याचं इनामदेखील सरदारालाच मिळतं. मिस्त्री, खलाशी यांनी कितीही धावपळ केली, कष्ट केले, हुशारी दाखवली तरी रुपयांच्या थैलीपैकी पैदेखील त्यांच्या वाट्याला येत नाही. जितके बिल्ले मिळतात ते सर्व सरदाराच्या गळ्यात झुलतात.

"काय झालं अचानक?"

स्टीमरची बेटाशी टक्कर झाली आहे. लपलेलं चोर बेट आहे. धुक्यात अंदाज लागला नाही. चाक जमिनीत रुतलं आहे. लवकर निघेल असं वाटत नाही. बंदराच्या डॉकवर निरोप धाडावा लागेल. तिथे तार ऑफीस आहे. तेही काही फार चांगलं नाही. स्टेशन बहुतेक झाडाखाली नाहीतर खुल्या मैदानातच आहे. आता निदान सातआठ तास तरी नक्कीच उशीर होणार. स्टीमरची वाट पहात मधल्या घाटांवर खोळंबलेले प्रवासी आज रात्रभर दुरून दिसणारा धूर बघत रहाणार आणि शिट्टीचा आवाज ऐकत बसणार.

चूक कुणाची आहे?

चूक नावाड्यांची आहे. सेकंड मेटची आहे. सगळेच्या सगळे चांगले आडदांड गडी आहेत. त्यांना मारणं तितकंसं सोपं नाही. उलट आपल्याच हातापायांना लागतं. पण जातील कुठं? त्यांचा एक महिन्याचा पगार कापला जाईल. खुराकीसाठी आता त्यांना स्वतःच्या खिशातून खर्च करावा लागणार.

सरदार जणू या जहाजाचा एकछत्री राजा आहे. सामानसुमान, दुरुस्ती, खलाशी, मिस्त्री यांचे पगार या सर्वांसाठी जो खर्च होतो, त्याचा हिशोब लागून एक लठ्ठशी रक्कम कंपनी सरदाराच्या हाती देते. तिचा विनियोग सरदाराच्याच हाती आहे. तो मर्जी लागेल त्याप्रमाणे कुणाला सगळा पगार देतो, तर कुणाकडून उलट दंडाची रक्कम वसूल करतो. कुणाच्या खुराकीत कपात करतो, तर कुणाला नोकरीवरून हाकलून देतो. त्याच्याविरुद्ध कुणी तक्रार करीत नाही, त्याच्या निर्णयाविरुद्ध कुणी बोलू शकत नाही. अंतर्गत शासनाच्या बाबतीत कंपनी उगाच डोकेफोड करीत नाही. ती फार तर इतकंच बघते की एका घाटावरून दुसऱ्या घाटापर्यंत माल आणि प्रवासी घेऊन जाणारी स्टीमर घसघशीत नफा आणि महसूल मिळवते की नाही.

सगळी स्टीमर सरदाराच्या इशाऱ्यावर ऊठबस करते. सगळे कर्मचारी सरदाराचे ताबेदार आहेत. जणू ती स्टीमर नसून सरदाराची जमीनदारीच आहे.

''रडून काही होणार नाही.'' जवळ उभा असलेला मकबूल म्हणाला.

''असाच नेहमी मार खावा लागेल. मार खाऊन खाऊनच प्रमोशन मिळतं.''

मकबूलदेखील सुरुवातीला नोकर म्हणूनच आला होता. स्वैपाक करण्यासाठी नव्हे तर सरदाराचं साफसफाईचं काम करण्यासाठी. तीन वर्षांनी त्याला शिडीचं काम मिळालं. शिडीनंतर डेकचं काम मिळणार. त्यानंतर कुठे दोरीचं काम मिळेल. जहाजावर मार खाल्ल्याशिवाय बढती होत नाही.

'सरदाराच्या कृपादृष्टीखेरीज काही शक्य नाही. दहाबारा वर्षांनी मेहेरबानी झाली तर सर्टिफिकेट देईल. त्या सर्टिफिकेटच्या बळावर सरदारकीची परीक्षा देता येईल. थर्ड मेट अफसरूद्दीन प्रौढासारखा बोलतो. ''त्या सर्टिफिकेटशिवाय सगळं व्यर्थ आहे. म्हणून चांगल्या दमदार हातांनी सरदाराच्या पायांना तेल मालिश करायला हवं. त्या नंतर परीक्षा पास होऊन सरदार झालं की सुटका होईल. मग जमीनदार व कूळ सगळे एकच.''

''छे, छे, अरे, त्यातसुद्धा एक गोम आहे. चटगावकडच्या लोकांकडे सरदाराचा जास्त ओढा आहे.'' खालच्या आवाजात बॉयलरचा खलाशी विलायतअली सांगतो, ''त्याचं स्वतःचं चटगावात घर आहे. म्हणतो, चटगावखेरीज दुसरीकडे सरदार होतच नाहीत! म्हण आहे, सरदार, मासळी, दरगा या तिहींचा चटगाव; धान, डाकू, कालवा या तिहींचा बारिशाल! सरदारकी म्हणजे डाकूगिरी थोडीच आहे?''

''ए पोरा, तुझं घर कुठं आहे?'' सगळ्यांनी एकदमच विचारलं.

''याच गावात.'' कोमेजल्या चेहऱ्याने नासिमने सांगितलं आणि सर्वांचे चेहरे पडले.

दुसऱ्या दिवशी अब्दुलला बराच मार खावा लागला. पाणी मोजताना एक लोखंडी छडी हरवली होती.

माराच्या वेळी कुणी अडवायला येत नाही, सोडवायला येत नाही. रोजचंच आहे

हे. सगळ्यांना सवय झाली आहे. तरीसुद्धा डोळ्यांतून वाहणारे अश्रू कमी होत नाहीत. नदीच्या पाण्याने डोळे धुता धुता अब्दुल म्हणतो, ''पगारातून किंमत व व्याज कापून घेईलच. वर मारून उगाच जखमी करून टाकलं.''

तरी पण कुठलाही प्रतिकार नाही. आपली बाजू मांडण्यासाठी दोन शब्द कुणी बोलत नाही. मारापासून बचावण्यासाठी अंगाची कातडी व मांस घट्ट करता येत नाही.

नासिमला वाटलं की ही माणसंदेखील त्याच्याचसारखी अनाथ असावीत.

असं का? शिडीपासून सुरुवात करून जहाजाच्या 'फनेल' पर्यंत वर चढायची सर्वांची उमेद असते. सर्वांनाच सरदाराचं सर्टिफिकेट हवं असतं. त्याला जर मारू दिलं नाही तर तो का म्हणून सर्टिफिकेट लिहिण्यासाठी हातात लेखणी धरील?

म्हणूनच त्या दिवशी मकबूलबरोबर पाणी भरताना खेळायच्या नादात त्याने एक बादली पाणी नदीत सांडलं तेव्हा मार खाण्यात त्याला कसलीच लाज वाटली नाही. त्याला अपमानाची तिळमात्र जाणीव झाली नाही. मकबूलविषयी, बाकीच्या खलाशांविषयी त्याला मैत्री, आपुलकी वाटू लागली.

''तुझं काय? तुला काही पगार नाही. मार खाल्लास की मोकळा.'' मकबूल हुंदके देत बोलला, ''पण एका बादलीच्या बदल्यात तो माझा सगळा पगार कापून घेईल. मग महिना संपल्यावर मला म्हणजे, माझ्याकडून उधार घे, रुपयावर दोन आणे व्याज दे. जहाजात बसल्या बसल्या सावकारी करतो. आम्हाला कुणी वाली नाही.'' बोलून तो वर बघतो. जणू त्याची ही व्याकुळ तक्रार वरचा तो खुदा ऐकतोय.

''दुसऱ्या एखाद्या जहाजावर नाही का जाता येत?''

''तुला वाटतं तितकं ते सोपं नाही. एका जहाजावरून रजा मिळाली की दुसऱ्या कुठल्याच जहाजावर जागा मिळत नाही. सरदारांचे आपापसात लागेबांधे असतात. म्हणून तर मार खाऊनही तोंड बंद ठेवावं लागतं. त्याने हाकलून देऊ नये म्हणून हे सगळं सहन करायचं. एकदा का त्याने घालवून दिलं तर मग संपलंच सगळं. आपण बरबाद होऊ. मग पाणी सोडून नांगर धरावा लागेल.''

''आणि जायचं म्हटलं तरी कुठल्या जहाजावर जाणार?'' शेजारी बसलेला याद अली उपरोधिका बोलला. ''सगळ्याच जहाजांवर हीच तऱ्हा आहे.''

''आणि गुपचुप पळून गेलो तर--?''

सगळे हसू लागले. शिडीवरून 'फनेल' वर चढायच्या आकांक्षेने जे जहाजावर आले आहेत त्यांना ही कल्पनाच चमत्कारिक वाटली. ''आणि पळून जाणं तरी काय सोपं आहे?'' सेकंड मेट गंभीरपणे म्हणाला. ''तुझं नावगाव सर्व साहेबाच्या वहीत नोंदलेलं असतं. पळून जाताच पोलिसाकडे तक्रार जाईल. माझे पैसे घेऊन गेला, घड्याळ चोरून पळाला असा आळ घेतला जाईल. सरदारातर्फे कंपनी खटला

लढवील. आता निदान जहाजावर तरी आहेस; मग साफ पाण्यातच बुडशील.''

तर मग काय नासिमचं आयुष्य हे असंच जाणार? असाच पाण्याचा एकसुरी आवाज ऐकता ऐकता हयात जाणार? पगार नाही की घरदार नाही. रात्रंदिवस तो असाच वहात रहाणार? ''सरदाराला खूष करायचा प्रयत्न कर. त्याशिवाय गत्यंतर नाही. बघ कसंही करून शिडी धरता आली तर!''

आणखी कसं खूष करायचं? इतकं काम करतो तो! शिवाय सरदाराचे हातपाय चेपतो. आंघोळीपूर्वी त्याच्या अंगाला तेल लावून देतो, केसांचा भांग काढून देतो. स्वैपाकाच्या वेळी एखादा नावाडी मदतीला येतो म्हणूनच अजून हातपाय सगळे शाबूत आहेत. तरीसुद्धा सरदार अजून खूष नाही. पगारही नाही. उलट दंड वसूल करता येत नाही याचीच रुखरुख त्याच्या मनाला आहे. म्हणूनच त्याला मधून मधून उपाशी रहावं लागतं. तेवढाच एक वेळचा मीठमिरचीचा खर्च सरदार वाचवतो.

मीठ, मिरची, कांदे, तांदूळ सगळं सरदार आणतो. तेल आणि मसाले, मासळी आणि भाज्या वगैरे बाकीच्या सर्व वस्तू ज्याच्या त्याने आणायच्या. महिन्याच्या अखेरीस सरदार प्रत्येकाच्या पगारातून मीठ, मिरची, कांदे व तांदळाचे पैसे कापून घेतो. ते देखील त्याच्या मर्जीनुसार!

''सरदाराला खूष करायचं असेल तर चोरी कर.'' कोण कुजबुजलं कुणास ठाऊक?

जागोजागी या स्टीमरचं इतर छोट्या नावांशी संधान आहे. त्यातून बरण्या भरभरून मीठ, मिरच्या व तांदूळ येतात. त्या नावांवर लोक रहातात, त्या लोकांशी सरदार व मिस्त्रीचं काय संधान आहे कुणास ठाऊक, पण स्टोअर रूममध्ये मीठ, मिरची, तांदूळ व कांदे बिनबोभाट येऊन थडकतात. या चोरीच्या मालावर ते आणखी नफादेखील घेतात.

छे, आता नकोसं वाटतं हे! नासिमला कसलीच आशा नाही. एक दिवसाआड रोज स्टीमर त्याच त्या मार्गाने जा-ये करीत असते. येताना जिथे सायंकाळ असते तिथेच जाताना कधी मध्यरात्र होते, तर कधी दुसऱ्या दिवशीची पहाट. बस्स! एवढेच काय ते नावीन्य! नाहीतर तोच पाण्याचा कलकलाट, तीच ती प्रवाशांची गर्दी, नांगर सोडताना-उचलताना होणारा तोच तो खडखडाट, शिडी व दोर सोडतानाचं तेच ओरडणं! यात आता मन रमत नाही. बरेच दिवस इकडे तिकडे फेऱ्या मारून स्टीमर कनकरियाला परतून आली. नदी इतकी लहान आहे, तिचं पात्र इतकं अरुंद आहे, याची नासिमला स्वप्नातही कल्पना नव्हती. त्याला पूर्वी वाटायचं की नदी कदाचित समुद्रापर्यंत गेली असेल. या देशातून दूरवरच्या दुसऱ्या एखाद्या देशाला जाऊन मिळत असेल. पण तो भ्रम ठरला.

कधी कधी नासिम अंधारात एकटाच नदीकडे पहात बसतो. दाट काळ्या पाण्यावर काजवे लुकलुकत असतात. कनकरिया आज मध्यरात्री आलं आहे.

नासिमला घरची आठवण येते. मनात येते, कुठंय त्याचं घर? छे, ते त्याचं घर नव्हे. तो तर भुतांचा वाडा आहे. आईची आठवण होते. तिचा चेहरा आठवतो. त्याला वाटलं, ती त्याची आई नाही. त्याची आई तर केव्हाच मेली. काळ्या पाण्यावरचं चांदणं त्याला आईच्या मेलेल्या चेहऱ्यासारखं दिसतं.

मोठी चोरी जरी करता आली नाही तरी लहानसहान चोऱ्या न करता यायला काय झालं? हातात कोयते असलेले गावकरी शहाळी विकायला येतात. नासिमने सरदारासाठी दहा पैशांत दोन शहाळी विकत घेतली. जहाजावर चढून, शिडी उचलली गेल्यावर नासिमने सरदाराकडून एक आणा घेतला आणि किनाऱ्यावरच्या रेतीकडे भिरकावला. शहाळी विकणाऱ्या पोराने चिडून नदीतला चिखल उचलून नासिमच्या दिशेने फेकला. पण तोवर जहाज पुढे चालू लागलं होते. कणसुद्धा लागला नाही. सरदार आणि नासिम दोघेही एकाच वेळी हसले.

अशाच प्रकारे 'बॉसपाता' आणि 'गांगरवैरा' जातीची मासळी विकायला येते तेव्हा नासिम चलाखी दाखवतो. चरव्यातून दूध विकायला येते. बांबूच्या मापट्यानं मोजलं जातं. 'पैसे जहाजावर जाऊन देईन.' शेतातली ताजी काकडी टोपल्यांतून येते. 'झिंगा चिंगडी' मासे घालून भाजी करता येईल, नाहीतर तशीच कच्ची खाता येईल. 'पैशाला धोका नाही, मी सरदाराचा नोकर आहे.' पण कुठले पैसे नि काय?

इतक्या दिवसांत नासिमला एक बंडी आणि एक पंचा मिळाला आहे. लुंगी कधी मिळेल कुणास ठाऊक?

नासिमने चार पैसे मागितले.

सरदाराने उभ्या आयुष्यात असला उद्धटपणा पाहिला नव्हता. कपाळाला आठ्या घालत विचारलं, 'काय म्हणालास? पैसे?''

नासिम जणू भलतंच काही बोलला असावा. भेदरल्या चेहऱ्याने नासिम सरदाराकडे बघत राहिला.

''काय करशील पैसे घेऊन?''

''चहा पिईन.''

तत्क्षणी त्याच्या गालावर मणभराची जोरदार थप्पड बसली. नासिमच्या डोळ्यांपुढे अंधारी आली. तो दूर जाऊन कोसळला. सरदार गरजला, ''बदमाष, माझ्यांकडून पैसे मागतोस? कधी विडी घ्यायची आहे, कधी चहा घ्यायचा आहे! एक दिवस म्हणशील, बाटली घ्यायची आहे. जास्त तोंड वाजवलंस तर नदीत फेकून होत्याचा नव्हता करून टाकीन. समजलं?''

नासिमच्या भरल्या डोळ्यांपुढे पुन्हा आईचा चेहरा आला. मेल्यावर आईचा चेहरा कसा दिसेल याचाच तो अंधारात पाण्याकडे टक लावून पहात विचार करू लागला. आईच्या मृत चेहऱ्याचा विचार केल्याने त्याला मानसिक बळ मिळतं, मार सहन करायची ताकद येते. 'अग आई ग–' म्हणून जर रडता आलं नाही तर मग

मुकाट्याने सगळं पचवण्याखेरीज दुसरा उपायच काय?

तरीसुद्धा लोक या अत्याचाराविरुद्ध संघटित होत नाहीत. वरच्या खुदाखेरीज इतर कुणाविरुद्ध त्यांची काही तक्रार नाही. या जहाजापासूनही त्यांची काही सुटका नाही. शिडी, डेकवरचं काम, दोर, नांगर, लाइट वा मिस्त्रीचा विभाग हे कधी कुणाला मिळेल याचाच आशाळभूतपणे सतत विचार करीत सर्वजण दिवस घालवीत असतात. येनकेन प्रकारे सरदार खूष झाला पाहिजे. व्याज देऊन, लाच देऊन, चोरी करून-, नाहीतर मार खाऊन का होईना,पण त्याला खूष केलं पाहिजे. काय विलक्षण शासन आहे या सरदारचं !

त्याच रात्री नासिमने एका प्रवाशाचे जोडे पळवले. सरदारने ते नदीत फेकून दिले. म्हणाला, 'अरे मूर्खा, मी ते जोडे घातले तर पोलीस नाही का मला पकडणार ?'

दुसऱ्या दिवशी नासिमने एक पत्र्याची पेटी पळवली. ती पण नदीच्या तळाशी गेली. त्या पेटीत कागदपत्रं होती आणि ती कुठल्याशा खटल्याविषयीची होती.

कितीही केलं तरी नासिम काही अजून सरदारच्या नजरेत भरत नव्हता. भरेल, भरेल, सावकाश भरेल. सरदाराची नजर जणू त्याच्या कानात हेच सांगत असते. त्याचा मूर्खपणा बघूनही सरदाराने त्याला बदडून काढलं नाही यावरूनच नासिमचा उत्साह वाढला.

कंपनीच्या दिव्यांत दम नाही, पाऊस पडू लागला तर ताडपत्र्या नाहीत, स्त्रीपुरुषांसाठी वेगवेगळ्या खोल्या नाहीत. तरीसुद्धा सर्वजण झोपेनं पेंगुळले आहेत. पत्ते कुटायला, गप्पा मारायला नाहीतर गाणी गात बसायला ते काही सुखवस्तू प्रवासी नाहीत. ही तर शेतकरी कामकरी लोकांची लाईन आहे. ते पुराच्या लाटांसारखी मेहनत करतात आणि मग मांसाच्या गोळ्यांसारखे लोळागोळा होऊन झोपतात.

गाढ झोपेत कुणाच्या तरी खिशातून पैशांची थैली खाली पडली आहे. नासिम चटकन् सफाईने ती उचलतो. अगोदर त्याच्या मनात येतं, पैसे मोजून बघावेत. दूर कुठेतरी पळून जावंसंही वाटतं. पण मग का कुणास ठाऊक, कुठल्या तरी दुर्दम्य आकर्षणाने खेचला जाऊन तो मंत्रमुग्ध झाल्यासारखा सरदारापाशी येऊन उभा राहतो – वाघाच्या तावडीतल्या गायीसारखा जो फक्त मारतो. हसून बोलतसुद्धा नाही, खऱ्या कष्टाच्या हक्काच्या कमाईतली फुटकी कवडीदेखील कधी हातावर ठेवीत नाही, त्यालाच खूष करावंसं वाटतं. जो सतत चहाड्या ऐकतो, एकाला दुसऱ्यापासून वेगळा करतो त्याचंच मन जिंकण्यासाठी अहमहमिका लागलेली असते. कोण कुणाला मागं ढकलतं याचीच स्पर्धा चाललेली असते.

'सात रुपये साडे नऊ आणे'. मकबूल म्हणतो. 'यात काय होणार आहे? दोन विसे सात झाल्याखेरीज काही होत नाही असं आपला सरदार म्हणतो.'

तरीदेखील कपड्यालत्त्यांपेक्षा रोख पैसे चांगले. त्याहून चांगले दागदागिने, सोनंनाणं. हल्ली किती महाग आहेत. त्यांच्यापुढे कागदी नोटा म्हणजे नुसती रद्दी !

इतक्या दिवसांनी एक नवी लुंगी मिळाली. आता एक हाफ शर्ट आणखी हवा.

पण शेतकरी कामकरी लोकांच्या बायकांच्या अंगावर दागिने कुठले ? फार झालं तर नाकात चमकी आणि हातात काचेच्या बांगड्या. सोन्याचं नावनिशाण नाही.

छे, छे, ते काय, आहे की? नवी नवरी सासरी चालली आहे. गळ्यात सोन्याची सरी, हातात पाटल्या, पायात चांदीच्या साखळ्या ,जोडवी. जांभळट रंगाची साडी नेसून तोंडावरून पदर घेऊन एकीकडे निजली आहे. वऱ्हाडी मंडळी इकडे तिकडे विखुरली आहेत, पेंगुळली आहेत. कोण कुठं आडवं झालं आहे ते कळणं कठीण आहे. आज जहाजावर भलतीच गर्दी आहे. नासिम संधी शोधतोय.

नासिमने नव्या नवरीच्या गळ्यापाशी हात ठेवला. तिच्या गळ्याजवळची जागा मऊ आहे.

नसिमची बोटं थरथरली नाहीत. झटक्यासरशी त्याने सर खेचली.

'चोर, चोर –'

गर्दीतून वाट काढीत थोडं पुढे सरकेपर्यंत प्रवाशांनी नासिमला पकडलंच. त्यानंतर सगळेच त्याच्यावर तुटून पडले. जो कुणी काय झालं याच्या चौकशीला येतो तोच लगेच मारू लागतो. चोराला माल पळवता आलेला नाही. बिछान्याच्या कोपऱ्यावरच टाकून पळाला आहे. पण त्याने काय होतं? बाईमाणसाच्या अंगाला हात तर लावला आहे ! गळ्यापासून सर तर खेचली आहे ! मारा, मारा, सगळे मिळून मारा.

'अग आई ग – ' नासिम किंचाळला.

अंगात कुडता व डोक्यावर टोपी घालून वहाणा करकर वाजवीत सरदार तिथे येऊन धडकला. विचारलं, 'काय झालं? कोण मारतंय माझ्या मुलाला ?' मुलगा? सगळेजण स्तब्ध झाले. सरदाराचा मुलगा ? कुणातरी पुटपुटलं, 'मला तर वाटलं होतं की हा तुमचा नोकर आहे'.

'नोकर ? साफ खोटं. हा माझाच मुलगा आहे. लग्नाच्या बायकोपासून झालेला. पण त्याची आई हयात नाही. कुणी लावला याला हात ?'

'याने नव्या नवरीचा दागिना चोरला. गळ्यातली सर खेचली.'

सरदार नव्या नवरीपाशी गेला. विचारलं, 'तुमच्या गळ्यातली सर कुणी खेचली का?'

पडदानशीन नवरीने पड्याआडूनच खालच्या आवाजात म्हटलं, 'नाही. गाढ झोपेत गळ्यातून निसटून खाली बिछान्यावर पडली'.

लताबाडी स्टेशन जवळच दिसतंय. वऱ्हाडी मंडळी इथंच उतरणार आहेत. जहाजाची गती मंदावली. खाडखाड करीत नांगर सोडला जाऊ लागला.

दोर झाडाला बांधला गेला.

'शिडी लावा, शिडी लावा' सरदार वरून ओरडला 'नासिम कुठं आहे? नासिमला बोलवा. आज तोच शिडी लावील.'

खलाशात गडबड उडाली. इतक्या थोड्या दिवसांतच नासिमची दीक्षा पुरी झाली. चोरी करताना पकडला जाताच त्याचं दैव पालटलं आणि जे कधी पकडले गेले नाहीत ते अजून भाकऱ्या भाजताहेत. शिडीवरून डेकचं प्रमोशन काही त्यांना मिळालं नाही. आणि हा आज शिडी तर उद्या डेक, परवा नावाडी तर त्यानंतर सरळ सरदार, कॅप्टन, जहाजाचा सर्वेसर्वा होणार !

'पकड,पकड, अरे तो लहान मुलगा आहे. एकटा कसं सगळं करणार ? तुम्ही सगळे मिळून त्याला मदत करा.' करड्या आवाजात सरदार हुकूम सोडतो.

सर्च लाईटच्या प्रकाशात नासिमचे डबडबलेले डोळे चमकतात.

नवी नवरी लताबाडीला उतरून जाईल. पायातली जोडवी वाजवीत ती उतरतेय.

झाडाझुडपांच्या टोकापर्यंत दूरवर प्रकाश पसरलेला आहे. नासिमने शिडीचा दोर धरून ठेवलेला आहे.

'घसरून पडाल. दोर पकडा.'

'नको.'

दोर न पकडल्याने नव्या नवरीचे पाय थरथरू लागले. मागून कुणीतरी नासिमला धक्का मारला. चमकून बघितलं तर तोच माणूस होता. त्यानेच गर्दीत सर्वात जास्त मारलं होतं. आता कुठे उजेडात त्याला ओळखता आलं – गौहरअली !

गुलबानूने चेहरा उजेडातून बाजूला वळवला आहे. पदरदेखील तोंडावर बराच पुढे ओढून घट्ट धरला आहे. अंगावरची चादर बुरख्यासारखी घट्ट लपेटून घेतली आहे. घाटावर आपली, परकी सगळ्याच तऱ्हेची माणसं जा-ये करीत असतात.

नासिम ओढून ताणून शिडी उचलू लागला. एकापाठोपाठ एक काठी उचलू लागला. पैलतीराकडच्या पाण्यातल्या अंधुक सावलीत आपल्या आईचा मृत चेहरा शोधू लागला आणि वर उभा असलेला सरदार त्याला मनापासून शाबासकी देऊ लागला. त्याचा पांढरा कुडता व पांढरी दाढी वाऱ्यावर फडफडतेय. सूर्यासारखा वाटतोय त्याचा चेहरा !

# राणी पसंत

## अन्नदाशंकर राय

खूप दिवस वाट पाहिली तेव्हा कुठं लाँच मिळाली... तपासणीचं कितीतरी काम पडून राहिलं होतं. वर्ष संपायच्या आत ही कामं उरकायला हवीत. दोन्ही अंगांना नदीकिनारा, समोर लाल मातीच्या डोंगरमाथ्यांची रांग, कर्णफुलीच्या विशाल हृदयावरचं पाणी कापत कापत लाँच जाऊ लागली तेव्हा मन कसं कोण जाणे एकदम रोमँटिक व्हायला लागलं. बरोबर वही आणि पेन घेऊन निघालो होतो. खूप दिवसांनी कविता करणार होतो. लाँचवर फक्त सारंग सुरवानी, त्याची तुकडी, माझा चपराशी आणि खानसामा एवढेच होते. आणखी कुणाला आत येऊ द्यायचं नाही अशी सक्त ताकीद दिली होती.

आरामखुर्चीत पडल्या पडल्या आजूबाजूला पहात होतो. नांगर उचलला जात होता. इतक्यात दरोगासाहेब धाबऱ्याघुबऱ्या पळत येताना दिसले. हातात चिट्ठी होती. हे काय प्रकरण आहे? आता आणखी कुठली अडचण उपटली ही ? म्हणजे ठाणं सोडून मला जाऊच द्यायचं नाही असं ठरवलंय की काय या लोकांनी ? पण चिट्ठी उघडून वाचली तेव्हा कळलं की तसे काही नाही. कलकत्त्याहून कुणी मोठा पोलीस अधिकारी आलाय आणि त्यालासुद्धा माझ्याबरोबर जायचंय. तो आला तर मला अडचण नाही ना होणार? कारण नाहीतर त्याला एक दिवस चितगावलाच खोळंबून रहावं लागेल. पोलिसांची लाँच उद्यापर्यंत जायची नाही.

अडचण होणारच. पण बोलायचं कसं ? झालं ! आमचं काव्यलेखन इथेच बारगळले. मनातल्या मनात त्याच्या सात पिढ्यांचा उद्धार केला आणि उगाच हसल्यासारखं दाखवून म्हणालो, ''वा ! ते आले तर मला आनंदच होईल.'' दरोगासाहेबांनी खाडदिशी बुटांचा आवाज करून शिस्तीत सलाम ठोकला. पडल्या पडल्या माझ्या मनात आलं, नकार दिला असता तर काय बिघडलं असतं ? इतकं काय जरुरीचं काम होतं की एक दिवसाच्या खोळंब्याने न भरून येण्याजोगं नुकसान झालं असतं?

शिष्टाचाराच्या बाबतीत खानबहादुरासारखा दुसरा माणूस मिळायचा नाही. म्हणाले की, कृतज्ञता व्यक्त करायला बंगाली भाषेत शब्द मिळत नाहीत म्हणून आपण उर्दू, इंग्रजीचा आश्रय घेतोय. पंजाबी मुसलमान. वयाने कितीतरी मोठे. पण दाढी-मिश्या ठेवल्या नसल्याने लहान दिसायचे. शिवाय हसतमुख. मोठा उदार

मनाचा माणूस. मी साहित्यिक असल्याचं समजलं तेव्हा म्हणाले, ''आपली ओळख व्हावी अशी कधीपासून इच्छा होती. आज अनपेक्षितपणे योग जुळून आला. तुमच्या एकांतात व्यत्यय आणायची मुळीच इच्छा नव्हती. एक दिवस थांबायची तयारी होती. पण सुपरिंटेंडेंट साहेबांनी तुमच्या लाँचमध्ये ढकलून जबरदस्तीने पाठवलंच. शिवाय तुमच्या कानावर बातमी आली असेलच....''

''नाही बुवा. कसली बातमी ?'' थोडं आश्चर्य वाटून मी विचारले.

''खूप वाईट बातमी.'' माझ्या कानाशी तोंड आणून ते म्हणाले, ''तसं नसतं तर साहेब, ट्रंक कॉल येताच कलकत्त्याहून हा असा धावत कशाला आलो असतो ? छी, छी- अगदीच निर्लज्ज आणि बेशरम !''

साहजिकच मला उत्कंठा वाटू लागली. पण मनातून मी ओळखून होतो की खानबहादुर आपण होऊन नक्कीच सांगणार. म्हणून दुसऱ्यांच्या प्रकरणाबद्दल आपल्याला काडीचंही कुतूहल नाही असा नुसता आव आणला.

''अहो तुम्ही साहित्यिक सत्यम् शिवम् सुंदरम् हे सारखं प्रत्येक कथेतून रंगवत असता. पण माझ्या बेचाळीस वर्षांच्या अनुभवावरून सांगतो की जे सत्य असते ते सुंदर नसतं आणि जे सुंदर असतं ते शिवम् नसतं. कधी काळी मी कादंबरी लिहिली तर काय लिहीन सांगू ? मी लिहीन की सुंदर मुली बहुधा वाईट असतात आणि कुरूप मुली बहुधा सच्छिल असतात.'' असं म्हणून खानबहादुर खो खो हसायला लागले.

मी सुद्धा हसलो. पण म्हणालो, '' आमच्या बंगालमध्ये तरी तसं नाही.''

तेव्हा ते खिजवून म्हणाले, ''छे, छे, तुमच्या बंगालमध्ये तसं नाही. अहो दादा, बंगालमध्ये नोकरी करता करता माझे केस पांढरे झालेत. आणि आता राऊजानला चाललोय ते....''

''म्हणजे राऊजानला ?''

''होय, राऊजानला चाललोय ते राऊजान काय बंगालच्या बाहेर आहे होय ?''

बोलणं पुढे सरकू लागलं. मी खानसाम्याला बोलावलं तेव्हा खानबहादुर घाईघाईने म्हणाले, ''नाही,नाही, अहो दादा, आपणच आमचे पाहुणे !''

मी कसा काय बुवा यांचा पाहुणा ? लाँच माझी, पण माझं कोण ऐकतंय ? दुपारच्या चहाचीसुद्धा त्यांनीच ऑर्डर दिली. त्यावेळी सदर घाट मागे टाकून लाँच पुढे निघाली होती.

दोन आरामखुर्च्या जवळ जवळ मांडून आणि पर्वतरांगांकडे तोंड करून मी ऐकण्याच्या पावित्र्यात बसलो. खानबहादुर सांगू लागले, ''दादा, तो माणूस काही असातस्रा नव्हता. चांगला सर्कल इन्स्पेक्टर. एके काळी मी त्याचा पोलीस सुपरिंटेंडेंट होतो. त्याचं काम पाहून तारीफ करीत होतो. तो वेडा नव्हता की कवीही नव्हता - माफ करा हं बेअदबीबद्दल ! सच्छिल माणूस म्हणून त्याचा लौकिक होता. लक्षपूर्वक

काम करायचा. पोरीबाळीकडे ढुंकूनही बघत नसे. त्याचं लग्न झालेलं नव्हतं हे त्यातल्या त्यात बरं झालं. नाहीतर वाईट वाटण्यासारखीच गोष्ट घडलीय. तो एकाएकी नाहीसा झालाय-''

''नाहीसा झालाय ?'' मी एकदम चमकून विचारलं.

''म्हणून तर म्हणतोय की किती लाजिरवाणी गोष्ट आहे !'' रेशमी रुमालाने तोंड व डोळे पुसत खानबहादुर म्हणाले.

''खुनाच्या प्रकरणात तपासावर गेला होता. ब्रह्मदेशातली मुलगी होती. सैतानाची अवलाद. तो बंगाली मुसलमान. तिला त्याचं चांगलं कसं बघवणार ? रंगूनहून लग्न लावून तिला घेऊन आला होता. खून झाला त्या माणसाची गोष्ट सांगतोय तुम्हाला. इतकी सुंदर होती ती की ब्रह्मदेशातही तिच्या इतकी सुंदर बाई नसेल कुणी. आपल्याला सवत असल्याचं बघून तिथल्या तिथे तिने नवऱ्याच्या मानेत सुरी खुपसली.

मी थक्क होऊन ऐकत होतो. ''अहो पण सांगताय काय ? माझ्याकडे कशी आली नाही ही बातमी ?''

''कुणास ठाऊक ? त्याच तपासासाठी तो गेला होता. दरोग्याने चौकशी केली होती. पण मुलीला बंगाली समजत नाही म्हटल्यावर इन्स्पेक्टरलाच जायला पाहिजे. ती चौकशीच त्याचा काळ ठरली. तपासणी पुढे गेलीच नाही. नंतर कळलं की गुन्हेगारही जाग्यावर नाही आणि अधिकारीही जाग्यावर नाही-हा-हा-हा-''

हसण्यासारखी गोष्ट आहे का ही ? स्त्रीच्या अपहरणाच्या बाबतीत मी कधीही कुणाचीही गय केली नाही. म्हणून जरा रागावूनच विचारलं, ''इतके दिवस तुम्ही सर्वजण काय करीत होता ? त्याला पकडलं का नाही ? हा फक्त खात्याचा प्रश्न नाही. चांगली कोर्ट केस झालीय ही.''

खानबहादुर जरा कडक होऊन म्हणाले, ''कोर्ट केस होतेय की नाही हाच तर मुद्दा आहे. मुलगी विधवा. तेव्हा तिला फूस लावून नेल्याचा खटला होऊ शकत नाही. मुलीचं वय वाढलेलं म्हणून पळवून नेल्याचा खटलाही भरता येत नाही. आता सांगा, कोणत्या आरोपाखाली त्याला अपराधी ठरवायचं ?''

मी निरुत्तर झालो. उसने हसून खानबहादुर म्हणाले, ''समजा, त्यांनी लग्न केलं असतं तर ? पण नाही दादा, सोपं नव्हतं. कुणीही नोकरीवरून काढून टाकू शकलं असतं. कलकत्त्याच्या पोलीस ठाण्याच्या कचेरीतूनच तसा बंदोबस्त करता आला असता. पण मेलेल्या मढ्यावर तलवारीचा घाव घालायला आपला हात कापतोय. म्हणून अगोदर कायदा वाचून पहावा लागेल.''

खरंच होतं ते ! मोठा मासा हुलकावणी देऊन गळातून निसटला म्हणून मी कष्टी झालो. पण खानबहादुरला त्याचं काहीच वाईट वाटलं नाही. ते म्हणाले, ''आता कानावर बातमी आलीय की दोघं चितगावच्या डोंगराळ भागात लपून राहिलेत

आणि तिथून पुढे पायी चालत ब्रह्मदेश गाठायचा त्यांचा बेत आहे. त्या नंतर या सुंदरीचं प्रेम किती दिवस टिकेल कुणास ठाऊक ? एखाद्या माकडासारखं त्याला नाचायला लावून सळो की पळो करून सोडील, की स्वतःच त्याला लाथ मारून पळून जाईल हे कुणी सांगावे ? सुंदर चेहरा दिसला की मी लांबूनच त्याला सलाम करून पळ काढतो.''

कायद्याचं पुस्तक माझ्यापाशी नव्हतं. म्हणून कुणी जर त्या माणसाला परत आणलं तर त्याला कायद्यात शिक्षा आहे की नाही ते मी सांगू शकलो नाही. मनातून मात्र मी कमालीचा अस्वस्थ झालो. खानबहादुरांनी ते ओळखलं. म्हणाले, ''आम्ही पोलीस माणसं तेव्हा पोलिसाच्या बाजूनेच आम्हाला सहानुभूती वाटणार, किंवा आम्ही मुसलमान तेव्हा मुसलमानाबद्दलच आम्हाला सहानुभूती वाटणार असं कदाचित तुम्हाला वाटेल. त्यात तुमची चूक नाही. सध्या दिवसच तसे आले आहेत. पण खरं सांगतो, तसं मुळीच नाही. मी पुरुष म्हणून पुरुषाबद्दलच मला कणव वाटते. त्या मुलीनेच पुरुषाचं अपहरण केलंय हो.''

मी स्त्रियांचा कैवारी. त्यांच्या शब्दांचं खंडन केल्याशिवाय स्वस्थ बसवेना. म्हणालो, ''स्त्रियांबद्दल तिळमात्र सहानुभूती असलेला कुणीही स्त्रियांना कधीही दोषी समजणार नाही. दोष नेहमी पुरुषाचाच असतो. तरीसुद्धा कधी कधी कुणाचाच दोष नसतो. दोष असतो तो फक्त नशिबाचा !''

''हो, हो. आता कसं बोललात ? नियतीचाच दोष !'' खूष होऊन खानबहादुर बोलले. ''अगदी असाच नशिबाचा एक खेळ मी माझ्या ऐन तारुण्यात पाहिला आहे. ती घटना माझ्या एका मित्राच्या आयुष्यात घडली आहे. हा मित्र हिंदू. तुम्ही मनात म्हणाल, हे कसं काय बुवा ? कधीपासून हिंदू माणूस मुसलमानाचा मित्र झाला ?' पण आजच्यासारखं दूषित वातावरण वीस वर्षांपूर्वी नव्हतं. महायुद्ध संपल्यावर आम्ही दोघांनी लष्करातली नोकरी सोडून पोलिसात नोकरी मिळवली. तेव्हा कोण मुसलमान नि कोण हिंदू ? ते दिवस आता पुन्हा कधीच नाही का येणार ?''

त्यांचा आवाज दाटून आला. आठवणीच्या महासागरात ते वीस वर्षं मागे गेले. तिथे त्यांची संचित आणि पुरातन मदिराच जणू त्यांना गवसली. अन्यमनस्कपणे म्हणाले, ''खूप जुनी घटना आहे. मी सुद्धा विसरलो होतो. पण आज पहा पुन्हा आठवली. आणि आता प्रत्येक गोष्ट कशी लख्ख आठवतेय. इतकंच काय,पण आता सांगताना सगळं काही डोळ्यांसमोर स्वच्छ उभं रहातेय.''

मी वळून त्यांच्याकडे पहात राहिलो. हे खानबहादुरच आहेत की दुसरे कुणीतरी ? एक तरणाबांड नवजवान अर्धवट निद्रेत स्वप्न पहातोय. सोसाट्याचा वारा वहातोय आणि वाऱ्याला झुकांडी देऊन नाव पुढे धावतेय. कर्णफुलीचं पाणी दुभंगून एखाद्या फाडलेल्या कापडाच्या ताग्यासारखं दोन दिशांना सरकतेय. लाटा मागे पडत आहेत. त्यांच्या हिंदोळ्यावर मागे पुढे झुलत नाव पुढे. चालली आहे.

खानबहादुर सांगू लागले-

२

मेहरबानसिंग रजपूत घराण्यातला. आमचे पूर्वजही कधी काळी रजपूतच. कुणी काहीही म्हणो. रक्ताची ओढ म्हणून काहीतरी असतंच. मला रजपुतांबद्दल जितकी आपुलकी वाटते तितकी या देशातल्या मुसलमानांबद्दल काही वाटत नाही. कधीच वाटली नाही. तसं पाहिलं तर हिंदू धर्मावर आमची श्रद्धा नाही. धर्माची गोष्ट आली की आम्ही कडवे मुसलमान. तरी पण हे सारंग, सुखानी, चपराशी आणि खानसामा ही सर्व मला माझी आपली माणसं वाटतात, मेहरबानसिंग हा तर काय माझा दोस्तच होता.

त्याकाळी मला त्याच्यासारखा दुसरा कुणीही मित्र नव्हता. आम्ही रोज भेटायचो आणि भेटलो की तासन् तास आमच्या खास गप्पा व्हायच्या, स्वप्नं रंगायची. आम्हा दोघांनाही खेळायचा नाद. शिकारीचाही नाद होता आम्हाला. त्या काळी आजच्यासारखे चिक्कार सिनेमा नव्हते. आम्ही नोकरी करीत होतो त्या गावी अधूनमधून एखादा सिनेमा यायचा. पण तो थोडे दिवसच रहायचा. आम्ही दोघेही एकत्रच सिनेमाला जायचो. तमाशालाही बरोबरच जायचो. पण इतर अधिकाऱ्यांप्रमाणे गाणं ऐकण्यासाठी बाईजीच्या माडीवर मात्र आम्ही कधी गेलो नाही. अगदी प्युरिटन टाईप होतो आम्ही. त्याच्या लग्नाची बोलणी चालली होती आणि माझी बायको माहेरी होती. त्याला सुशिक्षित बायको हवी होती. पण त्या काळी मुलींना लिहायवाचायला शिकवायची पद्धत नव्हती.

तेव्हा असं झालं की पंजाबमधल्या त्या लष्करी ठाण्याच्या केंद्रात एक लष्करी कंत्राटदार होता. त्याच्यापाशी लाखो रुपये होते. पण आम्ही त्या ठिकाणी गेलो तेव्हा तो मरण पावलेला होता आणि त्याची संपत्ती त्याच्या दोन बायकांना निम्मी निम्मी वाटून दिलेली होती. मोठी बायको देवपूजेत गर्क असायची. धाकटी बायको चैनीत रमलेली असायची. दोघीनाही स्वतंत्र वाडे, दासदासी, नोकरचाकर, गाडीघोडे होते. दोघींच्या व्यवस्था अगदी स्वतंत्र आणि वेगवेगळी होती. लोक त्यांना थोरली राणी आणि धाकटी राणी म्हणायचे. कारण त्यांच्या नवऱ्याला राजाची पदवी मिळालेली होती.

आम्ही तिकडे गेलो म्हणजे धाकट्या राणीच्या सौंदर्याची कीर्ती आमच्या कानावर यायची. तिच्याइतकी लावण्यवती स्त्री कधी कुणी पाहिली नसेल असं लोक बोलत. तिची चालचलवणूक मात्र तशी चांगली नव्हती. ती पडदा पाळत नसे. क्लबात जायची. साहेबांच्याबरोबर नाचसुद्धा करायची. पोलीस ठाण्यावरच्या सर्व अधिकाऱ्यांना बोलावून पार्ट्या करायची. तिने एकदा नेसलेली साडी दुसऱ्यांदा नेसल्याचं कुणी पाहिलं नव्हतं. सल्वार कुडत्याचे जोडच तिच्यापाशी दोन पाचशे तरी असावेत. दुधाच्या सायीचे उटणे लावूनच बहुधा ती स्नान करीत असावी. किंबहुना

दुधाच्या हौदात बसूनच न्हात असावी. आणि दुसरे दिवशी तेच दूध बाजारात विकायला येत असावे.

गावात जोरदार अफवा होती की एखाद्यावर एकदा का तिची नजर गेली तर त्याची कुठलीही इच्छा पुरी केल्याशिवाय ती रहात नाही. मग तो कुणीही असो. त्याची तिला पर्वा नव्हती. तिला पैसा नको होता, बक्षीसही नको होते. फक्त तो माणूस तिला पसंत पडला पाहिजे. पण सहजासहजी कुणी पसंत पडत नसे. तिचे नाव होते सूरजभान.

नोकरीवर रुजू झाल्यावर दोनतीन आठवड्यांनी माझ्या नावावर सूरजभानकडून निमंत्रण आले. गार्डन पार्टीचे निमंत्रण.मेहरबानला विचारलं तर त्यालाही निमंत्रण आल्याचं कळलं. पण तो गेला नाही.का? कारण त्याला असल्या बाईशी संबंध नको होता.

मी त्याची जरा चेष्टा केली, ''एका जातीचा आंबा आहे. त्याचं नाव राणी पसंत. राणी पसंत व्हावं असं नाही वाटत तुला ?''

''मी काही आंबा नाही. मला मान, अभिमान आहे. अगदी अनादी काळापासून पुरुष पसंत करत आलाय. पसंत करायचा हक्क केवळ पुरुषाचा आहे. पण इथे ते नाही. सूरजभान मला बघणार, माझी पारख करणार, शक्य तर नापसंत ठरवणार...''बोलता बोलता त्याचं रक्त गरम झालं.

''का बरं ? स्वयंवराची प्रथा रजपुतांमध्येही होतीच की! मग?''

''हो. पण स्वयंवरात नापसंत झालेले लोक युद्ध करून प्राणांची बाजी लावत होते. पण ही कुठली तुलना ? एखाद्या उच्च कुलशीलाच्या कुमारिकेचे स्वयंवर कुठे आणि विलासिनीची चावट शिकार कुठे ?''

यावर मी त्याला जास्त छेडलं नाही, मी एकटाच गेलो पार्टीला. सूरजभान खरोखरच अप्रतिम सुंदर होती. मी काय तिचं वर्णन करणार! मी कवी थोडाच आहे तुमच्यासारखा? अंधाऱ्या रात्री आतषबाजीने आकाश उजळून निघावं, नाना रंगाचे तारे एकदम चमकावेत आणि हा सगळा गंधक व दारूगोळ्यांचाच खेळ आहे हे आपण क्षणभर विसरून जावं तसा प्रकार त्या जमलेल्या मेळाव्यात सूरजभानने प्रवेश केला तेव्हा झाला. ती येताच प्रत्येकजण स्वतःबद्दल जागच्या जागी एकदम सावध झाला. आरसा असता तर प्रत्येकाने आपलं तोंड पाहून घेतलं असतं. राणीला पसंत पडतोय की नाही कुणास ठाऊक? आपण राणी पसंत आहोत की नाही याचीच काळजी सगळ्यांना वाटू लागली.

त्यानंतर जेव्हा जेव्हा आमंत्रण आलं तेव्हा तेव्हा मी गेलो. राणी पसंत व्हायला नव्हे तर सहज आतषबाजी, रोषणाई पहायला गेलो. पण मेहरबानला घेऊन जाणं कठीण होतं. तो येत नव्हता आणि त्याला रहावतही नव्हतं, बदली करून घेऊन निघून जाणंही त्याला जमत नव्हतं. त्याचा अहंकार त्याला जाऊ देत नव्हता आणि

कुतूहल त्याला थांबवू शकत नव्हतं. कर्तव्याची जाणीव त्याला तिथून काम सोडून जाऊ देत नव्हती. त्याची ही तडफड मला समजत होती. मी त्याला म्हटलं, सुट्टी घेऊन घरी जा आणि लग्न कर.''

त्याने निमूटपणे ऐकून घेतलं. उत्तर दिलं नाही.

एक दिवस सूरजभानने माझ्यापाशी चौकशी केली, ''काय हो, मेहरबानसिंग तुमचे मित्र ना? ते का नाही येत? तुम्हाला नाही का त्यांना आणता येणार?''

काहीतरी सबब सांगून मी वेळ भागवून नेली. खरी गोष्ट कशी सांगायची? सदा सत्य बोलणं फक्त पाठ्यपुस्तकातच शोभतं. पण परत गेल्यावर मेहरबानला स्पष्टपणे सगळं सांगून टाकले. ते ऐकून तो भलताच बावचळून गेला. मला कळेना स्वारी खूष झाली आहे की रागावली आहे ? काय करणार आहे ? मला तसाच सोडून तो तडक फिरायला निघून गेला.

नंतर पाहिलं तर सूरजभानच्या पार्टीला हा हजर. मीच त्याची ओळख करून दिली. आरसा कुठून मिळणार? मिळता तर दिला असता त्याला. पण त्याची गरजच पडली नाही. सूरजभानचे डोळे हाच आरसा. त्या सुंदर काळ्याभोर डोळ्यांत मेहरबानला आपला आरक्त चेहरा दिसला असेल. निमिषार्धात केवढी उलथापालथ होऊन गेली. मला सोडून कुणालाच कळले नाही !

मेहरबानला सावध करावंसं वाटलं. पण धाडस झालं नाही. त्याचा चेहरा बघून मी हबकलोच. तो यंत्रासारखा कामावर जायचा. नीट काम करायचा. मला भेटण्यातही खंड पडला नाही. तरी आतून तो बदलत चालला होता हे निश्चित. स्वतःहून त्याने काही सांगितलं तर ऐकून घ्यायचं, पण आपण विचारायचं नाही असं मी ठरवलं होतं.

एका व्यक्तीसाठी त्याचं सारं शरीर पेटून उठत होतं. तिच्यासाठी सगळं मन उफाळून आलं होतं. पण तरी तो ते कबूल करीत नव्हता. तोंडाने वेगळंच बोलायचा. म्हणायचा, ''मला घृणा वाटते तिची. तिचं शरीर अमंगल, तिची संगत अमंगल. वेश्येपेक्षा काय ती वेगळी आहे? पैसे घेत नाही इतकाच फरक ना? मला कधी इच्छा झालीच तर मी सरळ एखाद्या गणिकेकडे जाईन. तिथे मला जास्त बरं वाटेल. पैसा मोजून मी उपभोग घेईन. का म्हणून मी सूरजभानच्या दाराशी जाऊन उभं रहावं? तिने मला पसंत करायची वाट पहावी? तिलाच माझा उपभोग घेऊ द्यावा? मी काय राणी पसंत आहे होय?''

किती दिवस ऐकलं त्याचं हे असलं बोलणं. त्याच्या मनात द्वंद्व चालू होतं. आणि काही केल्या मनाला शांतता वाटत नव्हती. आपण तिच्याकडे आकृष्ट झाल्याचं तो माझ्यापाशी कबूल करीत नव्हता. पण मला सगळं कळत होतं. मात्र मला सगळं समजल्याचं मी त्याला कळू देत नव्हतो. मी विचारलं, ''तुला कुणीही तिथं जायला भाग पाडू शकत नाही. आणि तू गेला नाहीस म्हणून कुणी रागावेल असंही नाही.

सूरजभान सर्वांना निमंत्रण पाठवते. तसं तुलाही पाठवते. तिला कोण पसंत आहे नि कोण नाही हे ती जाहीर थोडंच करते? ते सगळं इशाऱ्याने होऊन जातं. कित्येकदा एखाद्या संकेत स्थळी तिची गाडी येऊन उभी राहते आणि कुणाला तरी उचलून अदृश्य होते. कुणाकुणाकडे तिचं लक्ष आहे याविषयी संदेहच आहे. पुन्हा दुसऱ्याच जागी गाडी येऊन त्याला सोडून जाते.''

''काय पाजी बाई आहे! बदमाषातली बदमाष!'' मेहरबान खवळून शिव्या देई. ''पक्की डाकू, सैतान आहे बया.'' आणखी कितीतरी बोलायचा. ऐकवणार नाही इतके अर्वाच्य!

मी मग वाद घालायचो.

''तुझं तर काही नुकसान केलं नाही ना? मग तू का इतरांच्या भानगडीत नाक खुपसतोस? ही कुठली तुझी रीत?''

बऱ्याच दिवसांनी मेहरबान म्हणाला, '' त्या दिवशी तू म्हणालास ना की सगळं इशाऱ्यावर होऊन जातं म्हणून? बाजारात म्हणे एक लहान पुस्तक मिळतं. त्यात हाच इशारा असतो का?''

मी विचारलं, ''तुला कशाला हव्यात त्या उचापती ? तू तर जात नाहीस. का जायचंय तुला ?''

''मी जाईन होय ? त्या तसल्या घरी ? अशक्य ! माझं नाव मेहरबानसिंग आहे मेहरबानसिंग. आम्ही चौहान रजपूत आहोत म्हटलं रजपूत. काळ बदललाय म्हणून पोलिसात नोकरी करतोय. पण म्हणून काय स्वतःचा अधःपात करून घ्यायलाच हवा का? शेवटी तू सुद्धा मला नीट ओळखलं नाहीस. राठोड वंशाचाच तू !''

काय बोलणार यावर ? गप्प बसून ऐकून घेतलं. हा प्राणी रोजच्या रोज वेडापिसा होत होता. जे करायला त्याचं मन तळमळत होतं ते केलं तर त्याची मान खाली जात होती. आणि त्या सुंदर स्त्रीचे, त्या वाईट बाईचे आकर्षण तरी किती जबरदस्त! हवासा वाटलेला माणूस ती मिळवायचीच! लोहचुंबकाने लोखंड ओढावं तशी ती त्याला खेचून न्यायची.

माझं नशीब शिकंदर म्हणून मी तिला हवासा वाटलो नाही. पण मेहरबानवर त्या नशिबाने जादू केली होती. वशीकरण विद्या आहे असं म्हणतात. यापूर्वी मी त्या विद्येवर विश्वास ठेवला नव्हता. पण आता हळूहळू त्याचा प्रत्यय यायला लागला. मेहरबान माझ्या शेजारच्या घरात रहायचा. रात्री दहा वाजता तो फिरायला जायचा. आणि मध्यरात्र उलटून गेल्यावर परत यायचा. भकास सुकलेला चेहरा. नजर वेड्या माणसासारखी. असंबद्ध बोलणं. काय बोलायचा त्याला ताळमेळ नसायचा. नुसतं शब्दजंजाळ. अश्लील वाक्यांचा वर्षाव  हा प्रकार दिवसेदिवस वाढत चाललेला मला दिसत होतं.

त्याच्या घरच्या वडील माणसांना कळवून बोलावून घ्यावं असं वाटलं मला.

अजून प्रकरण हाताबाहेर गेलं नव्हतं. जे घडायचं ते घडलं नव्हतं. एखाद्या सुंदर मुलीशी लग्न लावून दिल्यास एका दिवसात तो ताळ्यावर येईल. नंतर सियाल-कोटहून बदली झाली आणि लाहोर किंवा अमृतसरला गेला की आतषबाजीसारखी सूरजभान कायमची मनातून विझून जाईल. पण मेहरबानच्या वडीलधाऱ्यांना कळवण्याचं धाडस मला झालं नाही. तो रागावला तर? तसा माणूस थंड डोक्याचा. पण रागावला म्हणजे कसलं भान रहात नसे.

त्यानंतर मेहरबानही माझ्याबरोबर सूरजभानच्या पार्ट्यांना येऊ लागला. इशाऱ्यावर सारं काही होऊ लागलं.

बरेच दिवस लोटले. मी परेडसाठी पोषाख चढवत होतो. पण मेहरबानने घोटाळा केला. डोळ्यात नुसता अंगार, चेहरा लालबुंद आणि शरीर थरथरतय. कडवटपणे म्हणाला, ''मेलो मी!''

याचा अर्थ काय ते मी ओळखलं. तरी पण भडकून ओरडलो, ''का? काय झालं?''

''मला बनवलं राणी पसंत!'' कळवळून म्हणाला तो.

"हे! हे काही बरं झालं नाही.'' मी गंभीर आवाजात म्हणालो. ''आणि त्याचा पुरावा दिसतोय की! तू परेडला दांडी मारलीस ती. असा वागलास तर नोकरी टिकवता यायची नाही तुला.''

दीर्घ निःश्वास सोडून तो म्हणाला, ''अगदी असहाय्य आहे मी! माझं नशीबच मला खेचून नेतंय. तू माझा मित्र. तू नाही का मला सल्ला देऊ शकणार?''

''सल्ला? मी काय सल्ला देणार?'' त्याच्याविषयी सहानुभूती वाटून मी खिन्न झालो होतो.

''किंमत द्यायची माझी तयारी आहे.'' कापऱ्या आवाजात तो म्हणाला," किंमत दिली नाही. तर मी गुलाम होईन नाही का? मग मला अब्रू ती काय राहील?''

मी विचार करून म्हटलं, ''अरे, तुझ्याकडून पैसे घ्यायला तिला काय कमी आहे? तू पन्नास रुपयांची भेट दिलीस तर तीच उलट तुला पाचशेची भेट देईल.''

''मी लाख रुपये देईन." मोठ्या आवेशाने तो म्हणाला, ''पण लाख रुपये आणू कुठून? कुणाच्या तिजोरीवर दरोडा घालू? सरकारी तिजोरी लुटली तर काय होईल?''

त्याचं बोलणं ऐकून मी घाबरलो. त्याच दिवशी सगळं काही व्यवस्थित लिहून त्याच्या घरी कळवून टाकलं. त्याच्यावर कडक पाळत ठेवली. अगदी त्याच्या नकळत त्याच्यावर टेहळणी करीत होतो. परेडला दांडी मारण्यासाठी तो आला की सरळ इस्पिळातच त्याला भरती करा म्हणून मी डॉक्टरांना सांगून ठेवलं होतं. पण त्याला मात्र यातलं काही सुद्धा कळू दिलं नव्हतं.

त्याला घरी घेऊन जाण्यासाठी त्याचा मोठा भाऊ आला. पण रजा

मिळाल्याशिवाय तो कसा जाणार? रजेसाठी अर्ज केला. रजा मंजूर होईपर्यंत थांबावं लागलं. तेवढ्यात एक विचित्र गोष्ट घडली. एक दिवस सकाळी उठतो तो कळलं की मेहरबानसिंग गायब. शोध केल्यावर कळलं की सूरजभानही बेपत्ता आहे.

सगळ्या गावभर बदनामी झाली. सूरजभानचे आषिक होते ते हाय हाय करू लागले. क्षणिक मोहापायी आयुष्याचं सगळं करियर मातीमोल झालं.

काही लोक मिटक्या मारीत बोलले, ''राजकन्या आणि अर्ध राज्य मिळाल्यावर आम्हीदेखील पळून गेलो असतो. आणि सूरजभान काही कमी बुद्धिमान नाही. पोरगा खानदानी तसाच देखणा पण!

मी भयंकर विषण्ण झालो. थोरला भाऊ अश्रू गाळत परत जायला निघाला, तेव्हा मी बराच दूरवर त्याला पोचवायला गेलो. तो म्हणाला, ''नशीब!'' मी उद्‌गारले, ''किस्मत!'' आम्हा दोघा हिंदु- मुसलमानांचं एकमत झालं. नशिबात असेल ते चुकत नाही.

महिन्यांमागून महिने उलटले. त्याची काहीच बातमी कळली नाही. इकडे सूरजभानच्या बंगल्यातही अंधार. ती कुठं गेली ते नोकरमाणसंही सांगू शकत नव्हती. मी माझ्या नोकरीत लक्ष घालू लागलो.

वर्षाभरानंतर पत्ता लागला. त्यावेळी मेहरबान अजमेरला होता. मला त्याने पत्र लिहिलं. अजमीर शरीफचा प्रसाद घ्यायला ये म्हणून. मी समजलो. याला आपला सल्ला पाहिजे. तयारी करून, सुट्टी घेऊन मी अजमेरला गेलो. मेहरबानने मला त्याच्या क्वार्टरवर नेलं. बघतो तर तिथे ती पण होती. पत्नीच्या रूपात वावरत होती. चक्क लाजत होती. माझ्याही समोर अर्ध्या बुरख्यात होती.

मेहरबानकडून कळलं ते सांगतो.

सियालकोटहून पळाल्यानंतर ती दोघं अनेक ठिकाणी जाऊन राहिली. पण जावं तिथे एकच प्रश्न उभा रहायचा. तुमचं नातं काय? पतिपत्नी? त्याला उत्तर म्हणून सूरजभान हो म्हणायची. पण मेहरबान तोंड मिटून गप्प बसायचा. त्याच्या तोंडून कधीसुद्धा बाहेर पडलं नाही की आम्ही पतिपत्नी आहोत. ते केवळ असत्यच नव्हे तर अप्रियही होतं. नातं न सांगितल्याने रहायला घर मिळेना, नोकर मिळेनात, मदत मिळेना आणि आजूबाजूच्या लोकांची सोबतही मिळेना. असं झाल्यावर वेश्या वस्तीत जाऊन रहावं लागण्याची वेळ आली. पण त्या सूचनेवर सूरजभान खूप संतापली. ती सुद्धा काही कमी स्वाभिमानी नव्हती. बाजारातली वेश्या थोडीच होती ती?

प्रत्येक ठिकाणी सर्वांना माहीत व्हायचं की या दोघांचं लग्न झालेलं नाही. एखाद्या तरुणांच्यां टोळक्याने उपभोगात आम्हालाही वाटा द्या म्हणून मागणी केली तर? सौंदर्यासारखी वस्तू जवळ असताना त्यात दुसऱ्याला भागी न देता उपभोग घ्यायला गेलं तर कोण सहन करील ते? धोंडे मारतील. पोलिसात तक्रार करायला

गेलात तर ते लग्नाचा दाखला मागतील. नाहीतर मोठी लाच मागतील. मेहरबान समजून चुकला की एकट्याने उपभोग घ्यायचा असेल तर केवळ ताकद असून चालणार नाही, मालकीसुद्धा असावी लागेल. सूरजभान त्याची विवाहित पत्नी असल्याचे प्रमाणपत्र दाखवावे लागेल.

रजपुताचा मुलगा आणि व्यापाऱ्याच्या विधवेशी लग्न करतोय? त्यातून ती खरीखुरी सतीसाध्वी असती तर गोष्ट वेगळी. छाती फुटेपर्यंत त्याला रडू कोसळलं. यातही त्यालाच मान खाली घालावी लागतेय. डोकं उठलं. मग काय धुळीत मिळून जायचं का? मेहरबानने विचार केला. पळून जायला मार्ग नाही. नोकरी मिळायची शक्यता नाही. गावी जाऊन शेती करायची म्हटलं तर अष्टौप्रहर मोठ्या माणसांकडून तिरस्काराची बोलणी खावी लागतील. आता कोण त्याच्याशी लग्न करील? आणि लग्नच झालं नाही तर स्त्रीचा सहवास कसा मिळणार? मग काय या वयातच संन्यास घ्यायचा?

पळून जायचं नसेल तर दोनच मार्ग उरतात. लग्न करायचं किंवा इतरांची भागीदारी खपवून घ्यायची. या दोन्ही गोष्टीबद्दल त्याला सारखीच घृणा वाटत होती. आणि सूरजभानला? तिला दोन्ही गोष्टीबद्दल सारखीच ओढ वाटते अशी मेहरबानची कल्पना होती.

पण जिवात जीव असेपर्यंत तो भागीदारी करणार नव्हता. मग प्राण गेला तरी बेहत्तर लग्नाचं नुसतं नाव काढलं तरी त्याचे डोळे लाल व्हायचे. छाती धडधडायची. आपल्या जातीचा, कुळाचा अभिमान, पुरुषार्थाचा अभिमान, नीतीच्या कल्पना या सर्वांचा चक्काचूर होईल असे त्याला वाटायचे.

भाग पडलं म्हणूनच! नाहीतर त्याने काहीही झालं असतं तरी लग्न केलं नसतं. लग्न? रंडकीबरोबर लग्न? वाण्याच्या मुलीशी लग्न? पतितेशी लग्न? वाटणीदारांचा दावा चुकवण्यासाठी तो लग्नाला तयार झाला. कुणाशी भागीदारी न करता त्याला सुख पाहिजे होतं. एकट्याचा हक्क अविभक्तपणे भोगता यावा म्हणून तो तयार झाला.

लग्न करताच त्याने बजावले, गोषात राहिलेच पाहिजे.

सूरजभानला ते मान्य नव्हते. पण लग्न झाल्यामुळे मनातल्या मनात तिला खूप कृतार्थ वाटत होतं. रजपुताने आपल्याशी विवाह करावा हे तर तिचे बालपणापासूनचे स्वप्न आणि ही अलौकिक गोष्ट घडून आल्यावर मग थोडे कष्ट सहन करायला नको का?

बायकोला गोषात अडकवून मेहरबान निश्चिंत झाला. आता नोकरीसाठी खटपट करायला हवी. त्यासाठी पंजाबच्या बाहेर जायचं त्याने ठरवलं. तिथे लपवाछपवी करायची गरज नाही. सरळ स्वतःची ओळख दिली तरी काम होऊन जाईल. फिरत फिरत स्वारी अजमेरला येऊन पोचली. त्याचं युद्धातलं रेकॉर्ड पाहून रेल्वेत नोकरी

मिळाली. पगार फारसा नव्हता. पण कुणाची भीक नव्हती.

इथे एक नवीन समस्या उभी राहिली. रेल्वेच्या नोकरीत महिन्याचे वीस दिवस फिरतीवर. बायकोला बरोबर घेऊन जाता येत नाही. एकटी ठेवावी तरी काळजी. कारण हे सात राजांचं धन आणि माणिकमोती घरात ठेवून आपण रात्र बाहेर काढतो याची कुणकुण लागली तर कुणीही घरफोडी करील आणि घरातले सामानसुमान, कापडचोपड गेले म्हणून पोलिस ठाण्यात तक्रार नोंदवावी लागेल. कारण खरी चोरी कशाची झाली ते थोडीच सांगता येईल? आणि ज्याची चोरी झाली तो त्यावेळी दौऱ्यावर असायचा.

असं झालं तर मेहरबानने काय करावं? घर सांभाळावं की बायको सांभाळावी? सूरजभानला कसलीच चिंता नव्हती. आपल्याला प्रतिष्ठा मिळाली यातच ती मशगूल होती. ती राजपुत्र मिळवण्याचं स्वप्न पहात होती आणि तिला राजपुत्र मिळाला होता. पण मेहरबानने थोडंच हे स्वप्न पाहिलं होतं?

म्हणून सल्ला देण्यासाठी मला अजमेरचं बोलावणं आलं होतं.

त्याने लग्न केलं हे ऐकून मी खरोखरच खूष झालो. मी मुसलमान. माझा तेव्हा संसार नव्हता. मेहरबानला राग येईल म्हणून मी सुरुवातीपासून त्याला असा सल्ला दिला नव्हता. आता माझा सल्ला न घेताच त्याने लग्न केलं ते उत्तमच झालं. पण आता हा असा संशयग्रस्त का व्हावा ते मला कळेना. संशयाने का पछाडला जावा? जन्मभर जिच्याशी संसार करायचा आहे तिच्यावर पदोपदी अविश्वास दाखवून कसं चालेल?

यावर मेहरबानचं उत्तर मिळालं, ''ती भलतीच सुंदर आहे. सुंदर नसती तर मला तिचा संशय आला नसता. कुरूप असती तर विश्वास ठेवणं सोपं झालं असतं.''

समजलं. सौंदर्याची त्याला भीती वाटत होती. ही भीती जाणार कशी? सातआठ मुलं व्हायला हवीत? की बायकांची आजारपणं तिला यायला हवीत? की तारुण्य संपल्यावर भीती जाईल? या सगळ्यांना वेळ लागणार. सूरजभान आमच्या वयाची. अकाली वृद्ध होण्याची तिला मुळीच घाई नव्हती.

मी म्हटलं, ''बाबा रे, दुसरं काही कर, पण बायकोच्या वाईटाची इच्छा करू नकोस. तुझ्या एखाद्या देवतेने तुझी ही इच्छा पुरी केली तर तुलाच भोगावं लागेल.''

त्याचे एकंदर लक्षण ठीक दिसले नाही. एखाद वेळेस ॲसिडसुद्धा फेकायचा अशी भीती मला वाटली. आणि ते ॲसिड चुकून अपघातानेच पडलं असा बनावसुद्धा घडवून आणायचा. म्हणून मी त्याला कडक शब्दात ताकीद दिली. पुरता शहारून गेलो होतो मी. 'हे बघ, त्यापेक्षा तू तिला घटस्फोट दे. नाहीतर टाकून दे तिला.''

पण तेही मानायला तो तयार नव्हता. मला म्हणाला, ''पोलिसात नोकरी असती तर पगार, वरची कमाई आणि निवृत्तीवेतन मिळून आतापर्यंत मी लाखो रुपये कमावले असते. खर्च वगैरे जाऊनही माझ्यापाशी निदान लाख रुपये शिल्लक राहिले

असते. तेच लाख रुपये मी तिला दिले समज. मी काही तिला फुकट घेतली नाही. मग मी का तिला घटस्फोट देऊ? आणि का सोडून जाऊ? नशिबाने आमची एकत्र गाठ बांधली आहे.''

माझ्या मनात एकदम एक विचार चमकून गेला. म्हणालो, ''ठीक! हे लाख रुपये तिने तुला परत केले तर तू तिला सोडशील का?"

तो पार गोंधळून गेला. आ वासून माझ्या तोंडाकडे पहातच राहिला. त्याला काय वाटलं कुणास ठाऊक ? पण म्हणाला, ''थट्टा करतोस ?''

''नाही, ही थट्टा नाही.'' मी आणखी कडकपणे बोलतो. ''हाच एक सोयीस्कर मार्ग आहे.''

आर्त कंठाने मेहरबान म्हणाला, ''ही कल्पना तू तिला सांगितलीस तर खरंच ती लाख रुपये माझ्या तोंडावर फेकील आणि तसं झालं तर मी तिला विकला गेलोय असं होईल, राणी पसंत?

त्याच्या मनात आलं की सूरजभानला आपली मालकीण होऊ द्यायचं नाही, उलट आपणच तिच मालक व्हायचं, मग ती सुंदर प्रेयसी राहणार नाही. कुरूप पत्नी असेल. तसं झालं तर तो निश्चिंत होईल. त्याला कसला त्रास रहाणार नाही. पण सूरजभानला मात्र ही गोष्ट कळता कामा नये.

ख्वाजा साहेबांच्या दरग्यावर नजराणा ठेवून मी अजमेरहून निघून आलो. त्यानंतर काही दिवसांनी सूरजभानचा बंगला रोषणाईने सजलेला पाहून मी चकित झालो. काय झालंय? झालंय तरी काय? राणी परत आली आहे? आणखी दुसरं कुणी आलं आहे? नाही. आणखी कुणी आलेलं नाही. कोण येणार?

३

खानबहादुर सांगू लागले, ''त्यानंतर मेहरबानची माझी भेट नाही. पत्रव्यवहार नाही. पंजाबमधून बंगालमध्ये बदली होऊन मी आलो. बदली नाही, पण गुप्तचर विभागात नेमणूक झाली माझी. तेव्हापासून याच भागात आहे मी. माझ्या माहितीप्रमाणे हाच शेवट आहे.''

''हाच शेवट?'' माझी जिज्ञासा गप्प बसू देईना. ''सांगा ना पुढे काय झालं? सूरजभानचं काय झालं? मेहरबानचं काय झालं?''

होडी सपासप पाणी कापत चालली होती. पाण्याचे तुषार अंगावर येत होते. मध्येच केव्हातरी चहापान उरकलं. रात्रीच्या जेवणाची ऑर्डर मी दिली. खानबहादुर माझे पाहुणे होते. ''आता सांगण्यात काही मौज नाही. माणसाची पारख करता करता मी म्हातारा झालो. पण त्यावेळेला मला पारख नव्हती. म्हणूनच मी गोंधळून गेलो.''

''कशाने? का?''

''त्या माणसाने खरंच बायकोवर ॲसिड फेकलं हो! एक थेंब तिच्या अंगावर की मानेवर पडला. त्यामुळे सूरजभानने पार्टी द्यायचं वा बाहेर पडायचं बंद केलं. खूप नुकसान झालेलं नाही तसं. तिच्यापाशी जवळ जवळ लाख रुपयांचे दागिने होते. ते सगळे मेहरबानच्या हातावर ठेवून एक दिवस तिने धावत स्टेशन गाठलं. तिथून थेट

सियालकोट.''

मला शिसारी आली. ऐकवेना. कानावर हात ठेवले. पुढचं ऐकायची इच्छा नव्हती.

''मेहरबानला तर दागदागिने सांभाळायचीच चिंता. घाई करून जायचं कसं? काय धरावं? अधिक मूल्यवान कोण? कनक की कांता? वख्ताचा विचार केला तर कनकच मूल्यवान.'' खानबहादुरांच्या स्वरात खिन्नता दिसली. मला वाटलं की त्यांची सहानुभूती स्त्रियांच्या बाजूला असणार. मी फक्त हात झटकला.

पण माझा अंदाज चुकला.

काळोख भरून आला होता. पोचायला अजून वेळ होता. जेवायलाही अवकाश होता. गोष्टच संपली तर पुढे काय करायचं? कानावरचे हात बाजूला केले.

खानबहादुर म्हणाले, ''झालं ते ठिकच झालं दादा. मेहरबानने एखाद दिवशी तिचा खूनसुद्धा केला असता. सुंदर स्त्रिया चंचल बनतातही. एखाद दिवशी तिने गडबड केली असती तर प्राण गमावून बसली असती. वाचली हेच पुष्कळ झालं. ॲसिडच्या डागामुळे तिचा सुंदरपणा थोडा कमी झाला असेल. तर तिने ती आपल्या पापाची शिक्षा समजावं.''

मी काही बोललो नाही. पापपुण्यावर माझा विश्वास नव्हता. आणि पाप करणाऱ्याने पापाची शिक्षा द्यायची हे मला कसं सहन होणार? मेहरबान काय कमी पापी होता?

''विचार करून पहा,'' खानबहादुर समजावू लागले. ''बाईचं नुकसान झालं का? नुकसान झालं ते पुरुषाचं. दागदागिन्यांनी त्याचं नुकसान भरून आलं का? त्याचं नुकसान भरून येण्यासारखं नाहीच. नोकरी असती तर आतापर्यंत तो डी.आय.जी. जरी नाही तरी आय.जी. नक्कीच झाला असता. अरेरे! काय त्याचं नशीब! नशिबात असेल ते चुकत नाही. रेल्वेमधली ती नोकरी तरी कुठे टिकवू शकला? लाख रुपयांचे दागिने हातात पडल्यावर डोकं फिरलं. तेच दागिने देजमध्ये मोजून त्याने लग्न केलं. राजपुतान्यातील एका मोठ्या खानदानी सरदार घराण्याशी संबंध जुळून आला. ते लोक इंग्रजांची चाकरी करू देईनात. त्यांनी देशी संस्थानिकाच्या फौजेत त्याची भरती करून दिली. त्यात हुद्याशिवाय काय असतं हो?''

मी गप्प बसलो. काय बोलावं सुचेना.

''आता या आमच्या इन्स्पेक्टरचीच गोष्ट घ्या ना. हा आणखी एक राणी पसंत. मुलगी अतिशय सुंदर नाही का? सुंदर असली की ती वाईट असायचीच. त्यात आश्चर्य वाटायचं काय कारण? ती जितकी वाईट तितकीच सुंदर! खानबहादुरांनी दीर्घ निःश्वास सोडला !

# बेपत्ता
## प्रेमेंद्र मित्र

काय रद्दी दिवस आहे! थंडीच्या दिवसात ढगाळ हवेसारखी बेचैन करणारी दुसरी वस्तू नाही. नीट पाऊस कोसळावा तर तसंही नाही. ढगांनी झाकाळलेलं आकाश आणि म्लान धरती प्रेतवत् निपचित आहेत. आज तर अचानक सोमेश आला नसता तर दुपारचा वेळ कसा गेला असता ते सांगणे कठीण आहे. पण सोमेशला देखील आज काय झालं होतं कुणास ठाऊक!

वर्तमानपत्र एक–दोनदा उलटंपालटं करून सोमेशच्या समोर टाकत मी म्हटलं, 'एक विचित्र गोष्ट पाहिलीस?'

'काय?'

'आजच्या वर्तमानपत्रात बेपत्ता लोकांविषयी एकदम सात–सात जाहिराती आलेल्या आहेत.'

सोमेशनं कसलंही कुतूहल दाखवलं नाही. बसला होता तसाच उदासपणे सिगारेटचा धूर सोडत बसून राहिला. निःस्तब्ध खोलीत धुराची वलयं काय ती हळूहळू चक्राकार वर जात राहिली. बाकी सारं काही निश्चल, निस्तब्ध! बाहेरचा कुंठितपणा जणू आमची मनं आच्छादून टाकत होता.

अस्वस्थ करून सोडणारी ही निस्तब्धता भंग करण्याच्या दृष्टीनंच मी बोलायला सुरुवात केली, पण हरवलेल्या लोकांच्या ह्या जाहिराती बघून मला हसायला येतं. बहुतेकांच्या बाबतीत काय वस्तुस्थिती असते माहीत आहे? समजा, एखादा मुलगा सिनेमा बघून रात्री उशिरा घरी परत आला. तू हल्ली बऱ्याच वेळा करतोस ना तसंच. बऱ्याच दिवसांपासून रोज वडिलांनी जेवायला बसताना आईला विचारलं आहे, 'कुठे गेलेत तुमचे दिवटे चिरंजीव?'

मुलाच्या हट्टावरून संध्याकाळीच आईनं त्याला आपल्याजवळ लपवून ठेवलेल्या खजिन्यातून काही पैसे काढून दिलेले असतात. म्हणून तिला समजून उमजून खोटं बोलता येत नाही. ती गप्प राहते.

वडील बोलत राहतात– 'इतकी रात्र झाली तरी अजून महाशयांची घरी परतायची वेळ झाली नाही. गेल्या वर्षी नापास होऊन दिवे लावले होतेच. आता या वर्षी देखील कसले पांग फेडणार आहेत ते दिसतंच आहे. माझे पैसे तर गारगोट्याच आहेत नाही का, म्हणून वाटेल तसे उधळताहेत. हाकलून देईन लेकाला, यावेळी

नक्कीच त्याला घराबाहेर हाकलून देईन.'

या लांबचलचक भाषणानंतर या प्रकरणावर कदाचित् पडदा पडला असता. पण नेमक्या त्याच क्षणी गुणी चिरंजीव तेथे अवतीर्ण होतात.

वडिलांना राग आवरता येत नाही. आपला वरचष्मा राखण्यासाठी देखील काही बोलणं जरुरी आहे.

अखेर ते म्हणतात, 'अशा मुलापेक्षा मी निपुत्रिक असतो, तर बरं झालं असतं. जा, चालता हो.'

मानी मुलगा आणखी काही न का करीना, पण पितृदेवाच्या या आदेशाचं मात्र मोठ्या तत्परतेनं पालन करतो.

या प्रसंगी कोणता पक्ष ग्रहण करावा ते बापड्या आईच्या लक्षात येत नाही. म्हणून ती कातरपणे इतकंच फक्त म्हणते, 'अहो, पण जेवायच्या वेळी या सगळ्याची काय जरूर आहे? काय सांगायचं असेल ते नंतर सांगा म्हणजे झालं.'

वडिलांच्या रागाचा मोहरा आता आईकडे वळतो, 'तूच याला पाठीशी घालून बिघडून टाकलंस. तुझ्या लाडानंच हा हाताबाहेर गेला.'

आई पदरानं डोळे टिपू लागते. मुलगा एकटाच या अफाट विश्वात प्रवासाला निघतो.

दुसऱ्या दिवशी भयंकर कांड घडून येतं. आईनं रात्रीपासूनच अन्नाला हात लावला नाही. आजदेखील अंथरुणातून उठेलसं वाटत नाही. वडिलांचा देखील रात्रभर डोळा लागलेला नाही. पण बोलायचं काय नि कुणाला?

बायकोवर डाफरतात, 'हे फुकाचं अश्रू गाळणं बंद करा आता. हे असले दिवटे गेलेलेच बरे!'

आईच्या रडण्याचा स्वर उंचावतो.

वडील आता दात–ओठ खात कदाचित आपल्याच मनातली आशा व्यक्त करीत म्हणतात, 'कायमचा गेला असता तरी पिच्छा सुटला असता. पण बघच तू, नाक घासत येईल थोड्या वेळात परत. बिनपैशाची असली खानावळ त्याला मिळणार आहे कुठे?'

आई भिजलेल्या स्वरात म्हणते, 'या कडाक्याच्या थंडीत पोर रात्रभर कुठे पडलं असेल कुणास ठाऊक! मला तर भीती वाटते, काही भलतंसलतं नाही ना होणार?'

'काय भित्री आहेस?' वडील आईचं बोलणं थट्टेवर उडवून लावतात, 'तुझ्या पोराला काही झालेलं नाही, समजलीस? असेल एखाद्या मित्राच्या घरी. नड लागली की येईल झक्कत.'

आईचे अश्रू थांबत नाहीत. 'तुम्हाला तर माहीतच आहे, तो किती मानी आहे.'

रागावून वडील निघून जातात. संध्याकाळी ऑफिसमधून परतल्यावर त्यांना दिसते की परिस्थिती आणखीच बिघडलेली आहे. मुलगा अजून परतलेला नाही.

आईनं अंथरुणातून बाहेर न पडण्याची शपथ घेतली आहे.

'तू काही सुखानं जगू द्यायची नाहीस. यापेक्षा वनवास बरा.' वडील वैतागतात आणि उठून सरळ वर्तमानपत्राच्या कार्यालयात पोचतात.

वर्तमानपत्राच्या कार्यालयातलं काम मोठं गुंतागुंतीचं असतं. कुठे काय चाललंय् याचा थांगपत्ता लागत नाही. किंकर्तव्यविमूढ होऊन थोडा वेळ इकडे तिकडे भटकल्यावर एका खोलीत शिरून भाबड्या चेहऱ्याच्या एका माणसाला मोठं साहस करून विचारतात, 'आपल्या वर्तमानपत्रात अमुक अमुक बातमी द्यायचीय्.'

भाबड्या चेहऱ्याचा तो माणूस अचानक डोकं वर करून उपरोधिक स्वरात बोलतो, 'बातमी? का? आमच्या बातम्या तुम्हाला पसंत नाहीत? आम्ही इतके दिवस काय रामायण छापत बसलो आहोत?'

वडील हतप्रभ होऊन असहायपणे चहूकडे नजर टाकतात. जवळच बसलेले एक गृहस्थ, जे चेहऱ्यावरून खूप कठोर वाटत होते तेच, सहानुभूतीनं म्हणतात, 'अरे, त्यांना काय म्हणायचंय ते नीट ऐकून तर घे. बसा आपण.'

वडील एका खुर्चीवर स्थानापन्न झाल्यावर, ते विचारतात, 'काय बातमी देत होता आपण?'

'अं– खरं म्हणजे बातमी नाही, ही – ही छोटी जाहिरात द्यायची होती.'

'जाहिरात? कसली जाहिरात? किती जागा हवीय? मजकूर आणालाय?'

वडील पुन्हा गोंधळून म्हणतात, 'खरं म्हणजे जाहिरात नाही. त्याचं असं आहे की, माझा मुलगा घरातून निघून गेलाय.'

त्यांना बोलणं पुरं करावं लागत नाही. टेबलाच्या दुसऱ्या बाजूनं ते सज्जन म्हणतात, 'समजलं. बेपत्ता! काय द्यायचंय – चेहऱ्याचं वर्णन की परत येण्याची विनंती?'

इतक्या वेळानंतर आता कुठे आधार मिळाल्यासारखे वडील म्हणतात, 'हो, हो, परत येण्याची विनंतीच! त्याची आई सारखी रडतेय.'

'समजलं, समजलं, रुसून निघून गेला का?' ते गृहस्थ कागदाचं एक पॅड वडिलांपुढे सरकवून म्हणतात, 'हं, लिहा याच्यावर.'

'लिहू?' वडिलांच्या चेहऱ्यावर संकटात सापडल्याचा भाव स्पष्टपणे दिसून येतो.

त्या गृहस्थांना दया येते. म्हणतात, 'ठीक आहे. आम्ही स्वतःच लिहून टाकू. तुम्ही फक्त नाव पत्ता वगैरे सांगा.'

नाव–पत्ता वगैरे माहिती देऊन जाता जाता वडील विनंती करतात, 'जरा व्यवस्थित लिहा बरं का. त्याच्या आईनं कालपासून अन्नपाणी वर्ज्य केलं आहे.'

'काही काळजी करू नका. असं लिहू की, वाचताना तुमचा मुलगा ओक्साबोक्शी रडायला लागेल.'

वडील निश्चिंत होऊन घरी परत येतात. पण डोळे पाझरायला लावणारी ती

जाहिरात प्रसिद्ध होण्यापूर्वीच त्यांना दिसतं की मुलगा घरी परत आला आहे. पश्चात्तापानं तो घरी आला आहे किंवा घरी राहण्यासाठी परतून आला आहे असं मात्र समजू नका हं! कायमचं जाण्यापूर्वी आपली पुस्तकं न्यायला तो आला आहे.

या वेळी आईचा रागीट स्वर ऐकू येतो, 'जा, जा, नीघ. कुलांगार कार्टं कुठलं! जगात कुणी कधी बोलणी खाल्लीच नसतील. तूच एक तेवढा मोठा साहेब आला आहेस. काल रात्रभर डोळ्याला डोळा लागला नाही, माहीत आहे? काळजीनं त्यांचं तोंड कसं सुकून गेलं आहे, जरा बघ तरी.'

त्याचवेळी वडील आत येऊन कातर स्वरात म्हणतात, 'अग, अग, का उगाच ओरडतेस?'

आई दटावते, 'तुम्ही गप्प बसा बघू. इतके लाड करणं बरं नाही. जरा चार शब्द बोललं तर त्यात घर सोडायला काय झालं? याची ही मजल?'

बेपत्ता होण्याऱ्याविषयी ज्या जाहिराती येतात त्यांच्यापैकी बहुतेकांचा इतिहास हा असा असतो. मी बोलणं संपवलं.

एव्हाना सोमेशची सिगारेटही संपली होती. त्यानं इतका वेळ माझं बोलणं ऐकलं असेलसं वाटत नव्हतं. इतका वेळ तो अजिबात हलला-डुलला नव्हता. मी जरा चिडूनच म्हटलं, 'तुला काय झालं आहे? मी काय उगाच बडबडतोय?'

याचं काही उत्तर न देता सोमेश पाय आखडून बसला आणि सिगारेटचं थोटूक फेकून देत म्हणाला,

'तुला ठाऊक नाही. या जाहिरातीमागे कित्येकदा खरोखरीची शोकांतिकाही असते.'

'असेल. मी ते अमान्य करत नाही. कधी कधी खरंच जाणार माणूस परतून येत नाही.'

सोमेश थोडासा हसला. म्हणाला, 'छे, छे, मला तसं म्हणायचं नव्हतं. परत येण्याचीच एक शोकांतिका मला माहीत आहे.'

मी उत्सुकतेनं त्याच्या चेहऱ्याकडे पहात विचारलं, 'कोणती?'

बाहेर पुन्हा पावसाला सुरुवात झाली होती. काचेतून पलीकडचे रस्ते आणि घरं अस्पष्ट व अवास्तव भासत होती. साऱ्या जगापासून आपण वेगळे पडल्यासारखं वाटत होतं.

सोमेश सांगू लागला –

'वर्तमानपत्राच्या जुन्या फायली चाळल्यास तर तुला दिसेल की बऱ्याचं बर्षापूर्वी इथल्या एका प्रमुख दैनिकात रोज एक जाहिरात येत असे. ती नुसती जाहिरातच नव्हती तर एक संपूर्ण इतिहास होता. रोज क्रमबद्द रूपात वाचल्यावर जणू एक कथाच समजत होती. छापील अक्षरावर कान ठेवताच जणू एक कातर आर्तनाद ऐकू येईल असं वाटायचं. ती जाहिरात देखील हरवलेल्या व्यक्तीबद्दलच होती. सर्वात

अगोदर मुलानं परत यावं म्हणून आईनं केलेली करुण विनंती पाहण्यात आली. अस्पष्ट आणि गोंधळलेली भाषा, पण त्यातूनही हृदयस्पर्शी व्यथा व्यक्त होत होती. वाचल्याखेरीज समजणार नाही ती! हळूहळू आईची ती व्याकुळ विनंती हताश निःश्वासासारखी वर्तमानपत्राच्या पानांमधून नाहीशी होत चालल्याचं दिसून आलं. त्यानंतर ऐकू आला वडिलांचा गंभीर स्वर. तो कापरा असला तरी दृढ आणि शांत होता – 'शोभन, परत ये. तुझी आई अंथरुणाला खिळली आहे. तुला आपल्या कर्तव्याची जरा देखील जाणीव नाही का?'

पण जाहिरात येण्याचं त्यानंतरही थांबलं नाही. वडिलांचा स्वर जणू जड होऊ लागला होता, त्यांचा गळा भरून आल्यासारखं वाटत होतं. 'शोभन, अजूनही तू आला नाहीस तर आईची भेट काही व्हायची नाही.'

पण यानंही शोभनचं हृदय विरघळलं नाही असं वाटतं. जाहिरात रोज प्रसिद्ध होतच होती. आता स्वतःवर ताबा ठेवणं वडिलांना कठीण जात असल्याचं वाटत होतं. यावेळी त्यांच्या स्वरात कातरता होती, नुसती कातरताच नव्हे, तर दुबळेपणा देखील– 'शोभन, आम्ही कसे दिवस घालवत आहोत ते तुला ठाऊक नाही. ये, आता जास्त छळू नकोस.'

हळूहळू ती जाहिरात म्हणजे हताश क्रंदन झालं. त्यानंतर त्यात अचानक बदल झाला. शोभनला उद्देशून त्यात काही सुद्धा म्हटलं नव्हतं. फक्त एक सामान्य जाहिरात होती. अमुक चेहऱ्याचा, अमुक वयाचा, अमुक प्रकारचा एक मुलगा, गेले वर्षभर त्याचा काही पत्ता नाही. माहिती देणाऱ्यास इनाम देण्यात येईल. पारितोषिकाची रक्कम वर्तमानपत्राच्या पानांवर हळूहळू वाढू लागली. 'सुदृढ बांध्याचा, एक सोळा–सतरा वर्षाचा मुलगा. ओळखण्याची खूण – मानेवर उजव्या कानापाशी एक मोठा चामखीळ. तो जिवंत आहे की नाही एवढी माहिती जरी कुणी दिली तरी त्यास पारितोषिक देण्यात येईल.'

सोमेश थोडा वेळ स्तब्ध झाला. पावसाच्या थेंबांनी काच एकदम अंधुक झाली होती. खोलीत गारठ्यामुळे एखादं ब्लँकेट वगैरे पांघरलं तर बरं असं वाटत होते.

मी म्हटलं, 'हे झालं जाहिराताख्यान ! खऱ्या गोष्टीविषयी काही माहीत आहे का?'

'माहीत आहे. शोभन माझ्या ओळखीचा होता. तो कसल्या तरी घमेंडीमुळे घर सोडून आला होता असं मात्र समजू नकोस हं! घर सोडणं त्याच्यासाठी फार सोपं होतं. कुठलं का कारण मग त्यासाठी मिळेना! जगात काही दोन–चार मोजकी माणसं निर्लिप्त मन घेऊनच जन्माला येतात. गुळगुळीतपणामुळे ते कधी हातात सापडत नाहीत. त्यांच्या मनावर कुठल्याही गोष्टीचा परिणाम होत नाही. तुला आश्चर्य वाटेल, पण जाहिरातींची माहिती मिळूनही त्यानं कसलीच हालचाल केली नाही. एखादवेळी जाहिरातीकडे लक्ष गेलं तरी मग तो अगदी सहज ती विसरून

जायचा. घराबाहेर तो ज्या अडचणीत आणि कष्टात दिवस घालवत होता त्यात त्याच्या जागी जर दुसरा कुणी असता तर अगदी त्रासून गेला असता. पण शोभनला मात्र त्यात स्वातंत्र्याचा आनंद मिळत होता. इतरांना काही का वाटेना, पण एका छोट्या कुटुंबातील लाडका मुलगा म्हणून जगणं त्याला मान्य नव्हतं. पण ज्या दिवशी जाहिरात यायचं अचानक थांबलं त्या दिवशी का, कुणास ठाऊक, पण त्याचं निर्लेप मन देखील विचलित झालं. जाहिरात जरा चमत्कारिकपणेच बंद झाली होती. दमून हळूहळू चालता चालता एके दिवशी अचानक बंद पडली असावी असं नाही, तर अचानक जणू एखाद्या भयंकर अपघातामुळे वर्तमानपत्राचं पान निःस्तब्ध झालं होतं. शोभनच्या चेहऱ्याच्या वर्णनाऐवजी अचानक एके दिवशी पाहण्यात आलं की – 'शोभन, तुझ्या आईशी तुझी आता भेट होईलसं वाटत नाही. ती अजूनही तुज्याच नावाचा जप करत असते.' त्यानंतर पुन्हा काही जाहिरात आली नाही.

'तोवर दोन वर्षे उलटली होती. शोभन एके दिवशी अकस्मात आपल्या गावी येऊन दाखल झाला. शोभनच्या स्वभावाच्या एका गोष्टीवरून तुम्हाला थोडासा बोध होईल. ही गोष्ट मी तुम्हाला अगोदर सांगितली नाही. शोभन हा काही सामान्य मध्यमवर्गीय कुटुंबातला नव्हता. नुसतं श्रीमंत म्हणूनही काही कल्पना येणार नाही. त्याची वंशपरंपरागत जमीनदारी अनेक आघात सोसूनही फारशी खालावली नव्हती. शोभन त्या जमीनदारीचा एकमेव वारस होता.'

सोमेश जरा थांबताच मी म्हटलं, 'राहू दे. पुढचा भाग सांगायची काही जरूर नाही. माझ्या आलं लक्षात.'

सोमेश जरा हसून उत्तर न देताच बोलत राहिला, 'दोन वर्षांच्या स्वतंत्र जीवनाच्या हालअपेष्टांची गणती जरी केली नाही तरी त्यांची छाप तोवर शोभनवर पडली होती. दोन वर्षात तो खूपच बदलला होता. तरी पण आपलेच नोकरचाकर आपल्याला ओळखायचे नाहीत याची स्वप्नात सुद्धा त्याला कल्पना नव्हती.

आपल्या गावी पोचून शोभन सरळ आपल्या घरी गेला. सर्वात अगोदर त्याला हटकलं ते त्याच्या सर्वात जुन्या मुनीमजीनं!

'कुणाला भेटायचंय्?'

शोभन हसून म्हणाला, 'कुणाला नाही. आत जायचंय.'

मुनीमजी थोडा वेळ त्याच्याकडे टक लावून पहात राहिले. मग जरा स्मित करून म्हणाले, 'अस्सं? पण इतकी घाई काय आहे? या. जरा बाहेरच्या बैठकीत विश्रांती घ्या.'

शोभननं चकित होऊन विचारलं, 'अरे, काय भानगड आहे मुनीमजी?'

'छे, छे, भानगड कसली आलीय्?'

'आई बरी आहे ना?' यावेळी शोभनच्या स्वरात खरंच व्याकुळपणा होता.

मुनीमजी तसेच चमत्कारिक स्मित करीत म्हणाले, 'हो, हो, बऱ्या का नाहीत?

या, माझ्याबरोबर या.'

शोभन भारावल्यासारखा मुनीमजींच्या पाठोपाठ बाहेरच्या खोलीत गेला. दोन वर्षात तेथे थोडाफार बदल झाला होता. जुनी माणसं नव्हती. त्यांच्या जागी दोन नवे कारकून वहीखातं लिहीत होते. आपल्या ओळखीच्या वृद्ध खजिनदाराला तेथे बघून शोभन जणू अस्वस्थ झाला.

मुनीमजींनी त्याला एका खुर्चीवर बसायला सांगितलं आणि खजिनदाराला म्हटलं, 'यांना आत जायचं आहे.'

शोभनला मुनीमजींचा आवाज विचित्र वाटला. खजिनदारानं आपल्या नाकावरचा चष्मा बोटानं जरा वर करून त्याच्याकडे पाहात म्हटलं, 'अस्सं? आजच आलेत वाटतं?'

'हो, आताच.'

शोभननं जरा अधीरपणे म्हटलं, 'तुम्हाला म्हणायचंय् काय? साफ साफ सांगून टाका बघू. आईला काही झालंय का? बाबा कसे आहेत?'

चारही बाजूनं त्याच्यावर नजरा रोखल्या गेल्या. थोडा वेळ सर्वजण स्तब्ध राहिले. त्यानंतर मुनीमजी म्हणाले, 'ते सर्व ठीक आहेत. पण यावेळी काही त्यांची भेट घेता यायची नाही.'

आता शोभन रागावला, 'का म्हणून भेट होणार नाही? तुमचं डोकं तर ताळ्यावर आहे? मी जाणारच.'

शोभन उठला. पण मुनीमजी दारापाशी जरा पुढे होऊन शांतपणे म्हणाले 'हे बघा, उगाच गडबड करण्यात काही अर्थ नाही. त्याचा काही एक उपयोग होणार नाही.'

अचानक परिस्थितीचं गांभीर्य शोभनला उलगडलं. विस्मित होऊन दबल्या आवाजात त्यानं विचारलं, 'तुम्ही कुणी मला ओळखलं नाही का?'

सर्वजण चूपचाप.

'मी शोभन आहे. समजलात? मी शोभन आहे.'

यावर मुनीमजी म्हणाले, 'तुम्ही जरा थांबा. मी आता येतो.' शेजारच्या खोलीत जाऊन टेबलाचा ड्रॉव्हर उघडून त्यांनी त्यातून काहीतरी काढून आणलं आणि ते शोभनच्या हाती दिलं. त्याचा एक सामान्यसा जुना फोटो. आता थोडा अंधुक झाला होता.

मुनीमजींनी विचारलं, 'याला ओळखता?'

शोभननं थक्क होऊन म्हटलं, 'हा तर माझाच फोटो आहे. तुम्ही पडताळून बघा. आता मात्र कमाल झाली.'

तो डोकं धरून खाली बसला.

मुनीमजी त्याच्याजवळ बसून म्हणाले, 'हे पहा, रागावू नका. तुमच्याशी साम्य

आहे खरं, पण तुमच्या अगोदर आणखी दोघांचे या फोटोशी साम्य आढळलं होतं. फार काय, चामखीळ देखील तसाच होता. याबाबतीत जास्त काही बोलण्याची आम्हाला मनाई आहे. आम्ही काही आरडाओरडा करणार नाही. आता तुम्ही जाऊ शकता.'

शोभननं विव्हळपणे सर्वांकडे पाहिलं. सर्वांच्या नजरेत अविश्वास होता.

कातर होऊन म्हणाला, 'मी फक्त एकदाच आई–बाबाचं दर्शन घेईन. तुमचा विश्वास नाही. पण मला फक्त एकदाच भेटू द्या.'

मुनीमजी हात हलवत हताशपणे म्हणाले, 'तर मग ऐका. सात दिवसापूर्वीच शोभन मरण पावला आहे. आम्हाला बातमी मिळाली आहे.'

अशा परिस्थितीत देखील शोभनला हसू आल्यावाचून राहिलं नाही. विचारलं, 'कसा मेला?'

त्याच्या स्वरात असलेल्या उपहासाकडे दुर्लक्ष करत मुनीमजी म्हणाले, 'अपघातात. रस्त्यावर एका गाडीखाली चेंगरून मेला. नाव–गाव ओळख काही मिळाली नाही. पण जे लोक अपघाताच्या वेळी तिथे होते त्यांनी आमची जाहिरात पाहून आम्हाला बातमी दिली. आम्ही हॉस्पिटलमध्ये देखील चौकशी केली. तिथल्या डॉक्टरांनी जे वर्णन सांगितलं ते देखील बरोबर जुळलं.'

त्यानंतर शोभननं काय केलं असतं ते सांगणं कठीण आहे. पण नेमक्या त्याचवेळी त्याला आपले बाबा घराबाहेर पडताना दिसले. माणूस इतका वादळवाऱ्यात उन्मळलेल्या वृक्षासारखा दिसू शकतो हे साहित्यातील उपमा वाचूनही त्याच्या कधी लक्षात आलं नव्हतं. त्यांच्या प्रत्येक हालचालीवरून काहीतरी भयंकर प्रकार घडून गेल्याचं स्पष्ट दिसून येत होतं.

इतरांच्या काही लक्षात येण्यापूर्वीच शोभननं खोलीबाहेर धाव घेतली. काय घडतंय हे लक्षात येऊन मुनीमजी आणि इतर कर्मचारी मागे लागण्यापूर्वीच शोभन वडिलांसमोर जाऊन उभा राहिला.

'बाबा!'

वृद्ध थबकले. त्यांच्या चेहऱ्यावरील गोंधळलेला व्यथित भाव शोभनचं हृदय विद्ध करून गेला.

'बाबा, मला ओळखलंत?'

डगमगत्या पायांनी एक पाऊल पुढे चालून वृद्ध पुन्हा थबकले. प्रबळ भावनावेगानं त्यांचा वार्धक्यशिथिल चेहरा विकृत झाला होता.

तोवर मुनीमजी आणि इतर कर्मचारी देखील येऊन पोचले.

थरथरणारे हात उचलून कापऱ्या आवाजात वृद्ध म्हणाले, 'कोण?'

मुनीमजींनी शोभनचा खांदा घट्ट धरत म्हटलं, 'काही नाही. तेच मागल्या खेपेसारखं आतापोतर तीनदा झालं आहे.'

एक कर्मचारी म्हणाला, 'आम्ही येऊ देत नव्हतो. आमचा हात सोडवून अचानक ....'

वृद्ध त्याला अडवत म्हणाले, 'त्याला काही बोलू नको. जाऊ द्या.' शोभनकडे अखेरचं कातरपणे बघून वृद्ध घराकडे परतले.

शोभन स्तब्ध उभा राहिला. मुनीमजी त्याला काय काय सांगत होते कुणास ठाऊक! त्याला एकही शब्द ऐकू येत नव्हता. तो केव्हा नि कसा बाहेरच्या खोलीत येऊन बसला ते देखील त्याला आठवत नाही.

थोड्या वेळानं तो भानावर आला. अंतःपुरातून एक कर्मचारी बाहेर येऊन मुनीमजींना काहीतरी सांगत होता. मुनीमजी त्याला काय म्हणत होते ते नीट ऐकू येत नव्हतं. छे, आता थोडं थोडं उमजायला लागलंय्. मुनीमजींच्या हातात ढीगभर नोटा आहेत. त्यांच्या आवाजात प्रार्थना आहे.

शोभननं एक काम करायला हवं. घरची मालकीण शुद्धीवर नाही. मुलाच्या मृत्यूची बातमी तिच्या कानावर गेलेली नाही. तिला अजून काही सांगितलेलं नाही. ती अजून मुलाच्या भेटीकडे डोळे लावून बसली आहे. म्हणूनच कदाचित तिचा जीव घोटाळतोय. तिच्या मनाला शांतता नाही. शोभननं तिच्या हरवलेल्या मुलाच्या रूपात तिला एकदा भेटावं. भान हरपल्यानं अंधुक झालेल्या नजरेला हा फरक कळणार नाही. शोभनचं त्या हरवलेल्या मुलाच्या चेहऱ्याशी खरंच खूप साम्य आहे. मरणासन्न मातेला इतकं समाधान देण्यासाठी खुद्द जमीनदार बाबूंनी त्याला विनंती केली आहे.

मुनीमजींनी नोटांचा ढीग शोभनच्या हातात कोंबला. सोमेश गप्प झाला. थोडा वेळ पावसाच्या आवाजाखेरीज दुसरा कसलाही आवाज झाला नाही.

अखेर मी म्हणालो– 'सोमेश, तुझ्या कानापाशी एक चामखीळ आहे.'

सोमेश हसून म्हणाला, 'म्हणून तर गोष्ट सांगायला सोपं झालं.'

पण का, कुणास ठाऊक – थंडीच्या या ढगाळलेल्या, अंधारलेल्या विलक्षण दुपारी त्याच्या या हसण्यावर विश्वास ठेवायला माझं मन तयार झालं नाही.

# ओझं

## सतीनाथ भादुडी

नदीत सोडून देण्यासाठी जबरदस्तीने तिच्या छातीपासून ओढून न्यावं लागलं होतं. अशा तऱ्हेने मरण पावलेल्याला पुरत नाहीत, म्हणून नदीत सोडून द्यावं लागतं.

परसादी घरात होता तोवर अजिबात रडला नव्हता. डोळे भरून येताच तो दुसरीकडे मान वळवून गुपचुप डोळे पुसायचा. मनचनियाला आपले अश्रू दिसायचे तर नाहीत याची त्याला भीती वाटायची. या दरम्यान त्याने एकदाही मनचनियाच्या चेहऱ्याकडे बघितलं नव्हतं. नजरेला नजर भिडली तर लाज वाटेल. अशा वेळेला काय कुणाकडे बघायचं असतं? शोकामुळे व लाजेमुळे मनचनिया अगोदरच अर्धमेली झाली होती. तशात तिचं दुःख आणखी वाढवण्यात काय अर्थ होता? परसादी रडला खरा, पण घराबाहेर जाऊन!

अगोदर सगळ्यांना हेच वाटलं होतं की त्याच्या बायकोला मूलबाळ होणं शक्य नाही. त्यानंतर किती उपासतापास, नवससायास, मंत्रतंत्र, जडीबुट्टी करून झाले त्याची गणतीच नाही. मृत्यूनंतर कुणीतरी आपल्याला पाणी द्यावं, पिंडदान करावं असं कुणाला वाटत नाही? परसादीचं गाऱ्हाणं देवाने ऐकलं. त्याला ते समजलं तेव्हापासून किती उत्कंठेनं तो एकेक दिवस मोजत होता. मनचनियासाठी काय करू, किती करू, कसं करू असं अगदी त्याला होऊन गेलं होतं. त्याने तिला कितीदा विचारलं होतं, काय खावंसं वाटतं? मुलगा होईल की मुलगी? बाळ कुणासारखा असेल? पोटात हालचाल करतं का? भाजकी माती खावीशी वाटते का? आणखीदेखील कितीतरी गोष्टी तो तिच्याशी कुजबुजायचा. त्याची ती दांडगी हौस बघून आजूबाजूचे लोक हसायचे.

त्यानंतर बुधवार ते बुधवार चौदा दिवस, गुरुवार, शुक्रवार, शनिवार – या सतरा दिवसात जणू अस्मान ठेंगणं झालं होतं. पण सतरा दिवसांनी ज्याची ठेव त्याने परत घेतली. नाहीतरी माणसाच्या हातात काय असतं?--- जायचं नाही असं थोडंच म्हणता येत?--- जावंच लागतं. किती माणसांची किती मुलं देवाघरी जातात ते एक देवालाच ठाऊक!--- काकवीच्या हंड्यात बुडून पोर मरण पावल्याचं ऐकलं आहे, कधी उकळत्या दुधाच्या कढईत पडून पोर देवाघरी गेल्याचं बघितलं आहे-- पण हा अशा प्रकारचा मृत्यू--? अरेरे! रक्तामांसाचा इवलासा गोळा तो--- पार

काळानिळा पडला होता. श्वास घ्यायच्या जिवापाड प्रयत्नांत डोळे जणू बाहेर पडू लागले होते. अगाई ---

--- लुचत असावा बहुतेक --- भयाची जाणीव व्हायच्या आतच, संकट म्हणजे काय ते समजायच्या अगोदरच अचानक आईच्या छातीचं ओझं येऊन पडलं--- लोण्याच्या भरभक्कम ढिगाखाली छातीशी असलेला अंधार! तो अंधार भेदून अखेरची किंकाळी काही बाहेर पडू शकली नाही!

मनचनियाला खूप उशिरा कळलं ते--- किती वेळाने कुणास ठाऊक?--- इथे असं गार गार का लागतंय?--- कधी कधी इथे असंच वाटत असतं. झोपेच्या भरात नीट पांघरूण ओढून घेतानादेखील आणखी एका जिवाकडे लक्ष गेलं नाही. झोपेत नेहमीच तिचं असं भान हरपतं--- पण इथं असं गार गार कां लागतंय? 'काली'च्या छातीत धस्स झालं. कंदील पेटवायला आगकाडीच्या चार काड्या लागल्या. कंदिलाची वात वर करून अंथरुणाकडे नजर टाकताच मनातली उरलीसुरली आशादेखील नाहीशी झाली. तिच्या किंकाळीने परसादी जागा झाला. पण त्या इवल्याशा देहात पुन्हा प्राणसंचार करणं शक्यच नव्हतं. कुणीच काही करू शकलं नाही. सतरा दिवसांच्या त्या लहानशा मांसाच्या गोळ्याला मनचनियाने छातीच्या जात्यात भरडून टाकलं होतं. तीच छाती आता आसवांनी ओलीचिंब होऊन गेली होती.

मनचनियाची म्हातारी कुत्री परसादीबरोबर थोडे दूर जाऊन परत आली होती. येऊन मनचनियापाशी बसली होती. काळीकुळकुळीत आहे, म्हणून कुत्रीचे नाव आहे कारिया.

कारिया टक लावून मनचनियाच्या डबडबलेल्या डोळ्यांकडे, तिच्या विखुरलेल्या केसांकडे बघत राहिली. म्हातारी कुत्री बऱ्याच दिवसांपासून यांच्या संसारात ठाण मांडून आहे. अगदी घरच्या माणसासारखं सगळं समजतं तिला!

लग्नानंतर पहिल्यांदा सासरी येताना मनचनिया या कुत्रीला घेऊन आली होती. घेऊन आली होती असं म्हणण्यापेक्षा ती कुत्री आपसूकच तिच्याबरोबर आली होती असं म्हणायला हवं. आजची गोष्ट थोडीच आहे? वयाच्या चवथ्या वर्षीच मनचनियाचं लग्न झालं होतं आणि सासरी पाठवणी झाली होती लग्नानंतर पंधरा वर्षांनी. परसादी पैसे जमवून सासऱ्याकडे सारखे निरोप पाठवत होता, बायकोला नांदायला पाठवा म्हणून. पण सासरा उत्तरच देत नव्हता, नुसतीच चालढकल करीत होता. या गोष्टीवरून लोकांत नाना तऱ्हेच्या अफवा पसरत होत्या. मनचनिया त्यावेळी मामलेदारांच्या घरी त्यांच्या चार मुलांना सांभाळणाऱ्या 'आया'चं काम करायची. लोक बोलायचे, बापाला पोरीची कमाई खायची आहे, ती देखील नुसती पगाराची कमाई नव्हे! ऐकून परसादीच्या अंगाची लाही लाही व्हायची. एकतर तरुण रक्ताचा जोर. त्यात भरीला पैशांची ऊब! तेल चोपडलेली काठी घेऊन तो

सासऱ्याकडे गेला. भांडणतंटा, हाणामारी करून तो आपल्या हक्काच्या बायकोला तिथून घेऊन आला. बैलगाडी गावाबाहेर एरंडाच्या शेतापाशी पोचली तेव्हा पहिल्यांदा दिसलं की एक काळी कुत्रीदेखील पाठोपाठ येत आहे.

''कुणाची कुत्री आहे ग?''

परसादीचं मनचनियाशी हेच पहिलं बोलणं होतं.

''माझी.'' भीत भीत ती उत्तरली.

''तुझी?''

मनचनिया थोराड असली म्हणून काय झालं? तिलादेखील भीती वाटते. परसादी कसा तगदा जवान आहे. भांडून तिला घेऊन आला आहे. थोडा वेळ इकडे तिकडे पाहून तिने विचारले,

''उचलून घेऊ तिला.''

''राहील का?''

''न रहायला काय झालं?''

मनचनियाने चालल्या गाडीतूनच कुत्रीला वर घ्यायचा प्रयत्न केला तशी नवरा म्हणाला, ''अग, अग, हे काय? इतकं वाकता येईल का तुला? ज़रा आणखी पुढं सरकून बैस.''

अंगावरचा पदर सावरून मनचनियाने कुत्रीला ओढून गाडीत घेतलं आणि आपण लठ्ठ असलो तरी अगदीच काही कुचकामी नसल्याचं दाखवून दिलं. तिच्या गोल गरगरीत चेहऱ्याविषयी कुणी काही बोलू लागलं की ती पटदिशी आपली साडी आवरून अंग झाकायचा प्रयत्न करते ही गोष्ट पहिल्याच दिवशी परसादीच्या लक्षात आली होती.

''डोक्यावरून किती ओझं नेता येईल?''

''मणाचं तरी निश्चित.''

''मणाचं ओझं डोक्यावर घेऊन उन्हातून तीन कोस जाता येईल?''

पुन्हा साडी सावरीत मनचनियाने उत्तर दिलं, 'हो, येईल जाता.'' तिच्या डोळ्यात व चेहऱ्यावर गोंधळल्याचा भाव स्पष्ट दिसून येत होता. तेव्हापासून परसादी सावधपणे बोलू लागला होता. ''हरदा हाट आमच्या इथून तीन कोस दूर आहे. तिथून ठोक भावाने भाजीपाला आणून आम्ही तो शहरात विकतो.''

हेच होतं तिचं आपल्या नवऱ्याशी पहिलं संभाषण. तिची कुत्री आणि अपरोक्षपणे तिचा अगडबंब देह यांच्याविषयी चर्चा! नवरा बाजारहाट, भाजीपाला यांच्याविषयी किती का बोलेना, बोलण्याचा गर्भितार्थ काय ते मनचनियाने चांगलं ओळखलं होतं.

पण एवढ्यावरच काही प्रकरण संपलं नव्हतं. थोडं दूर जाताच मामलेदारांच्या दोन शिपायांशी गाठ पडली होती. ते परसादीचीच वाट पहात उभे होते. मारामारी करायचा मालकाचा हुकूम असावा असं वाटत होतं. पण त्यांनी थोड्यावरच सोडून

दिलं. मालकाची बदनामी केली म्हणून अगोदर शिवीगाळ करून मग चेष्टा केली, ''दोन दोन काळ्या कुत्र्या इकडून घेऊन चालला आहेस, आता आमच्या गावात अंधार होईल की रे! पण बघ बाबा, लठ्ठ कुत्री हाडकुळ्या कुत्रीपेक्षा खूप जास्त खाईल बरं का!''

हसता हसता त्या दोघा शिपायांची मुरकुंडी वळली होती. दहाबारा वर्षांपूर्वी तो प्रसंग घडला होता. तेव्हापासून ही कुत्री इथंच रहाते. तेव्हापासूनच मनचनियाची आठवण होताच लोकांना तिच्याबरोबर तिच्या काळ्या कुत्रीची देखील आठवण होते. पाण्याला, बाजाराला, घरच्या खोल्यांतून मनचनिया जाईल तिथे पाठोपाठ तिची कुत्रीदेखील जाते. हाडकुळी कारिया आणि लठ्ठ काळी मनचनिया दोघींविषयी एकाच दमात बोलून पोरं चेष्टा करीत असतात. मुलं इतकी निष्ठुर का असतात कुणास ठाऊक? भाजीपाल्याची टोपली डोक्यावर घेऊन घामाघूम होत मनचनिया रस्त्यावरून जाऊ लागली की पोरांचं गोट्या खेळणं बंद होई. डोळ्यांनीच आपापसात खुणा होत. एक जण हेल काढी – 'म–न–च–नि–या–' दुसरी मुलं त्याच्या सुरात सूर मिसळीत– 'ओ–झं–वा–ली–रे–' मनचनिया, ओझंवाली! मनचनिया, ओझंवाली! कारिया शेपूट पायात घालायची. मनचनिया जवळ येताच टोळीतील सर्वांत आगाऊ खोडकर दोन मुलं रस्त्याच्या दुतर्फा उभी रहात. एक या बाजूला, दुसरा त्या बाजूला. तिच्या चालण्याची नक्कल करीत ते तिच्या बरोबर चालू लागत. देहाच्या गतीवर ताल देत सूर उमटत, ''लटपट! लटपट, लटपट! लटपट, लटपट! ---''

मनचनियाच्या अंगाचा तिळपापड व्हायचा. तिच्या जिभेला देखील चांगलीच धार आहे. दुसऱ्या कुठल्या बाबतीत ही पोरं तिच्या मागं लागली असती तर तिने त्यांना चांगलं फैलावर घेतल्याखेरीज सोडलं नसतं. शिवीगाळ, धाकदपटशा करून तिने त्यांना सळो की पळो करून सोडलं असतं. पण मामला होता तिच्या कुरूप बेढब शरीराचा. ओशाळून ती केविलवाणे हसायचा प्रयत्न करायची. अंगावरचा पदर घट्ट लपेटून घ्यायचा म्हटलं तर तीदेखील सोय नव्हती. दोन्ही हात डोक्यावरची टोपली धरण्यात गुंतलेले असायचे. मुलांच्या तावडीतून सुटून थोडं दूर गेल्यावर कारियाचं शेपूट पुन्हा उंच व्हायचं. मुलांकडे तोंड करून भो भो करून ती दोनदा भुंकायची. अगदी मोजून दोनदा. त्या नंतर आपला अतिपरिचित वास हुंगत हुंगत ती रस्त्यावरून चालू लागायची.

गेल्या काही महिन्यांपासून मनचनियाचा हा अगतिकपणा किंचित कमी झाला होता. नव्या चाहूलीने अवजड ओझंदेखील हलकं वाटू लागलं होतं, विपरीत गोष्टीदेखील योग्य वाटू लागल्या होत्या, आत्मविश्वास वाढू लागला होता. आपल्या सौष्ठवहीन देहाचा एक नवाच अर्थ तिला इतक्या दिवसांनी उलगडला होता --- पण ते तरी किती दिवस?

सतरा दिवसांतच मनचनियाचं राज्य हरपलं होतं--- ज्या देहापायी ती सदैव अस्वस्थ असायची, ज्या शापाच्या ओझ्यामुळे कुंठित होऊन ती सतत खालच्या मानेने लोकांसमोर वावरायची, त्याच देहाने तिच्याशी उभं वैर साधलं होतं, --वैर! वैर!

मनचनिया घराच्या ओसरीवर पाय पसरून बसली आहे. म्हातारी कुत्री तिचे पाय चाटत आहे. कारियाच्या डोळ्यांत अश्रू आहेत की किरण आहे ते समजायला वाव नाही. नकळत मनचनियाचा हात कुत्रीच्या अंगावरून फिरू लागला. हातांनी ती कुत्रीची पाठ, पोट, छाती कुरवाळू लागली. पाठीवरचे राठ केस बोटांच्या फटीतून निसटू लागले. छातीवरचे केस त्यामानाने मऊ आहेत. छातीच्या फासळ्यांवर हात थबकला. शुष्क स्तनांवर हात फिरवता फिरवता तिने त्याकडे नीट निरखून बघितलं. वाटाण्यांसारखी लहान लहान बोंडं पूर्वी नीट लक्षपूर्वक पहिल्याखेरीज दिसायचीच नाहीत. काळ्या केसांआड दडलेली असायची. कारियाच्या कानातल्या किड्यांपेक्षादेखील ती बोंडं लहान आहेत. वय झाल्याने गेल्या वर्षापासून म्हाताऱ्या कारियाला पिल्लं व्हायचं बंद झालं आहे--- हे देखील एका परीने बरंच आहे--- शंभर पट चांगलंच आहे!

कारिया टक लावून बघते आहे – एकदा मनचनियाच्या चेहऱ्याकडे, तर एकदा मान वळवून तिच्या हाताच्या बोटांकडे! जाणून घ्यायचा प्रयत्न करत आहे. मनचनियाच्या चेहऱ्यावर डोळ्यातला भाव बघून ती लाड करतेय असं वाटत नाही. तर मग? स्तनाग्रांमध्ये कसलीशी संवेदना व्हायला लागली आहे.

दु:ख तर आहेच. पण पोटचा पोर अशा रीतीने मरण पावणं किती लज्जास्पद आहे ते सांगता येत नाही. सरकारी विहिरीवर सगळेजण त्याचीच तर चर्चा करीत असतात. काय काय बोलतात कुणास ठाऊक? मनचनियाला घराबाहेर पाऊल टाकायचा धीर होत नाही. पण बाहेर न जाऊन तरी मनाला शांतता आहे का? आळीतली लोकं सांत्वनासाठी येतात. काय पण ते सांत्वन? अहाहा! सगळं ओळखून आहे ती. कुणी आलं की ती पटकन चादरीने तोंड झाकून चटईवर पडून रहाते. आलेल्या लोकांना काय वाटेल ते बोलू देते. ती स्वतः मात्र चकार शब्द बोलत नाही. परसादी घरात असला तर तो शेजाऱ्यापाजाऱ्यांना आवरतो, मनचनियाला सतावू देत नाही. एका म्हातारीने सहानुभूती दर्शविण्यासाठी मनचनियाच्या गाढ झोपेचा विषय काढला. त्या बरोबर परसादीने तिला दटावून गप्प केलं. कारिया सतत चटईच्या आजूबाजूला बसून असते. घरात कुणी शिरताना दिसलं की एकदोनदा भो भो करून आपला वैताग व्यक्त करते.

आपल्या बायकोच्या उध्वस्त मानसिक अवस्थेची परसादीला कल्पना आली ती एका विशिष्ट प्रसंगावरून! जमिनीकडे खाली पहात तिने विलक्षण संकोचाने आपल्या पतीला सरकारी विहिरीवरून पिण्याचं पाणी आणून द्यायला सांगितलं होतं. "पिण्याचं पाणी?" मनचनिया गप्प उभी राहिली. "आंघोळीसाठी पाणी?"

मनचनियाचे डोळे भरून आले होते. आंघोळीसाठी विहिरीवरून पाणी आणून द्या म्हणून नवऱ्याला सांगणं कुठल्याही बाईला शक्य आहे का? पण एक तर ती लट्ठ. आंघोळ केल्याखेरीज राहणं तिला शक्य नव्हतं. त्यातून पुन्हा अंगाला नासक्या दुधाचा वास यायचा. तिचं तिलाच आपलं शरीर घाण, गलिच्छ वाटायचं. अखेर नाईलाज होऊन, लाजेने मेल्याहून मेल्यासारखं होऊन तिने नवऱ्याला आंघोळीसाठी पाणी आणून द्यायला सांगितलं होतं. स्वतः विहिरीवर पाणी आणायला जायची लाज या लाजेहून कितीतरी जास्त होती. परसादी घागर घेऊन निघाला होता. मनचनियाने मुकाट्याने बादली पुढे सरकवली होती. पुरुषाला सरकारी विहिरीवर घागर भरताना बघून लोक काय बोलतील?

यावेळी बायकोचं लक्ष दुसरीकडे गुंतविलं पाहिजे हे परसादीला ठाऊक आहे. परसदारी भाजीपाला लावलेला आहे. पण ती तिकडे लक्ष देईल तर ना? ओसरीवर बसल्या बसल्या रात्रंदिवस कसला विचार करीत असते कुणास ठाऊक? रोज सकाळी ती बाजारात नेण्यासाठी घेवड्याची टोपली भरून ठेवायची. पण गेल्या तीन दिवसांपासून ती टोपली भरून ठेवायला विसरली आहे.

बायकोचं मन लागावं म्हणून वेळ मिळताच परसादी तिच्याशी गप्प मारू लागतो. पण थोड्याच वेळात बोलायचे विषय संपतात. बोलणं खुंटतं. जो देवाघरी निघून गेला त्याच्याचविषयी बोलावंसं वाटतं. पण त्याच्याविषयी बोलायला मनाई आहे. दुसरा एखादा विषय काढला तरी नकळत तो तिथेच संपतो. भाजीपाल्याविषयी बोलायची त्यांना नेहमीची सवय होती. समजा, परसादीने घेवड्याच्या भावाचा विषय काढला, ''हल्ली भाव चांगला आहे. आणखी एखाद महिना राहील. मग मात्र कुत्र्याच्या कानासारख्या निबर झालेल्या शेंगांना कुणी हात लावणार नाही. घेवड्यातच जास्त कमाई आहे. काय हिरवागार व कोवळा असतो. परसातला वेल केव्हापासून शेंगा देतोय– आठवतंय ना? त्या दिवशी खगरियाच्या दसऱ्याच्या बाजारातून तुझ्यासाठी दहीवडे----?''

बोलता बोलता परसादी मध्येच थबकतो. छे, नकोच ती आठवण. त्यावेळी बाळ पोटात होता. बायकोने बाजारातून दहीवडे मागवले होते.

''हो, हो, ज्या भाजीपाल्याचा मोसम नसतो त्यातच फायदा असतो. घेवडा यावेळी किती लवकर आलाय. जुना वेल आहे ना? गेल्या वर्षीचा! तू तर तो उपटून टाकायला निघाली होतीस, सुकला म्हणून. पण माझ्याच सांगण्यावरून तू त्याला वैशाखापासून पाणी घालायला सुरुवात केलीस, खरं ना?''

मनचनियाच्या डोळ्यात व चेहऱ्यावर इतके विचित्र भाव दिसत होते की परसादीला पुढे बोलवेना---- ''दुधीचा वेल कसा फोफावला आहे, बघितलंस? काय जाडजूड टोकं आहेत! त्याच्या मुळाशी तू रोज पेज घालतेस ना? म्हणून इतका पसरलाय. काय सुरेख फळं येतात! वाटतं, देठं कापून विकलेलीच बरी. बघतेस ना

तू? बघ, जाळी पडते आणि सडून जातात--- जाळी पडते आणि सडून जातात---''

हे काय भलतंच बोलला तो? बायकोचा चेहरा असा कसंनुसा का झाला? परसादीचं बोलणं मध्येच खुंटलं. तो उठून उभा राहिला. इतकी तारेवरची कसरत केल्याने का कधी बोलणं होत असतं?

शिवणकाम घेऊन बसली तर कदाचित तिचं दुसरीकडे लक्ष वळेल. भाजीपाला विकून येताना परसादी बायकोसाठी थोडं छीटचं कापड घेऊन आला. कापड बघून मनचनिया म्हणाली, 'हे कापड धुतल्याने आटतं.''

''फार तंग शिवू नकोस. जरा सैलसर कपडे शीव म्हणजे झालं.''

विचारपूर्वक थोडंच बोलला होता तो? तरीदेखील मनचनियाने मान खाली घातली. किती नि काय बोलायचं ठरवून आला होता परसादी! पण बायकोच्या चेहऱ्यावरचा अपराधी भाव बघून त्याचा उत्साहच मावळला.

तरी पण परसादीने प्रयत्नात कसूर केली नाही. दुसऱ्या दिवशी तो एक कुत्र्याचं पिल्लू घेऊन आला. असलं काही सापडलं तर कदाचित तिचं चित्त थाऱ्यावर येईल--- बिचारीला किती एकटेपणा वाटतो! पिल्लू खूपच लहान होतं. नुकतेच त्याचे डोळे उघडले होते.

'हे काय आणलं तुम्ही?''

''कारिया आता म्हातारी झाली आहे. कधी मरेल त्याचा काय भरवसा? आतापासूनच एक नवं कुत्रं पाळलेलं बरं. रस्त्याच्याकाठी थंडीमुळे काकडत पडलं होतं. आणलं उचलून.''

मनचनिया त्या दिवशी कामावर जायची तयारी करीत होती. आणखी किती दिवस अशी घरी बसून रहाणार? घरी बसून त्यांच्यासारख्यांचं भागतं होय? तेवढ्यात नवरा आपला पिल्लू घेऊन हजर!

--- पंचाईत! इतके दिवस कारियाला दरवर्षी सातसात पिल्लं व्हायची तेव्हा कधी एखादं पिल्लू पाळायचं सुचलंच नाही. किती पिल्लं लांडग्यांनी मटकावली, किती आळीतल्या पोरांनी नेली त्याची गणतीच नाही. उष्टं खरकटं खायला घातलं तरी कुत्रं पाळण्यात खर्च होतोच की! आणि नुसतं उष्टं खाऊन का कधी कुत्रं घरात टिकतं? एका घराच्या उकिरड्यापासून दुसऱ्या घराच्या उकिरड्यापर्यंत त्याच्या अष्टौप्रहर चकरा चालूच असतात.

तरीदेखील नवरा इतका अगत्यपूर्वक पिल्लू घेऊन आला आहे तेव्हा घरात थारा द्यायलाच हवा.

टोपली खाली ठेवून मनचनियाने पिल्लू हातात घेतलं. घरातून बाहेर पडायची तिला खूप लाज वाटत होती. बरं झालं! पिल्लू आल्याने तेवढंच निमित्त मिळालं. गता बाहेर पडायची घाई नाही. तिच्या जिवात जीव आला.

किती लहान आहे पिल्लू! जवळ बसवलं तर पटदिशी मांडीवर चढून बसतो. नाक फेंदारून हुंगू लागतो. पदरात तोंड लपवू बघतो. ओलसर जिभेच्या टोकाने बोटं, तळहात, तळहाताची कातडी चाटून बघतो. मनचनियाच्या अंगाचा वास त्याला पसंत आहे. दुधाचा आंबटसा वास त्याच्या परिचयाचा आहे. तोच हरवलेला वास पिल्लाला पुन्हा गवसला आहे. हाच वास आपल्याला आपल्या जन्मदात्रीचा पत्ता लावून देईल हे त्याने आपल्या जन्मजात वृत्तीने ओळखलं आहे.

''काय हे? जरा गप्प बसू देत नाही. बैस इकडे !''

मनचनियाने पिल्लाला मांडीवरून उतरून खाली आपल्याजवळ बसवलं.

कारियाच्या गळ्यातून आवाज निघाला— गुर्रर्र-- नव्या उपऱ्या प्राण्याचा दिमाख तिला नापसंत आहे. सुरुवातीचं हे कोडकौतुक कुठवर जाऊन पोचेल याचा तिला अंदाज येतोय. पिल्लापाशी जाऊन तिने एकदा त्याचा वास घेतला. त्या वासातून तिला काय समजलं ते तिचं तिलाच ठाऊक. एक जांभई घेऊन ती ओसरीवरून उठून अंगणात गेली आणि तिथेच निजली. पिल्लाच्या बाबतीत तिला कसलंच सोयरसुतक नव्हतं.

पिल्लाच्या रेशमासारख्या मऊसूत केसांवरून हात फिरवताना मनचनियाला खूप बरं वाटतं. ते केस मुठीत धरून कुरवाळताना तिच्या अंगावर कसा रोमांच फुलतो. पण हा रोमांच त्रासदायक वाटत नाही. बोटांना होणारा एका कोवळ्या शरीराचा स्पर्श मनचनियाला काहीसा बेचैन करून टाकतो.

--- मनचनियाला स्तनांतलं दूध रोजच पिळून टाकून द्यावं लागते. एका पत्र्याच्या डब्याच्या झाकणात दूध पिळून ते ती पिल्लासमोर ठेवते. पिल्लू मचमच करीत दूध पिऊन टाकतं. तो आवाज किती गोड वाटतो. मनचनिया टक लावून त्याच्याकडे बघत रहाते.

अंगणात कारियाने कान टवकारले. तिचा निस्पृहपणा संपला. धावत ती ओसरीवर झाकणापाशी येते.

''तू का ग आलीस? जा, पळ—जा म्हणते ना?'' कारिया रागाने गुरकावू लागते.

'हे काय तुझ्यासाठी आहे? उगाच काय रागावतेस? एवढ्याशा पिल्लाचा हेवा करतेस? लाज नाही वाटत? जा, पळ इथून.''

''गुर्र—र्र—र्र—''

अर्थात हे सर्व कारियाला मुळीच पसंत नाही. पण मालकिणीचा हुकूम मानण्याखेरीज गत्यंतर नाही.

घरचं कामकाज आवरून, टोपली डोक्यावर घेऊन मनचनिया अंगणाबाहेर पडली. कारियादेखील नेहमीच्या सवयीप्रमाणे आळोखेपिळोखे देत उभी राहिली.

''तू का उभी राहिलीस? बस इथंच. आता तुला माझ्याबरोबर यायची जरूर नाही. ऐकतेस ना? जा, घरात जा.''

दाराला बाहेरून कडी घालून मनचनिया निघून गेली तेव्हा कारियाने भुंकून सगळी आळी दणाणून सोडली.

ज्या कारणासाठी मनचनियाला घराबाहेर पडायला लाज वाटत होती तेच घडलं का? हसायला विषय मिळताच मुलांना कसली दयामाया रहात नाही. आजदेखील मनचनिया येताना दिसताच त्यांचं गोट्या खेळणं थांबलं.

''आज लठ्ठ भाजीवाली एकटी कशी रे? ती सुकडी कुत्री कुठं गेली रे?'' आज तिला वेडावून गाणी गात तिच्या चालण्याची नक्कल करीत ते नाचले नाहीत. पूतना राक्षसीचा विषय काढून आपसात थट्टा करीत फक्त हसत बसले. मनचनियाने खुद्द आपल्या कानांनी ऐकलं. कान, डोळे बंद करून ती कशीबशी तिथून सटकली. तेव्हा कुठे तिच्या जिवात जीव आला. त्यानंतर ती ज्या ज्या घरी भाजी विकायला गेली तिथल्या बायकांनी काही दिवसांपूर्वीच्या त्या अशुभ प्रसंगाविषयी खोदून खोदून विचारून तिला पार भंडावून सोडलं. पोलिसांच्यादेखील मनात आल्या नसतील अशा गोष्टी त्या बायकांच्या मनात आल्या. काय बोलावं ह्यांना? नाहीतर जिचं नशीबच असं फुटलंय तिला असले प्रश्न विचारणं योग्य होतं का? तिच्या नवऱ्याने तिला दोनतीन दिवस लोकांच्या घरी भाजी विकायला जाऊ नकोस, फक्त बाजारात भाजी विकायला बस म्हणून बजावलं होतं. खरं होतं त्याचं म्हणणं! पण त्यावेळी त्याच्या बोलण्याचा अर्थ उमजला नव्हता. दारोदारी जाऊन भाजी विकण्यात जास्त श्रम होतात म्हणून सांगितलं असेल असं वाटलं होतं.

त्यानंतर आणखी कुठे न जाता मनचनिया सरळ बाजारात गेली.

नवरा-बायको दोघे बरोबरच घरी परतले. पण कडी काढल्याचा आवाज ऐकूनही कारिया काही शेपूट हलवीत समोर आली नाही. कसली चाहूलही नाही. आहे काय प्रकार? दिवा लावून बघितलं तर कारिया अंगणात पाय ताणून कुशीवर निजली आहे आणि पिल्लू सगळं बळ एकवटून तिची शुष्क बोंडं चोखत आहे. मधून मधून एक बोंड सोडून दुसरं तोंडात धरत आहे. मनचनियाने जवळ जाऊन पिल्लाला उचलताच कारिया अंग झटकून उभी राहिली. -- तुमच्या सांगण्याप्रमाणे केव्हाची या पिल्लाला सांभाळतेय. आता तुम्ही नि तुमचं काम! सांभाळा. एका कुशीवर निजल्या निजल्या सगळं अंग कसं आंबून गेलंय. कारिया जमीन हुंगत हुंगत घराबाहेर निघून गेली.

''मला वाटतं, आता याचं नाव ठेवायला हवं. बच्चा नाव कसं राहील?''

''छान आहे.''

''बच्चा, ए बच्चा, इकडे ये. बघा कसा नुसता बघतोय. हात चाटू नको म्हणते ना? वेडा कुठला. ही काय खायची वस्तू आहे? भूक लागली आहे? असेलच लागली. खूप उशीर झालाय ना? लहान बाळांना तासातासाने भूक लागते. ये.''

''बघितलंत याला? कूं कूं करतोय. पिल्लांना भूक लागली की ती असाच

आवाज करतात.''

मनचनियाच्या चेहऱ्यावर हास्य फुललं. तिच्या चेहऱ्यावर हसू नसतं तर तिच्या बोलण्यातलं इंगित तिच्या नवऱ्याच्या लक्षात आलं नसतं. पाच दिवसांनंतर आज पहिल्यांदाच ती हसली होती.

''या सर्व गोष्टी तुलाच ठाऊक! कुत्री पाळण्यात तुझी हयात गेलीय ना?''

दुसऱ्या दिवशी दिवसभर पिल्लू कारियाची बोंडं चाटत राहिलं. कारिया दिवसभर आरामात निजून राहिली. जणू विश्रांती घेत असावी. मनचनिया भाजीपाल्याची टोपली डोक्यावर घेऊन घराबाहेर पडली तेव्हा म्हातारी कुत्री काही मागे लागली नाही. मनचनियाला काही बोलावंच लागलं नाही. कुत्री आपसूकच घरी राहिली. बाजारातून परतून पाहिलं तर कारिया तशीच निजली आहे आणि पिलू तसंच चोखत आहे. बोंडं आता दाण्यांसारखी लहान दिसत नाहीत. थोडी मोठी झाली आहेत. टोकं काहीशी फुगली आहेत. त्यावर किंचित लालसर छटा आली आहे. सुजली तर नाहीत? पिल्लू काही नुसतेच चाटत चोखत नाही, ओढतेदेखील. काही सांगता येत नाही. मनचनियाने हात फिरवून पाहिलं—नाही. सूज नाही. लहान लहान लाल जांभळ्या शिरा तट्ट फुगलेल्या दिसत आहेत. कातडी तुकतुकीत दिसतेय. मनचनियाचा हा उपद्व्याप संशयास्पद वाटत असल्याचं कारियाच्या नजरेवरून वाटतंय—यात असं डोळे विस्फारून बघण्यासारखं काय आहे? ---पूर्वी काय कधी पाहिलं नव्हतं?

पत्र्याच्या डब्याचं झाकण हातात धरून मनचनियाने ओसरीवरून हाक मारली, ''बच्चा, ए बच्चा, ये इकडे ये-यू, यू यू-ये बच्चा-''

कशाकरता बोलावताहेत ते बच्चाने ओळखलं. गुरगुरत तो ओसरीवर आला. मनचनियाच्या कडेवर त्याला चढायचं आहे. गुडघ्यावर लुगड्यात नखं रुतल्याचा खरखर आवाज येतो आहे.

''पुरे, पुरे जरा दम नाही. का आलास? जा त्या कारियापाशी नवी आई मिळाली आहे ना? जा चाट तिची छाती. आता कसला वास घेतो आहेस?''

--- काय आहे --- कशासाठी येतोय?--- जो सोडून गेला त्याची आठवण होते आहे --- त्याला विसरणं शक्य आहे का?

अंगणातून कारिया मान उंचावून बघतेय. डोळ्यातलं किरण कुठे गेलं? मनचनियाचं बोलणं ऐकतेय. तिच्या प्रत्येक हावभावावर, तिच्या प्रत्येक मुद्रेकडे तिचं लक्ष आहे. मनचनियाने पत्र्याचं झाकण उचललं तेव्हाच तिचे कान उभे राहिले होते. पिल्लाच्या व्यापातून सुटका होताच एकदा बाहेर जाऊन तिने हातपाय मोकळे करून यायला हवं होतं. पण तसं न करता ती ओसरीखाली येऊन बसली. पिल्लू परत यायची आतुरतेने वाट बघू लागली. पत्र्याचं झाकण चाटून पुसून झालं तरी तो अजून तिथंच का घुटमळतोय? कसला वास घेत बसला आहे?

''पुरे का आणखी हवं?''

-- हे काही लाडिक बोलणं नव्हे. त्यात राग आहे. कारियाला ते ठाऊक आहे. ती चटदिशी उडी मारून ओसरीवर आली. पिल्लाला दातांनी मानेशी धरून त्याला खाली घेऊन आली. --चल आपल्या जागी. मग काय वाटेल ते कर--, नेहमीच्या जागी नेऊन तिने पिल्लाच्या मानेशी चाटून त्याला दिलासा दिला. मग आराम करण्यासाठी आडवी झाली --- --- घे, आणखी घे---आता काय करायला हवं ते पिल्लाला सांगायची जरूर राहिली नाही.

हातात सूप घेऊन उभी असलेली मनचनिया ते दृश्य बघून थक्कच झाली--- म्हाताऱ्या कुत्रीची इच्छा अजून पुरी झालेली नाही?--- माझ्या पिल्लाला सतावताहेत. कारिया अंग न हरवता नुसतं डोकं हलवून त्या वारण्याचा प्रयत्न करतेय-- अंग हलवलं तर पिल्लाला चोखता यायचं नाही, तिच्याच आरामात विघ्न यायचं-- कुणास ठाऊक!---. कुत्रीच्या बोंडांमध्ये झालेल्या या बदलाकडे परसादीचं लक्ष गेलंय का? नवऱ्याला बोलावून दाखवावं असं तिला खूप वाटलं. पण संकोचामुळे तिने तसं केलं नाही.

परसादीचं देखील या गोष्टीकडे लक्ष गेलं आहे. पण अशा गोष्टी काय मनचनियाशी बोलायच्या असतात?

त्या रात्री मनचनियाची कितीदा झोपमोड झाली ते सांगणं कठीण आहे. कारियादेखील रात्रभर भुंकत राहिली. तिला कोल्ह्याची चाहूल लागली होती का?

सकाळी उठल्यावर कारिया व पिल्लू दोघेही अंगणात दिसले नाहीत, जातील कुठं? घेवड्याच्या मांडवाखाली पेटीसारखं एक लाकडी खुराडं आहे. मनचनियाने एके काळी बदकं पाळली होती. त्यांच्याचसाठी बनवून घेतलं होतं. त्याच लाकडी खुराड्यात कारिया पिल्लासह निजलेली दिसली. घर चारी बाजूंनी बंदिस्त आहे. बदकांना आत जाता येईल इतकं छोटंसं एक दार फक्त एका बाजूला आहे. कारियाला मोठ्या मुष्किलीने आत शिरता येण्याइतकं ते लहान आहे.

मनचनिया खाली वाकून आत बघू लागली. आतल्या अंधारात नीटसं काही दिसत नाही.

गु--र्र--र--र! हे कोण उगाच आलं?

''गप ग कारिया-- गप म्हणते ना--''

मनचनिया मांडवावरून शेंगा काढतेय. खुटुर खुटुर आवाज होतो आणि कारिया भुंकायला लागते.

परसादी विचारतो, ''ही इतकी का भुंकतेय?''

''तिला पसंत नाही.''

''घेवड्याचा मांडव तिच्या हद्दीत आहे वाटतं?''

''हं, तसंच समजा.''

"नवा मुलगा मिळालाय."

"हो तर! सात जन्मांचा मुलगा!"

या बाबतीत नवऱ्याला फारसं बोलायची संधी मिळू नये म्हणून मनचनिया घागर उचलून पाणी भरायला सरकारी विहिरीकडे निघून गेली.

परसादीनेदेखील समाधानाचा सुस्कारा सोडला. नकळत त्यांचं बोलणं विषण्ण करून सोडणाऱ्या एका बिंदूपाशी येऊन ठेपलं होतं.

आज त्यांना भाजीपाल्याच्या खरेदीसाठी हरदा घाटला जायचं आहे. थोडं लवकर घरून निघावं लागेल, म्हणून परसादी चूल पेटवायला बसला. लाकडं फोडण्याचा आवाज ऐकताच कारिया भुंकायला लागली. "देवा, देवा, लाकडं फोडणंदेखील कठीण झालंय."

खरंच तसं झालंय. मांडवावर कावळे येऊन बसले की कारिया भो भो करू लागते, परसादी अंगणात चालू लागला की भुंकायला लागते. घराच्या छपरावर घार बसली की भुंकायला लागते. दाराबाहेर मांजर दिसलं की भुंकायला लागते. सगळेच्या सगळे वैरी झाले आहेत तिचे, कुठून केव्हा संकट येईल सांगवत नाही. डोळे उघडे ठेव, सावध रहा, संकटाची जरासुद्धा चाहूल लागताच भुंकून घाबरून सोड, डोळे, कान, नाक सर्व चोवीस तास उघडे ठेव, कुणाचा विश्वास धरू नकोस, शत्रूने आक्रमण करायच्या आत तूच त्याच्यावर तुटून पड, उशीर केलास तर धडगत नाही---

नाल्याच्या तोंडाशी एक मुंगूस दिसताच कारिया बदकांच्या घरातून धावत बाहेर पडली. चुलीपाशी बसलेल्या परसादीने कुत्रीला न्याहाळून बघितलं--- कारियाचे डोळे चांगलेच तांबारले होते. गरोदर असल्याच्या सगळ्या खुणा तिच्या अंगावरून व हालचालीतून दिसून येत होत्या. तिच्या पाठोपाठ पिल्लूदेखील बदकांच्या घरातून बाहेर आलं. मुंगूस घाबरून पळून गेलं. तरीदेखील कारियाचा आरडाओरडा, धावपळ काही कमी झाली नाही--- भाराने खाली लटकलेले स्तन जवळजवळ जमिनीला टेकले होते. चालतानादेखील पिल्लाने कारियाचे स्तन चाटणं काही सोडलं नव्हतं--- पण हे काय? --- हो, असंच आहे --- कसलीही चूक नाही--- हे कसं काय झालं?--- ती दोघं पुन्हा बदकांच्या घरात शिरली--- परसादी थक्क झाला. प्राण्यांमध्ये असं होत असल्याचं त्याला ठाऊक नव्हतं. मनचनियाने बघितलं आहे का? मनचनियाला सांगू का? अवघ्या आळीतल्या लोकांना बोलावून हा तमाशा दाखवावंसं परसादीला वाटलं. पण इलाज नाही. त्याचं तोंड कायमचं बंद झालं आहे.

हरदा हाटला जाताना मनचनियाने कुत्र्यांचा विषय काढला होता. आज तिने खायला हाक मारली तरी कारिया बदकांच्या घरातून बाहेर आली नव्हती. तीही आली नव्हती की तिने पिल्लालाही येऊ दिलं नव्हतं. पिल्लाचीच जास्त काळजी

आहे! "अग, उपाशी थोडंच कुणी राहतंय?" मनचनियाला सगळं सांगावंसं वाटत असूनही परसादी जास्त काही बोलू शकला नाही. मनचनियाला काहीच उमजलं नाही.

घरी परतायला सायंकाळी झाली. इवलंसं पिल्लू दिवसभर उपाशी राहिलं असेल याचीच मनचनियाला काळजी लागून राहिली होती. पत्र्याच्या डब्याचं झाकण घेऊन ती बदकांच्या खुराड्याकडे निघाली.

"बच्चा–बच्चा–ये, ये अरे-- यू यू यू यू ---"

घरातूनच परसादी म्हणाला, "तो कसला येतोय आता?"

बच्चा खरोखरच आला नाही.

कारिया जाळीतूनच तोंड बाहेर काढून भुंकली. जणू दातओठ खाऊन चावायला येत असावी.

"तू का ओरडतेस? चूप बघू."

हात पुढे करताच कारिया चिडून बाहेर आली. ही ती पूर्वीची कारिया नव्हती, पार बदललेली कारिया होती. नीट सगळं समजून घ्यायच्या आतच तिने शत्रूवर हल्ला केला. चावे घेऊन मनचनियाचे लचके तोडायला बेत दिसतोय तिचा. मनचनिया कोलमडून दुधीच्या वेलीवर जाऊन कोसळली. तिच्या लुगड्याच्या फाटून चिंध्या झाल्या. हाताला रक्ताची धार लागली. परसादी काठी घेऊन हो हो करीत धावत आला. पण मनचनियाचं तिकडे लक्षच नव्हतं. कारिया जोवर खुराड्यात शिरली नाही तोवर टक लावून तिच्या छातीकडे बघत राहिली. कारियाच्या स्तनांमध्ये दूध उतरलं आहे!--- कारियाने तिच्याकडे झेप घेतली तेव्हा त्याच गरम, ओल्या, थुलथुलीत मांसगोळ्यांचं वजन तिच्या हातांवर पडलं होतं--- हो, ओल्या! खरंच ओल्या! कारियाच्या स्तनांतून दूध ओघळत होतं!--- हाताच्या त्या जागेवर अजून दूध लागलं आहे.

तिच्या स्वतःच्या अभिशापाचं ओझं दगडी शिळेहूनही अधिक जड झालं.

# सीमारेषेची सीमा

## आशापूर्णा देवी

सर्वजण परत आले. सर्वांनी हात टेकले. अखेर सतीनाथ स्वतःच तिसऱ्या मजल्यावर गेले. तीव्र स्वरात म्हणाले, ''उद्धटपणालाही एक सीमा असते छवी, आणि तशी ती असायलाही हवी. पण पाहुण्यांनी भरलेल्या या लग्नघरी तू जो असभ्यपणा करीत आहेस, त्याला सीमा नाही! नात्यागोत्याच्या सर्वांसमोर माझी अब्रू तर तू धूळीला मिळवलीसच, पण स्वतःच्या तोंडालाही काळं फासलंस. आता मेहेरबानी करून खाली चल.''

तिसऱ्या मजल्याच्या गच्चीवर खोली बांधायची परवानगी नव्हती, तरीसुद्धा छवीसाठी म्हणून टाइल्सचं छत घालून खोली बांधण्यात आली होती. टाइल्सचं छत असलेल्या छवीच्या या खोलीत दिवा लावलेला नव्हता. फक्त तळमजल्यावर घातलेल्या मांडवातील अगणित दिव्यांच्या तिरप्या रेषा कुठून कुणास ठाऊक, पण वरपर्यंत पोचून खोलीच्या दारावर थोडासा उजेड पाडीत होत्या.

त्याच दाराला हात टेकून छवी उभी होती. हाताची बोटे आणि एका बाजूचा गाल तेवढाच काय तो दिसत होता. पण त्यावरून तिच्या चेहऱ्यावरचा भाव समजू शकत नव्हता.

ती अजून तशीच ताठर आहे की थोडी झुकली आहे —कळायला काहीच मार्ग नव्हता.

खुद्द सतीनाथांनी वर येऊन बोलावलं तरीदेखील ती पहिल्यासारखीच हट्ट धरून बसली तर मात्र मान्य करावं लागेल की छवीदेखील आपल्या नवऱ्यासारखीच वेडी झाली आहे.

पण परिस्थितीत फारसा बदल दिसेना. :वेलक्षण शुष्क कंठाने छवी म्हणाली, ''दादा, तू का उगाच इथं यायचा त्रास घेतलास? मी तर अगोदरच सांगून टाकलं आहे–''

''ठाऊक आहे–'' सतीनाथ क्षुब्ध आणि क्रुद्ध स्वरात म्हणाले. ''ठाऊक आहे. एकेक करून घरचे सर्वजण येऊन तुझी मनधरणी करून गेले आणि तू सर्वांना 'जेवायचं नाही,' 'खाली येणार नाही' म्हणून घालवून दिलं आहेस. तुझी वहिनी तर येऊन तुझ्या हातापाया पडून गेली असं ऐकलंय. तरीसुद्धा तू–''

छवीचा चेहरा अजून दिसत नव्हता.

छवी जराशी जरी खोलीबाहेर आली असती तरी तिचा चेहरा कदाचित दिसला असता. पण छवी बाहेर येतच नाही. जणू सीतेसारखं खोलीच्या दाराशी कुणी लक्ष्मणरेषा आखून गेलंय. जणू उंबरठा ओलांडताच ती रावणाच्या हाती पडेल.

पण दार बंद करून स्वतःला अंथरुणावर झोकून देण्याइतपत उसंतही छवीला मिळत नाहीये. संध्याकाळपासूनच तिला बोलावण्यासाठी सर्वांची रीघ लागली आहे.

''ए छवी, खाली शेकडो मंडळी आली आहेत. छवी, छवी म्हणून सर्वजण तुला शोधताहेत, चल ना एकदाच–''

''ए छवी, तुझ्या दादाचा जावई किती देखणा आहे ग! बघणार नाहीस त्याला?---'' ''ए आत्या, कन्यादानासाठी तू का नाही आलीस, बाबा भयंकर रागावलेत. चल लवकर!''

पण छवी जाम हलली नाही.

छवीचा अहंकार कमी व्हायला तयार नाही.

छवी म्हणते, ''डोकं दुखतंय.''

तसं पाहिलं तर दिवसभर काहीच घडलं नव्हतं.

कुठल्याही दिवशी काहीच झालं नव्हतं. सुरुवातीपासूनच लग्नातलं सारं कामकाज छवीने आपल्या अंगावर घेतलं होतं. -- स्वैपाक, कोठार, भोजनगृह, देवघर–सर्वत्र छवी भिंगरीसारखी भिरभिरत होती. याच दरम्यान लग्नाच्या दिवशी संध्याकाळी कशी कुणास ठाऊक ही घटना घडली आणि त्या तुच्छ घटनेला इतकं अवास्तव महत्त्व देऊन छवीने डोक्यात इतकी राख कां घालून घेतली त्याचं कारण कुणालाच समजलं नाही. कन्यादानाच्या वेळी सर्वजण तिला शोधू लागले.

''छवी कुठं आहे? छवी कुठं आहे?''

वधूवरांच्या पदराची गाठ बांधायची आहे. हळद, कवडी, छवीने कुठं ठेवली आहे? वधूची ओढणी कुठं ठेवली आहे? वेळेवर काहीच सापडत नाहीये.

असो, त्याचवेळी मिळाली खरी. जवळच ठेवली होती. पण जवळ बसून हातोहात वस्तू देणारं कुणी नसेल तर त्रास नाही का होत? आणि नुसत्या हळद, कवडी व वधूच्या ओढणीचाच प्रश्न थोडाच आहे? लग्नविधीच्या सर्वच वस्तू छवीच्या ताब्यात आहेत. वधूच्या आईनं कुठवर काय काय बघायचं? तिने पाहुण्यांचं आदरातिथ्य नाही का करायचं?

पण सारं काही माहीत असूनसुद्धा ऐन वेळी छवी गायब झाली. शी! आपल्या धमकावल्या गेलेल्या पतीची मनधरणी करायला निघून गेली. दुसरं काय? पण त्यासाठी हीच का वेळ आहे? तो तर वेडा आहे, लहरी आहे. कोणत्या वेळेला काय करील याचा काही नेम नाही. त्याला झोपेचं औषध देऊन तिने खाली नको का यायला? वधूवर माजघरात गेले म्हणजे वाटल्यास तिने ताट नीट सजवून सर्व पदार्थ वाढून तिसऱ्या मजल्यावर घेऊन जावं आणि पतीला उठवून समोर बसून खाऊपिऊ

घालावं, त्याची खुशामत करावी.

पण हे काय?

हे सहन करणं कठीण आहे.

पैपाहुण्यांनी भरलेल्या या घरात तू सर्वांसमोर ताठरपणे खोलीत नवऱ्याबरोबर बसली आहेस? म्हणतेय, "ते खाणार नसतील तर मी पण खाणार नाही. छी, छी! दादाचा जावई किती सुंदर आहे, किती आनंद झालाय आम्हाला. पण तू मात्र लग्नाच्या वेळी, वरातीच्या वेळी एकदाही त्याला बघितलं नाहीस. इतकंच नव्हे पंगतीच्या वेळीही हटून बसली आहेस. किती आनंदाचा प्रसंग आहे, काय उत्तम मेजवानी आहे, मासे, मिठाई हे ते, तुम्ही दोघं काय अन्नाला स्पर्शसुद्धा करणार नाही? उपाशीच राहणार?

पुतणीच्या शकुनअपशकुनाचादेखील विचार नाही करणार? दादा वहिनीचं हसं करणार? स्वजन, परजन कुणाचीच चाड नाही का ठेवणार?

दादा, तुझ्याहून वीस वर्षांनी मोठा, वडिलांच्याच जागी समज, वडिलांसारखंच त्यांनी तुला लहानाचं मोठं केलं. तुझं लग्न पण लावून दिलं आणि तेव्हापासून बारा महिने तेरा काळ तुला व तुझ्या वेड्या नवऱ्याला पोसताहेत, तुझ्यासाठी खोली पण बांधून दिली आहे– त्याच दादांनी त्या वेड्याला जरासं धमकावलं वा जरासा धक्का दिला तर त्यात इतकं संतापायला काय झालं? म्हणून त्यांच्याशी असा का व्यवहार करायचा? तुझ्या ठायी नाममात्रही कृतज्ञता नाही का?

इतकी भयंकर कृतघ्नता व्यक्त करणारी छवी कशी दिसते हे बघण्यासाठीच बहुधा त्या खोलीच्या दाराशी मघापासून जत्रेसारखी गर्दी जमलीय.

कित्येकांनी सहानुभूती पण दाखवली आहे.

पण हो, गुपचुप!

कारण ज्याचं घर आहे त्यांच्या विरुद्ध पक्षात सामील झाल्यास गुपचूप बोलणंच ठीक आहे, नाही का? गुपचूपच लोक बोलतात, "अरेरे! धाकटा मेहुणा काय वेडाच आहे. म्हणून तर असं काम त्याने केलं. पण दादा समजदार असूनही एवढ्याशा क्षुल्लक गोष्टीवरून नेमकं आपल्या मुलीच्या लग्नाच्या दिवशीच त्याला धक्का मारायचा होय? बहीण बिचारी नाइलाजाने आश्रयाला राहिली आहे म्हणूनच तर दादाला इतकं धैर्य झालं ना? बहीण जर नशीबवान असती, श्रीमंत असती तर असं वागायची दादाची छातीच झाली नसती."

पण हीच मंडळी खाली जाऊन तावातावाने भकू लागायची. आणि का नाही भकणार?

ते लोक येशू ख्रिस्त वा श्री चैतन्य थोडीच आहेत? त्यांना राग का नाही येणार? त्यांनी दर्शविलेल्या सहानुभूतीच्या बदल्यात छवीने काही अश्रू गाळले नाहीत. उलट म्हटलं की, "मला हे सर्व पसंत नाही. तुम्ही सर्वजण खाली जा–"

तर मग? या उर्मटपणाचा तर येशू ख्रिस्ताला नि चैतन्य महाप्रभूंनासुद्धा राग आला असता.

पण ही तर संध्याकाळची गोष्ट आहे!

रात्री, बरीच रात्र उलटल्यावर जेव्हा बाहेरचे लोक निघून गेले, फक्त घरच्या मंडळीचं जेवणखाण बाकी राहिलं आणि सतीनाथ आपल्या जावयाकडे पहात स्वतःच्या कर्तृत्वावर खूष होत बसले होते, त्यावेळी अचानक आठवण होऊन त्यांनी विचारलं, ''क्षितीश जेवला का?''

त्याच वेळी त्यांना बहुधा आठवलं असावं की क्षितीशला असभ्यासारखं मळक्या फटकुरावर पुऱ्या, मिठाई व पक्वान्नांचा ढीग लावून मांडवात जेवायला बसलेला पाहून त्यांनी त्याला जोरात धमकावून व धक्का मारून मांडवाबाहेर घालवून दिलं होतं.

आपली चूक झाली हे सतीनाथांना मान्य आहे. कितीही झालं तरी तेही अखेर हाडामांसाचेच आहेत ना?

नवरामुलगा आणि वऱ्हाडी मंडळी मांडवात येऊन बसलीच होती आणि कन्यादान करायचं होतं म्हणून सतीनाथनी काहीसुद्धा खाल्लं नव्हतं. अशा, उद्देशाने अधीर, उत्कण्ठेने विचलित आणि आशंकेने थरारणाऱ्या आणीबाणीच्या वेळी असलं घृणित बीभत्स दृश्य सहन करणं काय सोपं आहे?

सतीनाथना ते सहन झालं नाही.

पण ही गोष्ट तो इतकी मनाला लावून घेईन असं त्यांना वाटलं नव्हतं. फार तर इकडे तिकडे भटकून पुन्हा हलवायापाशी जाऊन बसेल असं त्यांना वाटलं होतं. छवी दिसली नाही तेव्हाच त्यांना या गोष्टीचा पत्ता लागला. छवी नसल्याने ते मोठ्या अडचणीत सापडले. सर्वत्र गोंधळ दिसू लागला. चहूबाजूंनी 'छवी, छवी' ची हाकाटी सुरू झाली.

त्याचवेळी कन्यादानाच्या मांडवातच थोरल्या मेहुणीने येऊन छवी का दिसत नाही त्याचे कारण सांगितले.

''कुणास ठाऊक भाई, तुम्ही तुमच्या मेव्हण्याचा अपमान केलात वाटतं. त्याला धक्का मारून बाहेर घालवलं ना म्हणून तुमच्या बहिणीला अतिशय वाईट वाटून ती नवऱ्यासह आपल्या खोलीत जाऊन बसली आहे. तेव्हापासून ती खालीच आली नाही. मेव्हण्याने हलवायांना बाबापुता करून थोडंसं अन्न गोळा केलं होतं वाटतं. ते सर्व अंगणात नि जिन्यात सांडलं आहे. रागात ते फेकून दिलेलं आहे. तो एक वेडा आहे, पण तुमची बहीण तर वेडी नाही?''

या तर्कशुद्ध प्रश्नाने सतीनाथदेखील त्यावेळी भडकले होते. पण कन्यादान करायला बसले होते म्हणून त्यांना काही बोलताही येईना. मात्र आता मन शांत झालं आहे, उदार झालं आहे. म्हणून आता चौकशी केली, ''क्षितीश जेवला का?''

नीट उत्तर मिळालं नाही.

कानावर आलं की, संध्याकाळपासून निदान पन्नास जणांनी तरी वर जाऊन छवीला विनंती केली होती की विवाहसोहळा बघ, चारचौघांत येऊन बस, पंगतीला ये. पण ती अगदी पहाडासारखी निश्चल बसून राहिली. खाली आली नाही.

उद्धटपणाची ही सर्व कथा त्यांनी बायकोच्या तोंडून ऐकली. याउप्परही त्यांचं मन विशाल रहावं अशी आशा करणं व्यर्थ होतं.

लगेच तिसऱ्या मजल्यावर गेले. म्हणाले, ''बघ, हात जोडून तुला विनंती करतोय. चल खाली, आमच्याबरोबर जेवायला ये.''

छवीचा आवाज थरथरत होता का?

का तो सतीनाथच्या मनाच भ्रम होता?

भ्रमच असावा बहुतेक. छवी तर अगदी स्पष्ट आवाजात सांगतेय, ''असं का बोलतोस दादा? सांगितलं ना की अन्नावर मुळी वासनाच नाही माझी. मला जेवण जायचं नाही. डोकं दुखतंय!''

सतीनाथना ते गोळा केलेलं, फेकून दिलेलं अन्न आठवले. त्याचबरोबर आणखी एक गोष्ट आठवली--- वेडा असो, लहरी असो, काही झालं तरी अखेर तो तिचा पती आहे.

सौम्य स्वरात म्हणाले, ''ठीक आहे, जेवण गेलं नाही तरी चालेल, पण एकदा येऊन पाटावर बस तर खरं. क्षितीशसाठी वर ताट पाठवायला सांगतो, त्याला खाऊ घालून खाली ये.''

छवी तशीच स्तब्ध उभी राहून म्हणाली, ''ते जेवणार नाहीत दादा!''

आता संयमाचा बांध फुटला. आणि त्यात आश्चर्यही नाही.

सतीनाथ मग थांबले नाहीत. खाली आले. कटू स्वरात फक्त इतकंच उद्‌गारले, ''बेईमान असेच वागतात.''

त्याच क्षणी अमल वर आला. अखेरच्या पंगतीला वाढायची जबाबदारी त्याने उचलली होती. पण एका सामान्य स्त्रीच्या दुराग्रहामुळे. घड्याळाचा काटा बारावरून सरकून एकावर पोचला होता.

तो यांचा नातेवाईक नाही की कुणी नाही. फक्त शेजारी आहे. त्याला इतकी मोठी जबाबदारी घ्यायची गरज नव्हती. पण त्याने ती घेतली. आता आणखी जास्त उशीर झाला तर त्याचे घरचे लोक काय म्हणतील?

जिन्यावर सतीनाथशी जवळ जवळ टक्करच झाली.

सतीनाथनी अगोदर त्याच्याकडे भेदक नजरेनं बघितलं. मग चिडून उपरोधाने तीव्र स्वरात म्हणाले, ''अच्छा, तुम्हीच काय ते राहिला होता?'' आणि ते खाली निघून गेले.

शेजारचा मुलगा नेहमी येत-जात असतो. त्यांना आश्चर्य वाटलं नाही. पण काही

आशाही वाटली नाही.

अमलला स्वत:ला देखील फारशी आशा नव्हती.

अमलने सारं काही ऐकलं होतं. अथपासून इतिपर्यंत! म्हणूनच अमलला खात्री नव्हती. तरी पण एकदा प्रयत्न करून बघायची त्याची इच्छा होती. इतक्या ताठरवृत्तीची छवी कशी दिसते हेच बघायची अमलची इच्छा होती वाटतं.

छवी त्यावेळी हलकेच दार बंद करीत होती. आता जरा विश्रांती घ्यायचा तिचा बेत असावा कदाचित!

अमलला बघून तिचे हात थबकले. दार अर्धवट बंदच राहिलं.

अमल विचार करू लागला, पटदिशी काडी पेटवावी का? बघावं तरी तिचा चेहरा कसा दिसतो?

पण नाही पेटवली.

म्हणाला, ''दिवा लाव ना!''

छवी पहिल्यासारखीच रुक्ष आवाजात म्हणाली, ''काय जरूर आहे?''

''खरं म्हटलं तर जरूर काहीच नाही. पण तू कशी भुतासारखी दिसते आहेस म्हणून–''

छवीने प्रत्युत्तर दिलं नाही. चलबिचल दर्शविली नाही. किशोरावस्थेतील स्मृतीचे जतन करण्यासाठी त्या हास्यास्पद वाक्यावर हसलीसुद्धा नाही. त्या धूसर प्रकाशात ती चित्रासारखी नुसती स्तब्ध उभी राहिली.

अमलला छवीच्या खोलीतलं काही दिसत नव्हतं. अर्धवट मिटलेल्या दारातच छवी उभी होती. म्हणून खोलीच्या आत एकदा नजर टाकायचा व्यर्थ प्रयत्न करून अमल म्हणाला,

''क्षितीश बाबू झोपलेत का?''

छवी जणू उगाचच जराशी हसली. म्हणाली, ''हो.''

''सतीनाथदादा त्यांना काहीतरी बोलले असं ऐकलंय. पण छवी तू जरा समजुतीनं घेतलं असतंस तर प्रकरण या थराला गेलं नसतं. ऐकून ऐकून कान किटून गेले बघ–''

यावेळी छवी हसली.

पुन्हा एकदा अमलला वाटलं की छवी भुतासारखी दिसतेय. तिचे हसणेसुद्धा भेसूर आहे. हसत हसत छवी म्हणाली, ''माझ्या निर्लज्जपणामुळे तुला का लाज वाटली अमल?''

खरंच,आगकाडी पेटवावी का? बघावं नुसती निर्लज्जच नव्हे तर निष्ठुर छवीचा चेहरा कसा दिसतोय?

अंधाराने झाकोळलेल्या छवीला ओळखणं कठीण होत होतं.

छवीच्या दादांची फसगत झाली होती. मागचा पुढचा विचार न करता त्यांनी

लग्न एका वेड्याशी लावून दिलं होतं. तरी छवीने कधी दादांविरुद्ध तक्रार केली नव्हती. छवीच्या थोरल्या दिरांनी वेड्या भावाला व त्याच्या बायकोला इथं पाठवून दिलं तरी तिने त्यांना काही वेडंवाकडं म्हटलं नव्हतं.

अमलच्या भित्रेपणाचा तिने कधी धिक्कार केला नव्हता. छवी अगदी सहज स्वाभाविक रीतीने वागत राहिली आहे. लग्नापूर्वी जसं घरचं कामकाज करायची, तशीच आताही करतेय, त्याचबरोबर वेड्याचाही सांभाळ करतेय.

पण या सर्व गोष्टींवर एक विचित्र प्रकारचं आवरण घालून ती स्वतःला लपवीत असते हे अमलला काय ठाऊक नाही? अमल नेहमी येत असतो.

क्षितीश बराच वेळ दिसला नाही तर थट्टेच्या शब्दांतून छवी आपला उद्‌वेग व्यक्त करते. बोलता बोलता अचानक उभी राहून म्हणते, ''बघा, किती वेळ झाला. मी आपल्या खजिन्याची वास्तपुस्तच केली नाही. चला बघू देत, कुठं साधू होऊन निघून तर नाही गेलेत?'' कधी म्हणते, ''किती वाजलेत? अग बाई, आभाळ भरून आल्याने किती वाजलेत ते समजलंच नाही. स्वामी कुठं स्वतःच स्वैपाकघरात शिरून पातेली तर रिकामी करीत नाहीत ना? बघू देत.'' कधी म्हणते, ''ते बघ दयासिंधू अचानक तोंड काळं करून निघालेत. आपण बसून गप्पा मारतोय. त्यांना कसं सहन होणार? निघते बाई, नाहीतर सांब सदाशिव रुद्रावतार धारण करायचे!''

वेड्याच्या वेड्या चाळ्यांवर कुणी थट्टा केली किंवा चीड दाखवली तरी छवीला राग आलेला कुणी कधी पाहिला नाही. बोलणाऱ्याच्या सुरात सूर मिसळून म्हणायची, ''सांगा भाऊ, तुम्ही सगळे मिळून सांगा ना? माझं काम थोडं हलकं होईल. जावयासारखी बडदास्त ठेवायच्या ऐवजी 'प्रहारेण धनञ्जय :' केलं तर मोठे उपकार होतील.''

नेहमी हसत हसत बोलते.

पण आज मात्र पतीचा जरासा अपमान होताच तीच छवी खरंच किती बदलून गेली आहे!

तर मग सतीनाथची पत्नी म्हणते तेच खरं मानायचं का काय? मत्सराग्नीमुळेच जराशी संधी मिळताच छवी असं वागतेय हे खरं मानावं लागेल का? दादांच्या मुलीचं लग्न इतक्या थाटात लागलं, तिला इतका चांगला नवरा मिळाला म्हणून तिचा जळफळाट होतोय का?

छवीच्यां बाबतीत असा विचारसुद्धा मनात आणता येत नाही.

पण छवीच असं वाटायला भाग पाडीत आहे. या असल्या विक्षिप्त वागणुकीने तसं वाटायला लावीत आहे.

हा मत्सरच आहे का?

नाहीतर छवी कुठे इतकी पतिभक्त होती? उलट तिची वहिनी तर म्हणते, ''नवरा वेडा असल्याचं छवीला जरादेखील दुःख असेल असं काही वाटत नाही. काय विलक्षण मन आहे तिचं!''

छवीचं तेच विलक्षण मन आता मत्सराग्नीने जळून गेलं आहे.

पण मनातले हे चढउतार अमलने व्यक्त केले नाही. फक्त इतकंच म्हणाला, ''किती निष्ठुर आहेस तू छवी!''

छवी म्हणाली, ''आज समजलं होय? पण तू का आलास ते तर सांग. जेवायसाठी बोलवायला आलास का?''

अमलने आपली घायाळ दृष्टी वर करून पुन्हा एकदा छवीला न्याहाळायचा प्रयत्न केला. त्यानंतर म्हणाला, ''नाही, तुला बोलवायला येण्याइतकं दुःसाहस माझ्यात नाही. वाटलं होतं– क्षितीश बाबूंना उपाशी ठेवून तू दादांना किती कठोर शिक्षा देत आहेस? इतकंच नव्हे त्या भल्या माणसाला पण डांबून ठेवलंस. त्यांनी किती उत्साहाने मला म्हटलं होतं की तूच मला वाढ बरं! हे दुसरे लोक काही नीट वाढणार नाहीत.''

बोलणं थांबवून अमल किंचित हसला. म्हणाला, ''हो, त्यांनी 'हे दुसरे लोक' नव्हतं म्हटलं; तर म्हटलं होतं 'हे साले'!''

इतक्या वेळच्या उपासाने छवीचा घसा काय इतका कोरडा पडला आहे? का इतक्या वेळच्या उद्धट आचरणाचा तिला पश्चात्ताप होतोय? नाहीतर छवीचा गळा किती गोड आहे!

गोड होता. पण आता नाही. यावेळी त्या शुष्क कंठानेच छवी म्हणाली, ''पण मग तू जेवायला वाढायची वाट त्यांनी कुठे बघितली, स्वतःच तर–''

''जाऊ दे छवी --- तुला जेवायचं नसेल तर नको जेवूस. पण त्यांना जरा उठव बघू, मला माझं वचन पुरं करू देत.''

छवीने जुन्या सर्व स्मृतींना तिलांजली दिलेली दिसते. तशीच निश्चल उभी राहून म्हणाली, ''ते नाही जेवणार.''

''छवी, खरंच तू अतिशय उद्धटपणा करीत आहेस. प्रत्येक गोष्टीला एक सीमा असावी लागते. आज रागाच्या भरात तू त्यांना जेवू दिलं नाहीस तरी उद्या जेवू घालावं लागेलच ना? त्यावेळी?''

छवी हसली. खरंच हसली. भकासपणे हसली.

म्हणाली, ''उद्या पण जेवणार नाहीत अमल, उद्या नाही, परवा नाही, कधीच नाही.''

या साध्या बोलण्याने अमलचा थरकाप का झाला? छवीचं हसणं ऐकून त्याला

खरंच का ती भुतासारखी दिसतेय?

म्हणूनच तर तो एकदम 'छवी–' म्हणून जोरात किंचाळला.

छवीने त्या हाकेला प्रत्त्युत्तर दिलं नाही. अजिबात हललीसुद्धा नाही.

आणि छवीच्या त्या निस्तब्ध मूर्तीकडे पाहून अमल अचानक बऱ्याच दिवसांपासून विसर पडलेला एक मूर्खपणा करून बसला. छवीच्या अगदी जवळ जाऊन त्याने दारावर ठेवलेला छवीचा हात जोरात दाबला. म्हणाला, "छवी, दिवा लाव!"

छवीने हळूच हात सोडवून घेतला.

विचारलं, "कशासाठी?"

"मला बघायचंय."

"बघण्यासारखं काय आहे अमल?"

"छवी, स्वतःला इतकी निरपराध समजू नकोस. दारातून बाजूला हो. मला बघू दे."

तरीसुद्धा छवी हलली नाही.

फक्त आवाज आणखी दृढ केला. " खरंच बघण्यासारखं काही नाही अमल."

अमलदेखील भूत बनलाय का?

अमल असा का बरं दिसतोय?

इतका वेळ गैरहजर राहिल्याने खाली लोकांना काय वाटत असेल हे तो विसरला का? त्यांच्या किशोर वयाचा इतिहास काय कुणाला ठाऊक नाही?

बऱ्याच वेळानंतर बहुधा अमलला आठवलं असावं की खालच्या मजल्यावरदेखील एक वेगळं जग आहे. त्याला खाली जायला हवं. त्याने विचारलं, "छवी, असं कसं झालं?"

छवी विचित्र आवाजात म्हणाली, "वेड्याचा वेडेपणा, दुसरं काय? 'साल्याने मला जेवू दिलं नाही' म्हणून आपल्याच डोक्यात खिळा ठोकू लागले.–"

"छवी, तू फत्तराची आहेस का ग?"

"काही सांगू नकोस अमल, तुला माझी शपथ! वधूवर माजघरात आहेत. त्यांची ही रात्र बरबाद करू नकोस."

"छवी, कसं ग तू हे सारं सहन करत आहेस?"

"सहन करायलाच हवं अमल! सीमारेषा विसरून कसं चालेल? त्यांच्या या आनंदाच्या वेळी काय मी आपलं–"

"रात्रभर तू अशीच रहाणार?"

"नाही, झोपेन. झोप येतेय. वाटतंय खाली पडेन–"

असभ्य आणि उद्धट छवीने अचानक अमलदेखतच धाडदिशी दार लावून घेतलं.

खटकन एक आवाज झाला. कडी घातल्याचा!

हो, दार बंद केल्याखेरीज छवी राहू शकत नाही. सतीनाथचं बोलणं तिला पटतंय. प्रत्येक गोष्टीला सीमा असते, असायला हवी!

काही तास त्या थंडगार अंधारात घालवल्यावर छवीला पुन्हा मानसिक बळ येईल. उद्या सकाळी पुन्हा खाली जाऊन ती अगदी सहज स्वाभाविक आवाजात सांगू शकेल, "काल लग्नाच्या गडबडीत तुम्हाला त्रास दिला नाही, पण आता दिल्यावाचून चालणार नाही. वर जाऊन एकदा बघून घ्या. पुढचं सारं तुम्हालाच उरकावं लागणार आहे!"

# लुच्ची

## सुबोध घोष

सनातन आणि सनातनची मुलगी सुधा. बाप तशी लेक.

एका पाठोपाठ एक विलक्षण घटना घडत जातात आणि त्यामुळे बाप जसा व्यथित होऊन डोकं धरून रडू लागतो, तशीच लेक देखील वेदनांच्या जडभारामुळे मान वर करून बघू शकत नाही, डोळ्यांना पदर लावून हमसून हमसून रडू लागते. आजूबाजूला उभं राहून हे दृश्य बघणाऱ्या लोकांचे डोळेही अश्रूंनी भरून येतात आणि ते दीर्घ निःश्वास सोडतात. अरेरे! काय हा प्रसंग! एकुलत्या मुलीखेरीज दुसरं कुणीही जगात नाही. त्याच मुलीची परक्या घरी पाठवणी करताना त्या माणसाच्या हृदयाचे तुकडे नाही होणार तर काय होणार?

सुधाच्या लग्नाच्या दुसऱ्या दिवशी जेव्हा तिची सासरी पाठवणीची वेळ आली तेव्हा नवरा मुलगा, वऱ्हाडी मंडळी आणि चारदोन दुसरी माणसं यांच्यासमोर सनातन रडू लागला. सुधा देखील ओक्साबोक्शी रडू लागली.

पण जेमतेम महिना उलटला असेल नसेल तोच आळीतली माणसं, तो नवरा आणि इतरही बरेचसे लोक–सगळ्यांच्याच नीट लक्षात आलं की बाप तशी लेक! त्यात काडीचाही फरक नाही. सनातन जितका लुच्चा आहे, तितकीच त्याची लेकही लुच्ची आहे. माणसाला ठकविण्याच्या विद्येत दोघेही पारंगत आहेत. दोघांपैकी कुणीही त्यात उणा नाही. जसा बाप तशी लेक!

पोलिसांचं मात्र म्हणणं आहे की जशी लेक तसा बाप. आजवर तीनदा झालंय हे. पहिल्यांदा तारकेश्वरात, आणि मग बशीरहाटमध्ये फसवणुकीची अशीच दोन प्रकरणं होऊन गेली आहेत. दोनच महिन्यांत दोन प्रकरणं. आता हे तिसरं घडलंय. तिन्ही प्रकरणात याच लेकीचा हात दिसतोय. लोकांना असं फसवायचं हाच या दोघांचा उद्योग आहे.

भाटपाडा बाजाराजवळच्या एका गल्लीतल्या एका लहानशा घराजवळ पोलीस आले. दार बंदच होतं. कुलूप फोडलं. झडती घेतली. पण घर अगदी पार धुऊन काढल्यासारखं रिकामं होतं. काडीसुद्धा मिळाली नाही. सनातन आणि सुधा-बाप आणि लेक – जणू जादूचा अद्भुत खेळ दाखवून अचानक हवेत विरून गेले. ते कधी पळून गेले कुणालाच ठाऊक नाही. महिन्यापूर्वी याच बापाचे व त्याच्या मुलीचे अश्रू बघून आळीतल्या लोकांनीही आसवं गाळली होती. तेच आज लज्जित झाले

आहेत. उपरोधिक बोलताहेत! खरं म्हणजे जग हा एक अजबखाना आहे. काय काय अतर्क्य गोष्टी इथं घडत असतात.

पण कुणी कुणी म्हणतं, प्राण्यांच्या अजबखान्यात अशा वाईट गोष्टी इथं घडत नसतात. माणसांच्याच दुनियेत त्या घडतात.

आणखी एक जण म्हणाला, ''आपल्या आळीत आपल्या डोळ्यांदेखत हे व्हावं ही किती शरमेची गोष्ट आहे. कोण जाणे कुठून एक माणूस व त्याची मुलगी इथे येतात काय आणि थोड्याच दिवसांत सगळ्यांना मूर्ख बनवून जातात काय, सारंच अजब! कुणालाही त्यांचा काडीचाही संशय आला नाही.''

खरंच, कुणालाही जरासुद्धा संशय आला नाही. त्या डोकं आपटून ओक्साबोक्शी रडण्यामागे एक विलक्षण लबाडी हसत आहे हे तो नवरामुलगा, ती वऱ्हाडी मंडळी आणि आळीतली लोकं यांच्यापैकी कुणालाच दिसलं नाही. आणि दिसणार तरी कसं? बाप आणि मुलीच्या त्या करुण विलापाचं चित्र आठवताच अजूनही सर्वांना वाटतं की छे, छे, लबाडी नाही, दुसरंच काही असावं.

पोलिसांचं म्हणणं आहे, ''दुसरं काही नाही. ते बाप व लेक आहेत हे निश्चित. एकानंतर दुसऱ्या नव्या जागी जाऊन, नवी नावं धारण करून आणि नवी जात सांगून बाप व त्याची मुलगी दोघे काही दिवस रहातात. त्यानंतर असाच काही घोटाळा करून तिथून पळ काढतात.''

आळीतले लोक दुःखित आणि लज्जित होऊन अपराधी नजरेने एका माणसाकडे बघत रहातात. नुकताच महिन्यापूर्वी एके दिवशी संध्याकाळी मुंडावळ्या बांधून तो या आळीत गाजत वाजत आला होता. या ओस घरातल्या एका गरीब बापाला हुंड्याच्या काळजीतून मुक्त करण्यासाठी! आळीतली पोरं दात दाखवून हसत असतात.

हे गृहस्थ काहीसे वयस्क आहेत. वय पंचेचाळीसच्या पुढेच असेल, पन्नाशीच्या आसपास. नैहाटीत त्याचं कापडाचं दुकान आहे. विधुर आणि निपुत्रिक व्यापारी आहेत ते. पुन्हा लग्न करायची त्यांची इच्छा नव्हती, तशी तयारीही नव्हती. पण सनातन बाबूंशी ओळख झाल्यावर आणि सनातनबाबूंची हलाखीची परिस्थिती समजल्यावर त्यांचं मन विरघळलं. त्याचं प्रौढ मन देखील जगाकडून एक प्रेमळ हास्य मिळवण्यासाठी आसुसलं. याच गल्लीत आणि याच घरात एके दिवशी सनातनबाबूंच्या आमंत्रणावरून थोडीशी खीर आणि वडे खाल्ल्यावर त्यांनी निर्णय घेऊन टाकला की सनातनबाबूंना हुंड्याच्या काळजीतून मुक्त करायलाच हवं. आपल्याच जातीच्या एका गरीब माणसाची इतकी सुंदर मुलगी अशी या गल्लीच्या अंधारात खितपत पडून आहे. या विचाराने नैहाटीच्या त्या श्रीमंत व्यापाऱ्याला अतिशय वाईट वाटलं. अखेर, मुलीचे वडील सनातनना रोख पाचशे रुपये, कन्यादानासाठी काही सामान आणि मुलीसाठी दहा तोळे सोन्याचे दागिने देऊन

सनातनच्या संमतीने नैहाटीच्या गणेश वस्त्रालयाच्या या मालकाने मुहूर्त ठरवून टाकला. बिचारा! सुंदर सुधाचा पदरांआडून दिसणारा चेहरा न्याहाळीत, स्वतःला धन्य समजत आणि सुधाला बरोबर घेऊन एके दिवशी सकाळी याच गल्लीतल्या याच घरून तो गेला होता. तोच माणूस आज पोलीस घेऊन दाराशी उभा आहे. लग्नानंतर आठवड्याने सनातन स्वतः नैहाटीला जाऊन सुधाला बरोबर घेऊन या घरी परत आला होता. त्यानंतर ते दोघे या घरात किती दिवस राहिले ते निश्चितपणे कुणालाही सांगता येत नाही. पत्राचं उत्तर मिळालं नाही तेव्हा गणेश वस्त्रालयाचे मालक एक दिवस खुद्द इथे आले. घराचं दार बंद बघून ते चमकले. पोलिसात वर्दी दिली आणि आता पोलिसांचं म्हणणं आहे की हा प्रसंग धरून तीनदा, म्हणजे यापूर्वी दोनदा याच बापाने याच मुलीचं लग्न लावलं आहे आणि लग्नानंतर थोड्याच दिवसांनी बाप व लेक दोघे गायब झाले आहे. पोलिसांना त्यांची खरी नावे अजून कळलेली नाहीत.

तारकेश्वरात ते ब्राह्मण म्हणून राहिले होते तर बशीरहाटमध्ये कायस्थ म्हणून. भाटपाड्याला येऊन ते वैद्य बनले होते. तारकेश्वरमधला फसवणुकीचा आरोप प्रसन्न चक्रवर्ती नावाच्या एका बापावर आणि सुनयना नावाच्या त्याच्या मुलीवर होता. बशीरहाटमधला फसवणुकीचा आरोप सदानंद घोष नावाचा एक बाप आणि माधवी नावाची त्याची मुलगी यांच्यावर होता. आणि आता भाटपाड्याच्या या गल्लीत तेच सनातन सेन आणि सुधा सेन नावाने एक जगावेगळे बाप आणि मुलगी होऊन लुच्चेगिरीची आठवण मागे ठेवून लंपास झाले होते. तीनतीन निष्पाप आणि विश्वासू जीवांना खोट्या सुहागरात्री आणि नकली पुष्पशय्यांचे आधारे निर्घृणपणे फसवून आता तो अजब ठक आणि त्याची ती लुच्ची लेक या जगाच्या अफाट गर्दीत कुठे जाऊन दडले आहेत कुणास ठाऊक? जशी लेक तसाच तिचा बाप!

पोलीस भाटपाड्याच्या गल्लीतून हात हलवीत परत गेले. आळीतली माणसं आ वासून विचार करीत राहिली. आणि, गणेश वस्त्रालयाच्या मालकाच्या कल्पनेतलं एक शांत सुंदर हसरं चित्र पुसून त्याच्या जागी दुःख व विस्मय दाटून आलं. अरेरे! माणसाने माणसाला असा दगा द्यावा ना?

पण नेमक्या त्याच वेळी राणाघाटच्या एका गावातल्या एका सामान्य घराच्या खिडकीकडे पहात एक तरुण उभा होता. आपल्या नशिबाला एका निष्ठुर फसवणुकीच्या जाळ्यात अडकविण्यासाठी आणखी एका माणसाचे डोळे लकाकत होते. ही गोष्ट भाटपाड्याच्या गल्लीला ठाऊक नव्हती. पोलिसांनाही माहीत नव्हती की गणेश वस्त्रालयाच्या मालकांनाही त्याची काही कल्पना नव्हती. विजयबाबू नावाच्या एका सज्जन गृहस्थाची कबरी नावाची एक तरुण कन्या रमेश नावाच्या एका तरुणाशी बोलत होती.

खिडकीजवळ उभी राहून घरातूनच कबरी घमेंडीने म्हणते, ''तुम्ही असे रोज

रोज का येता?''

रमेश प्रसन्नपणे स्मित करीत राहतो, ''एका ज्योतिषाने माझा हात पाहून काय सांगितलं होतं ठाऊक आहे? ज्या मुलीशी माझं लग्न होईल तिच्या नावाचं पहिलं अक्षर 'क' असेल.''

कबरीदेखील हसते, ''पण असं रोजरोज खिडकीपाशी उभं राहिल्याने माझी बदनामी झाल्यावाचून राहील का? एवढं कसं तुमच्या लक्षात येत नाही?''

सायकलीला टेकून रस्त्यावर उभ्या उभ्याच रमेश म्हणतो, ''इथं आल्यावाचून मला रहावतच नाही कबरी. ज्या दिवशी तू पहिल्यांदा माझ्याकडे पाहिलंस त्याच दिवशी मी ओळखलं की तूच माझं सर्वस्व आहेस, माझं सुखनिधान आहेस.''

कबरी, 'हे तुमचं मोठ्या माणसांसारखं बोलणं झालं. आता यायला आवडतंय, पण काही दिवसांनी सगळं विसरून जाल. मग इथं यावंस वाटणार नाही. आणि येणारही नाही तुम्ही. का मग उगाच---''

रमेश, ''मी काही मोठा माणूस नाही की त्यांच्यासारखं मला बोलता येत नाही. तुला बघितल्यावाचून जगणं अशक्य आहे म्हणून मी येतो. मी खोटं बोलत नाही कबरी.''

कबरी, ''तुम्ही मोठे माणूस नाही?''

रमेश हसतो, ''मुळीच नाही.''

कबरी, ''मग करता काय तुम्ही?''

रमेश, ''मी आर्टिस्ट आहे.''

कबरी, ''म्हणजे?''

रमेश, ''तू कधी कलकत्त्याला गेली आहेस?''

कबरी, ''हो, होते तिथे काही दिवस.''

रमेश, ''कधी सिनेमा पाहिला आहेस?''

कबरी, ''हो. एक दोन बघितलेत.''

रमेश, ''सिनेमा हाऊसच्या भिंतीवरील मोठमोठी रंगीत चित्रं बघितली आहेस कधी?''

कबरी, ''हो.''

रमेश, ''ती चित्रं मीच काढतो.''

कबरी, ''त्याचे तुम्हाला पैसे मिळतात?.''

रमेश, ''हो तर! धंदाच आहे माझा तो. आणि तसं पाहिलं तर माझा हा धंदा काही वाईट नाही.''

कबरी, ''महिन्याकाठी पन्नास तरी मिळत असतील?''

रमेश, ''हो, हो. का नाही?''

कबरी, ''नेमके किती मिळतात सांगा ना?''

रमेश, ''किती का मिळेनात. तुला सुखात ठेवायला तेवढे पुरेसे आहेत.''

कबरी तोंड फुगवून म्हणते, ''हो, गरीब मुलीला सुखात ठेवायला वर्षाकाठी दोन पातळं आणि रोज एक वेळ मूठभर तांदूळ मिळाले की झालं. आणखी काय हवंय, असंच ना?''

रमेश अस्वस्थ होऊन म्हणतो, 'हे काय बोलतेस तू? मी काय वर्षाला दोन धोतरं नेसतो की रोज एक मूठभर तांदूळ फक्त खातो?''

कबरी हसते, ''तर मग असं बोला ना की तुमच्यापाशी पैसा आहे.''

रमेश, ''तुला छान नटवून ठेवण्याइतपत, कष्टापासून दूर ठेवण्याइतपत पैसा माझ्यापाशी नक्कीच आहे. तरीदेखील--- त्या तितका---''

दूरवरच्या एका मारवाडी शेठच्या विशाल इमारतीकडे हाताने खुणावून रमेश म्हणतो, 'मी त्यांच्यासारखा मोठा माणूस नाही. तू पण तशी नाहीस कबरी, म्हणूनच---.''

कबरी, ''लग्नाचा खर्च कुठून आणायचा?''

रमेश थोडा वेळ गप्प राहून काहीतरी विचार करतो. मग थोडा हताश होऊन विचारतो, ''विजयबाबूंपाशी काहीच नाही का?''

कबरीचे डोळे भरून येतात, ''असतं तर–''

रमेश, ''किती खर्च लागेल?''

कबरी, ''मला काय ठाऊक? गृहस्थाघरच्या मुलीच्या लग्नात अगदी काही नाही म्हटलं तरी कमीत कमी दोन हजार रुपये तरी लागतीलच.''

रमेश दचकतो, ''दोन हजार?''

चीड आणि संशयाचे भाव कबरीच्या डोळ्यात दिसू लागतात."एवढा कसला विचार करताय? दोन हजाराची ही क्षुल्लक रक्कम देखील नाही जमवता येणार?''

रमेश विषण्ण स्वरात उत्तरतो, ''का नाही येणार? पण लगेच जमवायची म्हटलं तर मात्र शेदोनशे असे करून कित्येकांकडून उसने घ्यावे लागतील. त्याखेरीज दुसरा उपाय नाही.''

कबरी, ''तर मग घ्या की उसने. उधाराचं काय कधी ना कधी परत करता येतील. पण जर फार उशीर झाला तर–''

बोलता बोलता कबरी अचानक मध्येच थांबते. तिचे डोळे भरून येतात.

रमेश विचारतो, ''काय झालं?''

कबरी, ''खरंच का तुमचं माझ्यावर प्रेम आहे?''

रमेश, ''होय कबरी.''

कबरी, '' तर मग जरा लवकरच व्यवस्था करा. जर तुम्ही व्यवस्था केली नाही तर जीव देण्याखेरीज मला गत्यंतर राहणार नाही.''

रमेश अस्वस्थ होतो, ''हे काय वेड्यासारखं बोलतेस?''

कबरी, '' वेड्यासारखं नाही. खरं तेच सांगतोय. एका बीजवर म्हाताऱ्याशी माझ्या लग्नाची बोलणी ठरत आली आहेत. लग्नाच्या खर्चासाठी म्हणून ती मंडळी बाबांना तीन हजार रुपये देणार आहेत.''

सायकलीच्या हँडलवरची रमेशची पकड घट्ट झाली. डोळे व चेहऱ्यावर अचानक कसल्यातरी निश्चयाचा भाव दृढ होतो. कबरीच्या चेहऱ्याकडे पहात तो म्हणतो, ''मी ते होऊ देणार नाही कबरी. त्या म्हाताऱ्याचे रुपये घेऊ नका म्हणून बाबांना सांग.''

सायकलीच्या पॅडलवर पाय ठेवीत जवळ जवळ ओरडूनच रमेश म्हणतो, ''मी वचन देतो कबरी. लग्नाचा सर्व खर्च माझ्या अंगावर. दहा दिवसांच्या आत मी तुला लग्न करून घेऊन जाईन.

रमेश निघून जातो.

राणाघाटच्या त्या मोहोल्ल्यातल्या एका छोट्या घराच्या अंगणात एक लहानसा समारंभ साजरा झाला. आळीतले लोक थोड्याच दिवसात विजयबाबू नावाच्या नवागन्तुक गरीब सज्जन व कबरी नावाच्या त्याच्या शांत सुशील मुलीच्या वागणुकीवर लुब्ध झाले होते. फराळाची काही थोडीशी व्यवस्था करायची विजयबाबूंची इच्छा होती. पण आळीतल्या लोकांनी त्यास नकार दिला. उगाच हा खर्च कशाला? इतक्या सामान्य परिस्थितीतल्या माणसाने हा सर्व दिखाऊ खर्च करायचा म्हणजे भलतंच!

फक्त दीड हजारांचे दागिने मुलीच्या अंगावर घालून आणि बाकी खर्च कसाबसा भागवून विजयबाबूंनी मंगलकार्य पार पाडलं. आळीतल्या लोकांना वाटलं, बिचाऱ्याने जन्मभर पैपैसा करून जे काही साठवलं ते सर्व खर्च करून मुलीला सुवर्णालंकारांनी नटवलं आहे. खरं म्हणजे इतकं करायची काही जरूर नव्हती. कारण वराने काही मागणी केली नव्हती की कसला काही हट्ट धरला नव्हता. ते काही असो. एकुलती एक मुलगी आणि भल्या माणसावर तेवढीच एक जबाबदारी असल्याने ती पार पाडण्यासाठी त्या भल्या माणसाने स्वतःला कंगाल करून टाकलं. लेकीवर फार जीव आहे विजयबाबूंचा.

रमेशने दिलेल्या पैशांतून खरेदी केलेल्या दागिन्यांनी नटून रमेशची नवपरिणीता वधू कबरी रमेशबरोबर निघाली. लेकीच्या सासरी पाठवणीच्या वेळी तारकेश्वर, बशीरहाट आणि मग भाटपाड्याच्या आळीतल्या लोकांचे डोळे ओले करणाऱ्या प्रसंगांचीच पुनरावृत्ती झाली. तसेच करुण दृश्य तिथे निर्माण झाले. विजयबाबू हमसून हमसून रडत राहिले आणि कबरीदेखील ओक्साबोक्शी रडत राहिली.

राणाघटच्या त्या आळीतल्या अनेक लोकांचे डोळे ओले करून कबरी पतीबरोबर पतीच्या घरी निघून गेली. त्याच दिवशी संध्याकाळी कलकत्त्याच्या बागबाजारमधल्या एका गल्लीतल्या एका लहानशा घराच्या एका खोलीत रमेश व

त्याची नववधू कबरी यांनी आपला नवा संसार थाटला.

त्यानंतर दोनच दिवसांनी बागबाजारमधल्या त्या लहानशा घरात रात्रभर समारंभाचे दिवे लकाकत राहिले. समारंभात बडेजाव नव्हता. पण हर्षोल्हास नक्कीच होता. रमेशची आपली म्हणण्यासारखी जी चारदोन माणसं होती त्यांच्यापैकीच काहींनी जमून रमेशच्या आयुष्यातील उत्सवाचा कार्यभार उचलला होता. एक मावशी व तिच्या तीन मुली आल्या होत्या. एक थोरले काका आपल्या दहाबारा मुलांना घेऊन आले होते. रमेशच्या दोन मित्रांच्या मातोश्री व एका मित्राची पत्नीदेखील आली होती. सून बघून सगळ्यांनाच आनंद झाला. एक रात्र व एक दिवस खूप धामधुमीत, गप्पाटप्पात, थट्टामस्करीत घालवून सगळे आपापल्या घरी निघून गेले. त्यावेळी सायंकाळचं सोनेरी ऊन खिडकीवर येऊन विसावलं होतं. इतक्या वेळानंतर आता कुठे नववधूने सुटकेचा निःश्वास टाकला. कपाळावरचा पदर थोडा बाजूला करून आपल्या टपोऱ्या काळ्या डोळ्यांनी तिने खोलीत चहूबाजूंना नजर टाकली. रमेश तिच्या चेहऱ्याकडे टक लावून पहात होता.

थोड्या वेळाने तो कबरीला म्हणाला, ''कबरी, मी कापडावर तुझं एक चित्र रंगवीन, दोनच दिवसात पुरं करून टाकीन बघ. मग स्वतःच्या नजरेनं बघून तुला समजेल की माझे हात काय करामत करू शकतात ते!''

कबरी उत्सुकतेने न्याहाळते, ''मला समजणार नाही असं कां म्हणता?''

रमेश, ''चित्रात मी तुझे डोळे अगदी सजीव करून टाकीन.''

कबरी, ''करा. मी परत आल्यावर पाहीन.''

रमेश चकित होतो, ''म्हणजे? कुठं जाणार आहेस तू?''

कबरी, ''बाबांकडे.''

रमेश, ''ते तर तू जाशीलच ग. पण एकदोन दिवसात थोडीच जाणार आहेस?''

कबरी, ''जावंसं वाटत नाहीये. पण बाबाच जर न्यायला आले तर जावं लागेल ना.''

रमेश, ''तुझे बाबा येणार आहेत का?''

कबरी, ''उद्या सकाळी येतील असं वाटतंय.''

कबरी थोडा वेळ गप्प राहते. त्यानंतर अचानक जणू कुठल्याशा असह्य वेदनांनी तळमळू लागते. बाबांची आठवण झाली की काहीसुद्धा सुचत नाही. अजून ते रडत असतील, असं वाटतं.''

रमेश सांत्वनेच्या स्वरात म्हणतो, ''त्यात नवल ते काय? तू त्यांची एकुलती एक मुलगी. त्यांना किती वाईट वाटत असेल याची कल्पना आहे मला, कबरी. पण--- जाऊ दे. नंतर बघता येईल. अगोदर तुझ्या बाबांना येऊ तर दे. मग मीच त्यांची समजूत घालीन.''

कबरी, ''काय सांगाल तुम्ही त्यांना?''

रमेश, ''हेच की महिन्यानंतर तुला पाठवीन. त्या अगोदर तुला माहेरी न्यायचा हट्ट त्यांनी धरू नये.''

कबरी, ''पण बाबा कदाचित ऐकायचे नाहीत. आणि तुम्हीदेखील फार ताणून धरू नका. नाहीतर बाबांना आणखी वाईट वाटेल.''

रमेश विषण्णपणे हसतो, ''पण मला किती वाईट वाटेल ते नको का त्यांनी लक्षात घ्यायला?''

कबरी, ''तुम्हाला कशाचं वाईट वाटणार आहे?''

रमेश, ''तुझे बाबा जर उद्या आले आणि तू त्यांच्याबरोबर निघून गेलीस तर मला-- मला अतिशय वाईट वाटेल कबरी.''

कबरी आपल्या मोठ्या काळ्याभोर डोळ्यांनी तीक्ष्णपणे रमेशच्या चेहऱ्याकडे टक लावून बघत राहिली.

रमेश, ''तू जर गेलीस तर मीदेखील तुझ्याबरोबर येईन. दोनचार दिवस तुझ्याबरोबरच राणाघाटला राहून मग तुला बरोबर घेऊनच परत येईन.''

कबरी, ''इश्श! लोक काय म्हणतील? असं बोलावल्याखेरीज का कुणी सासुरवाडीला जात असतं?''

रमेश, ''तुझे बाबा काय मला बरोबर चलायला सांगायचे नाहीत?''

कबरी, ''नाही.''

रमेश, ''का?''

कबरी अडखळते, ''कुणास ठाऊक?''

रमेश, ''मग तूच सांग की बाबांना तसं.''

कबरी, ''काय?''

रमेश, ''मलाही बरोबर घेऊन चला म्हणून.''

कबरी, ''वा, तुम्ही मला इतकं निर्लज्ज समजलात की काय? कुठलीही मुलगी आपल्या वडलांना असं सांगते वाटते?''

रमेश गप्प राहतो.

कबरी, ''का? असे गंभीर का झालात? काही शंका आली का?''

रमेश, ''शंका? कसली शंका?''

कबरी, ''नाही, तुमच्या मनाला कदाचित शंका आली असेल की मला तुमच्याविषयी काही वाटतच नाही.''

रमेश, ''माझ्याविषयी तुला काही वाटत नाही असला संशय घेण्यापूर्वीच माझा जीव जाईल.''

कबरीचा थरकाप होतो. तिच्या मनात कसलीशी जीवघेणी भीती दाटून राहिली असल्यासारखं वाटतं. हळूहळू जणू अडखळत अडखळत श्वास घेत कबरी म्हणते, ''तुमचा का म्हणून जीव जाईल? त्यापेक्षा मीच मरून जाईन. मग तुम्ही दुसरं लग्न

करून नवी बायको या घरात आणा आणि माझा विषय काढून खूप चेष्टा करा.''

रमेश, ''ए, थट्टेतसुद्धा असलं भयंकर बोलणं चांगलं नाही हं कबरी.''

कबरी, ''सुदैवी लोकांच्याच बायका अगोदर मरतात.''

रमेश, ''साफ खोटं.''

रमेश हसत कबरीपाशी येऊन तिचा हात धरतो, ''अशी बायको तरी कुणाला मिळते?''

कबरी दचकते. रमेश हसत हसत म्हणतो, ''अशी बायको जर मेली तर त्या माणसाच्या जिण्याला काही अर्थ नाही, कबरी.''

कबरी हात सोडवून दुसरीकडे बघू लागते. त्यानंतर उठून खाटेच्या एका कोपऱ्यावर कशीबशी बसते. जणू रमेशच्या चेहऱ्याकडे बघायचं टाळत असावी. आणि रमेशला स्वतःचा चेहरा दाखवू इच्छित नसावी.

सायंकाळ झाली आहे. कबरी अचानक घाबरून म्हणते, ''आज तुम्हीही जेवणार नाही आणि मलाही जेवू देणार नाही की काय?''

''म्हणजे!''

कबरी, ''तुम्ही बाहेरून काही आणणार असल्याचं चिन्ह दिसत नाहीये की मलांही काही करायला सांगितलं नाहीये म्हणून म्हटलं.''

रमेश अत्यानंदाने म्हणाला, ''तू–तू स्वैपाक करणार कबरी?''

कबरी, ''हो. एका रात्रीचाच तर प्रश्न आहे, थोडंफार काम करून जाईन तुमच्याकडे.''

कबरी हसते. रमेशदेखील हसत म्हणतो, 'हेच सांगण्यासाठी इतका वेळ माझं मन तळमळत होतं.''

कबरी, ''काय सांगण्यासाठी?''

रमेश, ''इतके दिवस खाणावळीत जेवतोय. पण आज तू घरी असताना खाणावळीतलं जेवण आणून जेवायची मुळीच इच्छा नाही.''

कबरी, ''माझ्या हातचे पदार्थ खायची इतकी का आवड आहे तुम्हाला?''

रमेश, ''हो.''

कबरी विमनस्कपणे दुसरीकडे पहात अचानक म्हणते, ''पण अपली आवड नसलेलीच बरी.''

रमेश, ''माझी ही आवड कायम राहणार आहे.''

मग काय विचारता? बागबाजारच्या गल्लीतल्या त्या छोट्या घरातून शेगडीतल्या कोळशाचा धूर सायंकाळच्या हवेत विरू लागला. नववधूच्या हस्तस्पर्शाने त्या घरातली भांडी निनादू लागली. नव्या साडीचा पदर कमरेला खोचून, कपाळावर येणाऱ्या बटा हळदीच्या पिवळ्या हातांनी मागे सारत एक नवगृहिणी काम करू लागली.

स्वैपाक झाला. कबरीने खोलीतच जमिनीवर पाट मांडला. रमेश जेवायला बसला.

पाटावर बसल्या बसल्या रमेश कबरीच्या चेहऱ्याकडे टक लावून पाहतो. काय सांगायचं आहे कुणास ठाऊक?

कबरी विचारते, ''इतके गंभीर का झालात?''

रमेश, ''एक सांगू?''

कबरी, ''सांगा की.''

रमेश, ''एकटं जेवावंसं वाटत नाही.''

कबरी, 'म्हणजे?''

रमेश, ''तू पण जेवायला बैस. आपण दोघं एकाच ताटात बरोबरच जेवू या.''

कबरी पुन्हा दचकते. पण काय बोलावं ते न सुचल्याने गप्प उभी राहते. बसत नाही.

रमेशच उठतो. हसत पण घट्टपणे कबरीचा हात धरून तिला आपल्याजवळ बसवीत रमेश म्हणतो, ''नंतर कामाच्या गडबडीत तुझ्याबरोबर असं एका ताटात कितीदा जेवायला मिळेल कुणास ठाऊक?''

कबरी जेवायला बसली. रमेश आणि कबरी दोघांनी एकाच वेळी ताटातून भाताचा घास उचलला. जणू दोघं मिळून आयुष्यातलं एखादं नवं व्रत घेत असावेत.

जेवता जेवता का कुणास ठाऊक, रडवेली होऊन कबरी विचारते, ''तुम्हाला खूप मेहनत करावी लागते का?''

रमेश, ''हो. काम कधी कुणावर दया करीत नसतं. कित्येकदा तापातसुद्धा काम केलंय मी.''

कबरी, ''इतकी मेहनत का करता?''

रमेश, ''पोटासाठी.''

कबरी, ''किती मिळतात?''

रमेश, ''कधी पन्नास, कधी शंभर,तर कधी काहीसुद्धा नाही.''

कबरी, ''त्यात माझ्या जबाबदारीची आणखी भर पडली. आता काम करता करता तुम्हाला वेड लागायची पाळी येईल असं वाटतं.''

रमेश, ''मुळीच नाही. आता या मानसिक सुखाच्या बळावर मी अगदी सहज आणखी मेहनत करू शकेन.''

कबरी, ''तुम्हाला खूप पैसे उसने घ्यावे लागले का?''

रमेश जणू हसून त्या उधारीच्या जड ओझ्याला हवेत उडवून लावतो. ''दोन वर्षं खूप कष्ट करून सगळे पैसे फेडून टाकीन. त्यात काही विशेष नाही.''

अचानक कबरीची मान खाली जाते. जेवायचं सोडून ती गप्प बसून राहते. रमेश विचारतो, ''हे काय? जेवत का नाहीस?''

रमेश कबरीकडे बघत राहतो. मग अचानक ओरडतो, ''हे काय कबरी?''

कबरीच्या खाली वाकलेल्या मस्तकाच्या छायेत लपलेल्या डोळ्यांतून टपकन अश्रू ओघळतात.

कबरी हात धुऊन उठून उभी राहते. कमरेला खोचलेला पदर सोडवून डोळे पुसते. म्हणते, ''एक सांगू?''

''सांग.''

कबरी, ''तुम्हाला जगायचं आहे?''

रमेश, ''हे काय विचारणं?''

कबरी, ''जर जगायचं असेल तर आत्ताच्या आत्ता पोलिसांना बोलावून मला पकडून द्या.''

रमेश थरारतो, ''हे काय भलतंच बोलतेस कबरी?''

कबरी, ''मी तुम्हाला फसवायला आलेय. मी तुमच्या जातीची नाही. मी कबरी नाही, मी कुमारिका नाही--मी--मी---'' कबरी किंचाळते, ''मी एका भयंकर बापाची भयंकर मुलगी आहे. मी तुमच्या घरी संसार थाटायला नव्हे तर दागिने घेऊन पळून जायला आलेय.''

कबरी जणू एखाद्या नाटकातली अभिनेत्री असावी, एखादं खोटं नाटक करीत असावी. मजेखातर उगाचच रमेशला भीती दाखवीत असावी. एक मायाविनी पिशाचिनी राजकुमारीचे रूप घेऊन असंच नाटक करून एका राजाला काय काय भयंकर बोलून पळून गेली होती. त्या दुर्दैवी राजाचं काय नाव होतं कुणास ठाऊक? रमेशला नाव आठवत नाही. रंगभूमीवरच्या त्या नाटकाचं नावही आठवत नाही.

तरीदेखील रमेश घाबरतो. गप्प राहून जणू मृत्यूची कथा ऐकत असावा. कबरीच्या चेहऱ्याकडे पाहून तो जणू समजून घ्यायचा प्रयत्न करतोय. खरंच का हा गोड चेहरा एका लुच्च्या स्त्रीचा असेल?

कबरी, ''तुम्ही पोलिसांना बोलावून मला त्यांच्या ताब्यात देणार नाही हे ठाऊक आहे मला.तुम्ही फारच मूर्ख आणि बुळे आहात.''

कबरी अंगावरचे सगळे दागिने काढून खाली टाकते. 'हे घ्या निदान तुमचे दीड हजार तरी वाचले. आता मला मुकाट्याने जाऊ द्या.''

रमेश, ''कुठे जाणार आहेस?''

कबरी उत्तर देत नाही.

रमेश कठोर स्वरात ओरडतो, ''त्याच भयंकर बापापाशी परत जायला निघाली आहेस?''

कबरी गप्पच.

रमेश पुन्हा ओरडतो, ''माझ्या प्रश्नाचं उत्तर दे कबरी.''

कबरी रडू लागते, ''तुम्हीच सांगा. मला जाऊ द्यायची तुमची तयारी दिसत नाही.''

रमेश शांतपणे थोडा वेळ विचार करतो. मग भरल्या डोळ्यांनी कबरीचा हात धरतो, ''जाऊ द्यावंसं वाटत नाही कबरी.''

कबरी, ''तर मग ऐका.''

रमेश, ''बोल.''

कबरी, ''आज आत्ताच्या आत्ता आपण दोघं इथून निघून जाऊ या.''

रमेश, ''कुठं?''

कबरी, ''कुठंही. तुम्ही न्याल तिकडे.''

रमेश मग फार वेळ घालवीत नाही. त्याच रात्री बागबाजारच्या गल्लीतलं एक छोटंसं घर रिकामं झालं. लुच्च्या बापाची एक लुच्ची मुलगी अखेरचं एका आळीला विचारात घालून आपल्या नवऱ्याबरोबर नाहीशी झाली.

फसवून निघून गेली –फक्त एका माणसाला. राजघाटाचे विजयबाबू जेव्हा दुसऱ्या दिवशी सकाळी बागबाजारच्या गल्लीतल्या घरासमोर येऊन उभे राहिले तेव्हा घराला कुलूप पाहून थक्क झाले. किती घट्ट आणि निष्ठुर कुलूप! विजयबाबूंनी दाराच्या फटीतून आत बघितलं. आत पार रिकामं आहे. किती भयंकर रिकामंपण!

पण ते फार वेळ बघत राहू शकले नाहीत. पोलिसांनी येऊन पकडताच विजयबाबू नावाचे ते सज्जन ओक्साबोक्शी रडू लागले. ''अरेरे! आपल्याच बापाला का असं कुणी फसवत असतं, कार्टे?''

# एक प्रेमकथा

**नरेन्द्रनाथ मित्र**

खिडकीतून आत डोकावत प्रभातबाबू म्हणाले, ''लेखन चाललंय वाटतं? चालू देत, चालू देत. यावेळी 'डिस्टर्ब' नाही करीत.''

मी कागदपेन्सिल बाजूला ठेवली आणि आपल्या प्रिय मित्राचं स्वागत करीत म्हटलं, ''या, या. आत या.''

प्रभातबाबू जरा विचार करीत म्हणाले, ''पण तुमचं लेखन चाललंय ना?''

मी उत्तरलो, ''कुठलंही काही लिहिणं म्हणजे लेखन असतं होय? चारदोन पत्रांची उत्तरं लिहीत होतो झालं. या.''

मी आग्रह केला तेव्हा प्रभातबाबू आत खोलीत येऊन दाखल झाले. सोफ्यावर बसून हातातली छत्री खाली जमिनीवर आडवी ठेवली. नंतर परत जाताना विसरायला नको म्हणून कदाचित् ते आपली प्रिय वस्तू नजरेआड करीत नसावेत.

ते आत येताच मी आपल्या लेखनाच्या उच्चासनावरून उतरून त्यांच्या समोरच्या खालच्या सोफ्यावर बसलो.

ते माझ्याकडे पहात स्मित करीत म्हणाले, ''बराच पत्रव्यवहार करीत असता वाटतं? मलाही कधी काळी पत्रं लिहायची हौस होती. रात्र रात्र जागून मी मित्रांना पत्रं लिहायचा. त्या दृष्टीने तुम्ही मलाही अ मॅन ऑफ लेटर्स म्हणू शकता.''

मी त्यांच्या त्या स्वदत्त पदवीचा हसून स्वीकार करीत म्हटलं, ''चहा चालेल?''

चहाचं नाव ऐकताच प्रभातबाबू खूष होऊन म्हणाले, ''हो, हो, चालेल. पण या भलत्या वेळी चहाची ऑर्डर देऊन तुमच्या आश्रमात कसला व्यत्यय तर नाही ना येणार? तुमचा आहे गृहस्थाश्रम. मी काही गृहस्थ नाही. तेव्हा दुसऱ्यांच्या गृहिणींना आपल्यामुळे त्रास तर होणार नाही ना याची मला सतत काळजी वाटत असते.''

घराच्या आतल्या बाजूला जाऊन दोन कप चहाची ऑर्डर देऊन मी पुन्हा आपल्या जागेवर येऊन बसलो.

प्रभातबाबू नावाचेच प्रभात आहेत. त्यांची फिरायची आणि गप्पा मारायची वेळ म्हणजे भर दुपारची आणि मध्यरात्रीची. वय असेल चौऱ्याहत्तर, पंच्याहत्तरच्या आसपास. शरीर शीर्ण झालं आहे, पण मन मात्र त्यांनी जीर्ण होऊ दिलेलं नाही. या वयातही बस व ट्राममधून जातात, येतात. अतिशय सामाजिक प्राणी आहेत. आवडीच्या सभा-समित्यांना न चुकता हजर रहातात. जुन्या मित्रमंडळींची

वास्तपुस्त करतात. आणि नवे मित्र जमवायचाही अजून कंटाळा आलेला नाही. ते मित्र मग मुलाच्या वयाचे असीत नाहीतर नातवाच्या. त्यांना सगळेच आपल्या बरोबरीचे वाटतात. तसं पाहिलं तर त्यांना मुलगाही नाही की नातूही नाही. प्रभातबाबूंनी लग्नच केलेलं नाही.

थोडा वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर मी म्हटलं, ''बरी आठवण झाली प्रभातबाबू. परवा रात्री तुम्ही आलाच नाहीत. मी माझ्या एकदोन मित्रांना सांगून ठेवलं होतं. ते खास तुमच्याशी गप्पा मारायला आले होते. रात्री खूप वेळ आम्ही तुमची वाट पाहिली.''

प्रभातबाबू जीभ चावून लज्जित होत म्हणाले, ''अरेरे, विसरलोच कल्याणबाबू, पार विसरलो बघा. परवा रात्री मी अलीपूरमध्ये एका मित्राकडे गेलो होतो. तिथे आम्ही एक ॲनिव्हर्सरी साजरी केली.''

मी गमतीने म्हटले, ''तुमच्या मित्राची बर्थ ॲनिव्हर्सरी होती वाटतं?''

प्रभातबाबू मान हलवीत म्हणाले, ''छे, छे, तसलं काही नव्हतं. वाढदिवस वगैरे तो काही कधी साजरा करीत नाही. मी यापूर्वी कधीही त्याला एखादा सण, उत्सव साजरा करताना बघितलेलं नाही. सामाजिक स्वरूपात नाही की खाजगी स्वरूपातही नाही. स्नानसंध्या, जपतप, पूजाअर्चा, व्रत अनुष्ठान, काहीसुद्धा नाही. उलट, मीच त्याला अधूनमधून म्हणायचो, ''शैलेन, इव्हन द डेव्हिल हॅज हिज रिच्युअल्स.'' तू काय डेव्हिलपेक्षा मोठा आहेस? त्यानंतर गेली काही वर्षं बघतोय की एक व्रत मात्र तो अतिशय निष्ठापूर्वक करतो. वर्षातून फक्त एक दिवस. या व्रतासाठी तो फक्त एकाच व्यक्तीला बोलावतो.

मी विचारलं, ''ती व्यक्ती म्हणजे तुम्हीच ना?''

प्रभातबाबूंनी हसून ते मान्य केलं.

चहा आला. प्रभातबाबूंनी चहाच्या कपाला ओठ लावले नि खिशातून पाकीट काढून एक सिगारेट शिलगावली. प्रभातबाबू स्वस्तपैकी सिगारेट ओढतात.

मी सिगारेट ओढत नाही हे ठाऊक असूनही कौतुकाने एक सिगारेट मला ऑफर करीत त्यांनी विचारलं, ''चालेल का?''

मी नकारदर्शक मान हलवली. ते पाहून ते म्हणाले. ''तुमचं आपलं बरं आहे. मी सिगारेट ओढायला कधी सुरुवात केली ते आता आठवतसुद्धा नाही. वाटतं, स्तनपान सोडताच धूम्रपान सुरू केलं असावं.''

मी विचारलं, ''तुम्ही कुठल्याशा व्रताविषयी सांगत होता ना?''

प्रभातबाबू म्हणाले, ''सबूर, जरा सबूर, कथा लिहीत नसलो तरी कथालेखनाचं थोडंफार तंत्रमंत्र ठाऊक आहे मला. लग्न केलं नसलं म्हणून काय झालं, हजारो लग्नांना गेलो आहे. तुम्हाला मी कथेतला सस्पेन्स अगोदरच नाहीसा करून टाकण्याइतका वेंधळा वाटलो की काय? सुरुवातीलाच जर मी कथेचा गाभा काढून

टाकला तर तुम्ही माझी कथा धड ऐकणारच नाही.''

''असो, कथा माझी नाही. माझ्या त्याच मित्राची आहे. तुम्हाला सांगताना जरा भीती वाटते. कारण तुमच्या मनात काही गुप्त रहात नाही. मी तुम्हाला जे काही गुप्तपणे सांगतो ते आणखीन गुप्तपणे दहा जणांच्या कानावर घालूनच तुम्हाला बरं वाटतं. पण ही कथा लिहिणं तुम्हाला तितकंसं सोपं जाणार नाही, कल्याणबाबू. या कथेसाठी तुम्हाला वाचकच मिळणार नाही. फार प्राचीन काळची गोष्ट आहे. फक्त जुन्या दिवसांची वा जुन्या वातावरणाचीच नव्हे, तर ओल्ड व्हॅल्यूजची देखील ही कथा आहे. जुने दिवस. पण माझ्यासाठी ते नवेच होते. मी त्यावेळी तरुण होतो. किती दिवसांपूर्वी? असं समजा, सुमारे अर्धशतकापूर्वी तरीदेखील मधून मधून कालचीच गोष्ट असल्यासारखं वाटतं. कधी कधी तर वाटतं की ते दिवस फार दूर गेले असावेत. डीप पास्ट. माझ्या भूतकाळाविषयी विचार करू लागतो तेव्हा वाटतं जणू ऐतिहासिक वा प्रागैतिहासिक काळची गोष्ट असावी.

त्याच वेळची गोष्ट आहे. कलकत्त्याहून पश्चिम सीमान्त विभागातल्या एका गावी माझी बदली झाली होती. मी घरकोंबडा नाही. तरीदेखील जावंसं वाटत नव्हतं. कलकत्त्यात माझे ढीगभर मित्र होते. ऑफिसच्या कामाव्यतिरिक्त सारा वेळ गप्पांत कधी निघून जायचा ते समजायचंदेखील नाही. त्या गप्पांचे विषयही तसेच विभिन्न असायचे. साहित्य, संगीत, नाटक इत्यादि सगळ्यांवर आमची चर्चा चालायची. पण जिथे माझी बदली झाली होती तिथे एक नोकरी वगळता दुसरं काय होतं? त्यातून पुन्हा ती नोकरीही कशी होती ते ऐका. सैन्याच्या खाण्यापिण्यावर, कपड्यालत्त्यावर जे लाखो रुपये खर्च होतात त्यांचा बसल्या बसल्या हिशोब ठेवायची. माझं आयुष्य ज्या पद्धतीचं होतं ते पाहता हिशेबासारख्या रुक्ष गोष्टीत माझं मन रमणं शक्यच नव्हतं. तरीसुद्धा नोकरी ती नोकरीच. नवऱ्यावर प्रेम नसलं तरी त्याचा संसार करण्याखेरीज दुसरा पर्यायच नसतो पतिव्रता स्त्रीसमोर!

त्या गावी जाऊन मी एका मध्यम प्रतीच्या खाणावळीत मुक्काम ठोकला. मला वाटलं होतं तिथे मला मित्र मिळायचे नाहीत. पण तसं झालं नाही. खाणावळीतल्या माझ्या खोलीत लहान लहान बैठकी रंगू लागल्या. गाणी, गप्पा, थट्टा, पत्ते, फासे सगळं चालू झालं. ज्यांना वेगळ्या प्रकारच्या धुंदीची गरज होती त्यांनी त्याचीही सोय करून घेतली. त्या बैठकीत आपल्या शैलेन सेननेदेखील यायला सुरुवात केली. शैलेन माझा कलीग होता. आम्ही दोघं एकाच डिपार्टमेंटमध्ये नव्हे, तर एकाच सेक्शनमध्ये काम करीत होतो. शैलेन माझ्यासारखा नव्हता. मन लावून काम करायचा. खूप गुणी मुलगा होता. पण गुणांपेक्षाही त्याच्या रूपाकडे अधिक लक्ष जायचं. माझा मित्र असला म्हणून काय झालं? तो माझ्यासारखा काळाकुट्ट नव्हता. उंचीला माझ्यापेक्षा एकदीड इंच लहान होता. मी जवळ जवळ सहा फूट उंच आहे. शैलेन तितका उंच नव्हता.

पण अन्य कुठल्याच बाबतीत तो माझ्यापेक्षा उणा नव्हता. तेजाळ कांती, रेखीव नाक डोळे, कुरळे केस. भरदार शरीर. शैलेन स्पोर्टस्‌मन किंवा जिम्नॅस्ट नव्हता. तरी त्याच्या सौंदर्यात पुरुषीपण होते. त्याचे हे पौरुष त्याच्या गांभीर्यातून, धैर्यातून, निश्चयीपणातून व्यक्त व्हायचं. मला आठवतं, आमची ही मैत्री विजोड मैत्री होती. त्याच्या व्यक्तित्वात असलेलं काहीतरी माझ्यात नव्हतं आणि कदाचित माझ्यातही असं काहीतरी होतं की ज्याची उणीव त्याला मनातल्या मनात जाणवत असावी. या विषमतेची ओढ हीच आमची पहिली ओढ होती.

शैलेन आमच्या बैठकीत येऊन निमूटपणे बसायचा. कधी माझ्या रॅकवरून एखादं पुस्तक काढून वाचू लागायचा. कधी बाकीच्या पाच जणांच्या हालचाली न्याहाळीत रहायचा. खूपच लाजाळू आणि माणूसघाणा होता तो. आता मात्र तसा नाहीये तो.

सर्वजण गेल्यावर वेळ राहिला तर शैलेन माझ्यापाशी येऊन बसायचा. त्यावेळी समवयस्क, समान आवडनिवड असलेल्या मित्रांमध्ये व्हाव्यात तशा आमच्या गप्पा होत.

त्या दिवशी जवळपास कुणी नसलेलं पाहून शैलेन मला म्हणाला, ''तुझ्याशी काही बोलायचं आहे.''

''छान, बोल.''

सूतोवाच करून शैलेन गप्प राहिला.

मी विचारलं, ''काय झालं? बोलायची ही कुठली पद्धत?''

शैलेन उत्तरला, ''नको, राहू दे.''

मी म्हटलं, ''का? राहू का दे? तुला जे सांगता येत नाही ते मीच सांगतो बघ.'' त्यानंतर त्याच्या आवाजाची नक्कल करीत मी म्हणालो, ''प्रभातदादा, मी प्रेमात पडलो आहे. पडलो आहे म्हणजे आकंठ बुडालो आहे. आता तूच माझा उद्धार कर.''

शैलेनने विचारलं, ''मी हेच बोलणार असल्याचं तू कसं काय ओळखलंस?''

''न ओळखायला काय झालं? त्या दिवशी तुझ्याकडे आलो होतो ना तेव्हाच मला समजलं होतं.''

शैलेन गप्पच बसून राहिला.

त्या गावात मीच काय तो खाणावळीत रहात होतो, शैलेन नव्हे. तिथे त्याचे वडील एका मोठ्या सरकारी बंगल्यात रहात होते. आईवडील, बहीणभाऊ, सगळे मिळून बरंच मोठं कुटुंब होतं त्याचं.

ऑफीसची सुट्टी झाल्यावर मधून मधून शैलेन मला आपल्या घरी घेऊन जायचा. त्याची आई मला मुलासारखी मानायची. स्वतःच्या हाताने केलेले पदार्थ खाऊ घालायची. त्याच्या भावंडांचं देखील माझ्यावर खूप प्रेम होतं. आता तुम्हाला सांगायला हरकत नाही, त्यावेळी आणखीही कित्येक बंगाली लोकांच्या घरी माझा वावर होता. तरीदेखील शैलेनचं घरच मला सर्वात जास्त आवडायचं.

त्याच्याच घरी मी माधुरीला पहिल्यांदा बघितलं. तिचं सौंदर्य, तारुण्य बघून मी तिला अगोदर शैलेनची बहीणच समजलो. मुलगी असल्याने ती शैलेनपेक्षा जास्त गोरी दिसायची. चेहऱ्याचा कटदेखील खूपच चांगला होता. मला स्वतःला तशी लांबट चेहऱ्याची आवड आहे. पण गोल चेहरादेखील उमलत्या कमळासारखा आकर्षक दिसतो हे तिच्याकडे पाहूनच मला पहिल्यांदा उमजलं. दाट लांबसडक केस. असे रेशमासारखे मऊ केस मी कधी बघितले नव्हते. माधुरी शैलेनची बहीण नाही आणि ती जरी शैलेनच्या आईला मावशी म्हणत असली तरी ती कुठल्या मावशीची मुलगी नाही ही गोष्ट मी थोड्याच वेळात ताडली होती. माधुरी ब्राह्मण होती. आडनाव होतं मुखर्जी. शैलेन रहात असलेल्या गल्लीतच तिचंही घर होतं. अगदी जवळ. दोन्ही कुटुबांत खूप घरोबा होता. जाणंयेणं, खाणंपिणं सगळं चालायचं. एका घरची आई दुसऱ्या घरच्या मुलांची मावशी होती.''

शैलेनने विचारलं, ''तुला कसं समजलं?''

मी म्हटलं, ''तुम्ही दोघं चोरून एकमेकांकडे बघत होता त्यावरून लक्षात आलं. शिवाय तुझ्या टेबलावर तिचं नाव असलेली पुस्तकं होती आणि तिच्या गाण्यांच्या वहीत तुझ्या हस्ताक्षरात काही लिहिलेलं होतं, त्यावरूनही समजलं.''

पकडला गेल्याने शैलेन हसला. म्हणाला, ''इतक्या थोड्या वेळात तू इतक्या गोष्टी बघितल्यास? प्रभू, तू तर गुप्तचर विभागातच काम करायला हवंस.''

शैलेन लाडाने मला प्रभू म्हणायचा. कधी कधी गुरुदेखील म्हणायचा. मी त्याचा फ्रेंड, फिलॉसॉफर, गाईड होतो.

पकडला गेल्याने शैलेनने मला सारं काही सांगून टाकलं. सांगायलाच आला होता तो. आपल्या पहिल्या वहिल्या लाजऱ्या बुजऱ्या प्रेमाची गोष्ट, चोरून गाठीभेटी घ्यायची गोष्ट, नवतारुण्यातील धुंदीची गोष्ट, सगळं काही त्याने मनमोकळेपणाने सांगून टाकलं. एके काळी ते सर्वांपासून लपवून ठेवायला त्यांना आवडत असे. घरच्या लोकांपासून ते लपवून ठेवीतच, पण स्वतःपासूनही लपवून ठेवीत. आता तसं नव्हतं. आता दोन्ही कुटुंबातल्या लोकांनी त्यांच्या प्रेमाला मान्यता द्यावी अशी त्यांची इच्छा होती. ज्या माधुरीवर घरच्या मुलीसारखं सर्वांनी प्रेम केलं तिनेच आता सून होऊन घर उजळून टाकावं. ज्या शैलेनला माधुरीच्या इथे खरा आदर्श मुलगा म्हणून मान मिळत आला त्यात आता आणखी एक गोड पदवी मिळावी-जावयाची!

मी विचारलं, ''अडचण कसली आहे?''

शैलेज उतरला, ''अडचण आहे जातीची.''

मी म्हटलं, ''हात् तुझी! हे बघ एक सांगू? माधुरीच्या वडलांनी जर संमती दिली नाही तर तू आपलं सुभद्राहरण कर. मी तुझा रथ हाकीन. सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज.''

शैलेन म्हणाला, ''नाही दादा, हे शक्य नाही !''

''का? माधुरीला भीती वाटते?''

शैलेन उत्तरला, ''भीतीही वाटते आणि आत्मविश्वासही तेवढा नाही. शिवाय तिचं आपल्या जुनाट विचारांच्या माथेफिरू बापावर फार प्रेम आहे. वडलांच्या संमतीखेरीज काही करायचा विचारदेखील माधुरीला करवत नाही.''

मी म्हटलं, ''ठीक आहे तर, चल. मी त्या इंजिनियर साहेबांना कसंही करून समजावतो. तुझा वकील व्हायची माझी तयारी आहे.''

शैलेन म्हणाला, ''बाप रे, तर मग त्या घरचे दरवाजे मला कायमचे बंदच होतील. आणि माझ्या बाबांना तरी हा अपमान सहन होईल का? त्या बाजूची खिडकीदेखील कुणी उघडू द्यायचं नाही. प्रकरण सगळ्यांना माहीत आहे. पण स्वतःच्या तोंडाने कुणी काही बोलत नाही. नाहीतर इतक्या दिवसांची मैत्री तुटेल.''

मी विचारलं, ''तुझ्या आईवडलांचं काय मत आहे?''

शैलेन म्हणाला, ''तेही तयार नाहीत. या प्रेमविवाहाची त्यांनाही भीती वाटते. त्यांना वाटतं की या गांधर्वविवाहानंतर आम्ही वेगळे रहायला लागू. आईवडील, बहीणभाऊ सर्वांना सोडून देऊ.''

शैलेन स्वतः भित्रा होताच. पण त्याने मलाही पुढे पाऊल टाकू दिलं नाही. सगळंच ऑफस होईल आणि जे काही थोडंफार मिळतय तेदेखील हातचं जाईल याची त्याला भीती वाटत होती. फार नाही तरी निदान संध्याकाळी दोघांची भेट होते, एकमेकांच्या आवाज ऐकायला मिळतो, लपूनछपून का होईना, थोडं फार प्रेम चालूच आहे. मग हेदेखील हातचं जाईल.

मी हसून म्हटलं, ''तर मग तू असाच रहा शैलेन. फार मोठ्या अपेक्षा ठेवू नकोस.''

त्यानंतर दोन्ही घरांमध्ये मध्यस्थांची जा-ये गुपचुप सुरू झाली. माधुरीसाठी स्थळ शोधलं जाऊ लागलं. शैलेनच्या मनाविरुद्ध त्याच्यासाठी मुली बघितल्या जाऊ लागल्या. हुंड्यासह सालंकृत कन्यादान करायला बरीच मंडळी उत्सुक होती. पण शैलेनने होकार दिला नाही. परिणामी, मध्यस्थांचं जाणं-येणं फक्त चालू राहिलं आणि कुठल्याच घरी देवदेवक बसलं नाही.

त्यानंतर सिमल्याला माझी बदली झाली. निघायच्या दिवशी माधुरीने लाल गुलाबांचा एक मोठा पुष्पगुच्छ मला भेट दिला होता. आणि जोडीला दोन अमूल्य मोतीबिंदूदेखील दिले होते.

तिच्या त्या काळ्याभोर, टपोऱ्या, अश्रुभरल्या डोळ्यांकडे पहात मी म्हटलं होतं, ''मधु, हे काय?''

माधुरी उत्तरली होती, ''प्रभातदा, आम्हाला दुसरा कुणी मित्र नाही. विसरू नका हं.''

मी माझ्या मित्राचा प्रभू होतो, प्रतिभू होतो. त्यापेक्षा अधिक काही नाही. मी

नेहमीच सहायक क्रियापद होतो, मूळ क्रियापद झालो नाही वा मला ते जमलं नाही. तरीदेखील आयुष्यात काही कमी मिळालं आहे. असं मला कधी वाटलं नाही. शैलेनला बोलण्यात काय अर्थ? मी स्वतःदेखील अल्पसंतुष्टच होतो. मीदेखील नेहमी चारदोन दाण्यांवरच माझी भिक्षेची झोळी भरली आहे.''

प्रभातबाबूंनी घड्याळाकडे बघितलं. आणि म्हणाले, ''अरे, बाप रे, आता थोडक्यात सांगून आटोपतो. नाहीतर तुम्हाला बायकोची बोलणी खावी लागतील आणि मीदेखील कपभर चहाला कायमचा मुकेन. सिमल्याला माझी बदली झाल्यावर काही दिवसांनी शैलेन पाटण्याला निघून गेला. सरकार भाग्यविधाता आहे. आम्हा दोघा मित्रांना मधूनमधून खूप दूर लोटत असे. मग पुन्हा कधी कधी एखाद्या जागी वर्ष सहा महिन्यासाठी समोरासमोर आणून उभं करीत असे. आम्ही दोघं एकाच टेबलावर समोरासमोर काम करायला लागत असू, गप्पा मारायला लागत असू. वयाबरोबर आमचा चेहरा बदलत होता. आयुष्याच्या एका स्टेशनवरून दुसऱ्या स्टेशनवर आमची बदली होत होती हे बघून आनंद वाटायचा. पण एका जागेच्या बाबतीत मात्र आमची कधीच बदली झाली नाही. ती जागा म्हणजे आमची मैत्री. सहा महिन्यांतच आम्ही 'आपण'वरून 'तुम्ही' वर आलो होतो आणि 'तुम्ही' वरून 'तू' वर यायलाही एकदोन वर्षांपेक्षा जास्त वेळ लागला नाही. दूर राहून देखील आम्ही एकमेकांची विचारपूस करीत असू. पत्रव्यवहारही चालू असे. कधी कधी भेटही व्हायची. माधुरीची आई वारली होती. दोघे भाऊ मोठे झाले होते. वडील आणखी वृद्ध झाले होते. पूर्वीचे ते करारी वडील आता पार असहाय्य झाले होते, मुलीच्या आधारे जगत होते. माधुरी जणू एकाचवेळी माय, बहीण, लेक सर्व काही होती. शैलेनचेही आईवडील मरण पावले होते. बहीणभाऊ त्यालाच 'त्वमेव माता च पिता त्वमेव' समजत होते. शैलेनने त्या सर्वांची लग्ने लावून दिली होती. आपापल्या नोकऱ्यांच्या गावी त्या सर्वांनी संसार थाटले होते. तरीदेखील चिरकुमार थोरले बंधू कुटुंबाच्या वटवृक्षासारखे होते. मी त्याला पत्र लिहीत असे. माधुरीशीही पत्रव्यवहार चालू होता.

त्यानंतर शैलेन आणि मी दोघेही जवळजवळ एकाच वेळी रिटायर्ड झालो. शैलेनला एक्स्टेन्शन मिळालं होतं. एक दोन प्रमोशन्सदेखील मिळाली होती. पण मला काही मिळालं नव्हतं. ती उणीव मी वेगळ्याप्रकारे भरून काढली. भारताचा दौरा केला, गालांना पावडर फासून व डोक्यावर नकली केसांचा विग लावून म्हातारपणीदेखील मी हौशी रंगभूमीवरचा हीरो बनलो. मधूनमधून निम साहित्यिक व निम राजनैतिक भाषणेही व्यासपीठावरून ठोकली. हल्ली धार्मिक चर्चांना जातो. त्यावर तुम्ही मला मनातल्या मनात हसता.

शैलेनशी हल्ली माझी भेट डलहौसी स्क्वेयरमध्ये पेन्शनचे पैसे घ्यायला गेलो की होते. रिटायर्ड झाल्यापासून आम्ही दोघंही कलकत्त्यातच आहोत. तो दक्षिणेत आणि

मी उत्तरेत. सध्या तितकीशी लवकर लवकर भेट होत नाही. पत्रलेखनदेखील बंद आहे. शैलेनने एकदा लिहिलं होतं, "तुझं अक्षर आता वाचता येत नाही, अजिबात समजत नाही." त्यावर रागावून मी त्याला पत्र लिहिणं बंद केलं. आता फोनवर काय ते बोलणं होतं. शैलेनने अलीपूर भागात एक छान दुमजली घर बांधलं आहे. पूर्वी भाचेभाच्या त्याच्याबरोबर रहात, आता नातवंडं रहातात. कुणी शाळेत आहे, कुणी कॉलेजात. मला घरदार बांधावं लागलं नाही. वडिलोपार्जित घर आहे. त्यावर दादाबरोबर माझादेखील हक्क आहे. पण तो नावापुरताच. मनातून मी अनिकेत असल्याचं तुम्हाला ठाऊक आहेच. घरात राहतोय मी कितीसा?

आजपासून बारा वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. पेन्शनचे रुपये मोजत असता अचानक कुणीतरी मागून माझा हात धरला आणि म्हणालं, "अरे वा रे परमार्थवादी! अर्थाचा इतका लोभ कशासाठी?"

वळून पाहिलं तर शैलेन! हसत म्हणालो, "म्हातारपणी कामिनी सोडता येते पण कांचन सोडणं शक्य नाही. कंदमुळंफळं खरेदी करायचं म्हटलं तरी त्याला पैसे पडतात."

शैलेन मला एका चहाच्या दुकानी घेऊन गेला. म्हणाला, "तुझ्याशी थोडं बोलायचं आहे."

आजूबाजूला गर्दी नसलेलं एका बाजूचं टेबल निवडून आम्ही दोघं समोरासमोर बसलो. म्हातारपणाने एकाचे केस उपटून घेतले होते तर दुसऱ्याचे दात तोडून टाकले होते. शैलेनला टक्कल पडलं होतं तर माझ्या तोंडाचं बोळकं झालेलं होतं.

फारशी प्रस्तावना न करता शैलेनने छातीवरच्या खिशातून पत्राचं एक पाकीट काढून मला दाखवलं. म्हणाला, "वाचून बघ."

अक्षर ओळखीचं होतं. मोत्यांसारख्या वळणदार अक्षरात अजून कंप आलेला नव्हता. मी म्हटलं, "हे तर तुला आलेलं पत्र आहे."

शैलेनने दटावीत म्हटलं, "अरे वाच की! जसं काही तू माझं पत्र कधी वाचलंस नाहीस."

मी पाकिटातून पत्र काढून वाचलं. चांगला मोठा कागद होता. पण पत्र फक्त दोन ओळींचं होतं. "तुमच्याशी काही बोलायचं आहे. नक्की या. इति. तुमची माधुरी."

मी हसत म्हटलं, "मी माझ्या शब्दांत थोडी सुधारणा करतो. काही लोकांना म्हातारणीसुद्धा कामिनी सोडवत नाही असं दिसतंय. कुठंय ती?"

शैलेन उत्तरला, "बॅरकपूरला. भावांपाशी."

वडिलांच्या मृत्यूनंतर माधुरीचं कुटुंब लखनौ सोडून कलकत्त्याला आलं असल्याचं मला ठाऊक होतं. पण नेमकं कुठं राहतं ते मला ठाऊक नव्हतं.

शैलेन म्हणाला, "भाऊ नोकरी करतात. माधुरीदेखील शाळेत शिकवायची. काम झेपेना, दगदग व्हायला लागली तेव्हा दिली सोडून. तिच्या वडिलांनी फारसं

काही मागे ठेवलं नव्हतं असं ऐकलंय. फार फार तर तीसएक हजार रुपये मुलीच्या नावे ठेवले असतील. मुलांनादेखील थोडीफार संपत्ती मिळाली आहे.''

या सर्व गोष्टी मला ठाऊक नव्हत्या. बऱ्याच दिवसांपासून पत्रव्यवहार बंद होता.

शैलेन म्हणाला, ''काही दिवसांपासून आजारी आहे. चल, एकदा जाऊन बघून येऊ या. काय एवढं महत्त्वाचं सांगायचं आहे ते ऐकून येऊ.''

मी म्हटलं, ''तू एकटाच जाऊन ये. मी आलो तर तुमचं बोलणं व्हायचं नाही.''

''छट्, ते शक्य तरी आहे का? उलट तुला पाहून तिला खूपच आनंद होईल.''

मी नंतर कधीतरी जाईन म्हणत होतो. पण शैलेन थांबायला तयार नव्हता. पुन्हा कधी भेट होईल कुणास ठाऊक असं त्याचं म्हणणं होतं.

आम्ही दोघांनी आपापल्या घरी फोन केले आणि निघालो बॅरकपूरकडे! शैलेन टॅक्सी करीत होता. पण मीच म्हणालो, 'पेन्शनचे मोजके पैसे असे उडवायचे नसतात. चल, बसने जाऊ या.''

निघताना मी कॉलेज स्ट्रीट मार्केटमधून एक डझनभर निशिगंधाची ताजी टपोरी फुलं विकत घेतली.

शैलेन थट्टा करीत म्हणाला, ''तुला या गोष्टींची खूप आवड असल्याचं दिसतंय.''

स्टेशनजवळच घर होतं. दुमजली घराच्या एका फ्लॅटमध्ये रहात होते ते. कडी वाजवताच एका बाईने येऊन दार उघडलं. आम्ही आमचा परिचय करून देताच ती आम्हाला माधुरीच्या खोलीत घेऊन गेली.

माधुरी एका लहानशा पलंगावर निजली होती. बिछाना स्वच्छ नि नीटनेटका होता. खोलीदेखील खूप स्वच्छ होती. पण माधुरीला काय झालं होतं? पार खंगून गेली होती, बिछान्याला खिळली होती. जणू उठून बसण्याइतकंदेखील बळ अंगात नव्हतं.

तरीदेखील आम्हाला बघून जणू माधुरीच्या अंगात नवं बळ आलं. उत्साहाच्या भरात ती बिछान्यावर उठून बसली.

माझ्याकडे बघून किंचित स्मित करीत म्हणाली, ''तुम्ही याल हे ठाऊक होतं मला.''

त्यानंतर माधुरीने काय तमाशा केला तो ऐका जरा. आपल्या दोघी वहिनींना बोलावून म्हटलं, ''त्या खोलीत देवीच्या पायाशी सिंदूरची डबी आहे. त्यात सिंदूर ठेवलेला आहे. जरा आणा बघू.''

धाकटी सून सिंदूरची ती डबी घेऊन आली. माधुरीने ती डबी आपल्या हातात घेऊन शैलेनच्या हाती देत म्हटलं, ''हा सिंदूर माझ्या भांगात भरा. कुमारिका म्हणून मरायची माझी इच्छा नाही.''

मी निरखून पाहिलं. माधुरीचा तो विपुल केशसंभार आता राहिला नव्हता.

वयामुळे तितकेसे नाही, पण आजारपणामुळे केस गळून गेले होते. मधून मधून रुपेरी ताराही चमकत होत्या.

शैलेनने तिच्या भांगेत सिंदूर भरला. शंख वाजवायची सुनांची इच्छा होती. पण माधुरीने हाताने खुणावून त्यांना मनाई केली.

मी विचारलं, ''मधु, पिकल्या केसांत सिंदूर लावून घेण्यासाठी तू इतके दिवस थांबलीस?''

माधुरीच्या चेहऱ्यावर प्रतिपदेच्या चंद्रासारखी एक क्षीण स्मितरेखा झळकली. म्हणाली, ''खरंय प्रभातदा! आता बाकीचे मंत्र तुम्ही म्हणून टाका.''

मंत्र म्हणायला मी भटजी थोडाच होतो? शिवाय मी स्वतःच मंत्रमुग्ध झालो होतो. तरीदेखील मी हळूहळू दोन ओळी गुणगुणलो, ''यदिदं हृदयं तव तदस्तु हृदयं मम, यदिदं हृदयं मम तदस्तु हृदयं तव.''

त्यांनी माझ्याबरोबर तो मंत्र म्हटला नाही. फक्त नीट लक्षपूर्वक ऐकत राहिले.

आयुष्यात मी कितीतरी लग्नांना गेलो. पण असं लग्न कधी पाहिलं नव्हतं की लावलं नव्हतं, कल्याणबाबू.

त्या दिवशी मी विकत घेतलेल्या निशिगंधाच्या फुलांचं सार्थक झालं. तीच फुलं मी माधुरीच्या बिछान्यावर एका बाजूला ठेवून दिली. तिची रोगशय्या थोडा वेळ का होईना, पुष्पशय्या बनली.

पण त्यानंतर माधुरी फार दिवस जगली नाही. तिच्या भावांनी तिच्या उपचारासाठी सढळ हातांनी पैसा खर्च केला. शैलेनने देखील प्रयत्नांत कसूर केली नाही. तिला कलकत्त्याला आणून नामांकित नर्सिंग होममध्ये ठेवलं. पण तिच्या पोटातला अल्सर काही बरा झाला नाही. ऑपरेशन टेबलावरच तिने राम म्हटला. निशिगंधाची आणखी एक डझनभर फुलं घेऊन मी तिला बघायला गेलो होतो.

शैलेननेच अंत्यसंस्कार केला. आपल्या पदरचे पाचेक हजार रुपये खर्च करून श्राद्ध वगैरे केलं, लोकांना खाऊ घातलं. घरी भजनी मंडळ बोलावलं. आम्ही थक्क झालो. यापूर्वी या सर्व गोष्टींवर त्याचा अजिबात विश्वास नव्हता. नंतर कळलं, माधुरीचीच तशी इच्छा होती.

त्या भावमधुर हृदयाच्या आणखी एका अखेरच्या इच्छेचा, पुरावा देखील शैलेनने मला दाखवला होता. पूर्वी तो जसा खिशात प्रेमपत्र बाळगून वावरायचा तसाच आता एक जाडजूड पाकीट खिशात ठेवायचा. माधुरीने बजावलं होतं, ''माझ्या मृत्यूपूर्वी ते पाकीट उघडायचं नाही.''

पाकीट उघडल्यावर दिसलं की त्यात पत्र नव्हतं तर आणखी एका हिरव्या पाकिटात शैलनच्या नावे माधुरीने लिहिलेला तीस हजार रुपयांचा चेक होता.

शैलेनने म्हटलं, 'हे रुपये मी का म्हणून घ्यावेत?''

मी म्हणालो, ''घेऊन टाक. तू काही लग्नात हुंडा घेतला नव्हतास. हे रुपये का

उगाच सोडतोस?''

काही रुपये शैलेनने माधुरीच्या भावांना देऊन टाकले. बाकीचे रुपये एका हॉस्पिटलला दिले, माधुरीच्या नावे एक पलंग राखून ठेवण्यासाठी. आजारी स्त्रियांवर तिथे उपचार होतात.

तेव्हापासून दरवर्षी शैलेन माधुरीची पुण्यतिथी साजरी करतो. त्या कार्यक्रमाला फक्त एक अतिथी असतो, मी! खोलीत भिंतीवर माधुरीचा एक मध्यम आकाराचा फोटो टांगलेला असतो. फोटो अलीकडचा नाही, जुना आहे. तिने तारुण्यात पदार्पण केल्या वेळचा!

त्या नवयौवनेच्या चित्रासमोर आम्ही दोघे म्हातारे समोरासमोर खुर्चीवर बसून राहतो. चहा घेतो, गप्पा मारतो. कधी कधी काही न बोलता नुसतेच गप्प बसून राहतो.

शैलेनने मृत्यूच्या तावडीतून एक प्रेम बचावून ठेवलं आहे. आणि मी म्हातारपणच्या हातून एक मैत्री वाचवीत आहे.''

प्रभातबाबू उठून उभे राहिले. छत्री समोर असूनही आज त्यांना तिचा विसर पडला होता. मी छत्री उचलून त्यांच्या हातात दिली.

ते हसून म्हणाले, ''थँक्स!''

# माननीय परीक्षक महाशयांच्या सेवेसी

## नारायण गंगोपाध्याय

श्रीमान,

माझी ही उत्तरपत्रिका आपण अखेरपर्यंत वाचाल की नाही ते मला ठाऊक नाही. कारण एकाही प्रश्नाचं उत्तर न लिहिता सुरुवातीलाच मी आपल्या नावे हे पत्र लिहीत असल्याचं आपण पहातच आहात. काही ओळी वाचताच भुवया उंचावून आपण कदाचित एक मोठं शून्य द्याल आणि मग नॉन्सेन्स रायटिंगसाठी युनिव्हर्सिटीकडे माझी तक्रार कराल. पण मला त्याची फिकीर नाही. कदाचित असंही शक्य आहे की आपण माझं हे लिखाण अखेरपर्यंत वाचून काढाल आणि त्याच आशेने मी आपल्या सेवेसी हे निवेदन करीत आहे.

एकदोन प्रश्नांची उत्तरं मला देता आली असती. पण तेवढ्याने पास होण्याइतपत मार्क मिळायचे तर सोडाच, जेमतेम वीसेक मार्क मिळू शकले असते. म्हणून मी त्या फंदात पडत नाही आहे. त्या खेरीज आज संध्याकाळीच मी पास-नापासांच्या या जगापासून दूर निघून जाणार आहे. कलकत्त्याच्या आजूबाजूला ज्या शेकडो आगगाड्या जातात त्यांच्यापैकीच एखाद्या आगगाडीच्या चाकांखाली माझा अखेरचा हिशोब चुकता करीन. ही उत्तरपत्रिका आपणापाशी पोचेल तोवर आगगाडीखाली मरण पावलेल्या एका अनोळखी तरुणाविषयीची एक छोटीशी जुनी बातमी आपल्या स्मृतिपटलावरून पुसलीही गेली असेल.

आपली शिक्षक विवेकबुद्धी इतकं वाचून दचकून स्तब्ध होईल. आपण म्हणाल, शी, परीक्षेत नापास व्हायच्या भीतीने आत्महत्या? याहून अधिक भ्याडपणा कसला असणार? देशातील तरुणांमध्ये इतकंही नैतिक बळ नसेल तर मग बंगाल्यांचं काय होईल–राष्ट्राच्या भविष्याचं काय होईल?

माझ्यावर विश्वास ठेवा महाशय, या सर्व गोष्टी मला ठाऊक आहेत. आणि मला जगावंसं वाटत होतं या विषयीही खात्री असू द्या. मला वाटायचं, अवघा देश बाहू पसरून माझी वाट पहातोय, माझ्या हातांचा स्पर्श होताच संथाळ परगण्यातील महापूर आलेली अवखळ पहाडी नदी विशाल कॅचमेंट एरियात बंदिस्त होऊन जाईल, मी स्विच दाबताच हायड्रो इलेक्ट्रिकच्या हजारो – लाखो दिव्यांनी बिहार, पश्चिम बंगालचा सर्वच्या सर्व औद्योगिक परिसर झळाळून जाईल. ब्लास्ट फर्नेसच्या लालसर प्रकाशात पोलादाने मीच भावी भारताची भित्तीरचना करीन. पण ---

महाशय, खरंच मला आत्महत्या नव्हती करायची.

माझ्या आजूबाजूची सर्व मुलं प्रश्नांची उत्तरं लिहिण्यात गढून गेली आहेत. भराभर उत्तरपत्रिका भरून काढीत आहेत. त्यांच्यापैकी कित्येक जण माझ्यासारखीच स्वप्नं पहात आहेत आणि काही दिवसांनी क्रॉस लिस्ट निघाली की त्यांच्यापैकी बहुतेकांची स्वप्नं भंग पावणार आहेत. पण कदाचित त्यांच्यापैकीच काही जण आपल्या जीवनात काही करून दाखवतील – भावी भारताच्या आकांक्षांची मशाल पेटवून आपल्या हातात उंच धरतील. सुदैवी आहेत ते! जाऊ देत त्यांना पुढे. पण माझ्यासारखी जी असंख्य मुलं सहज पराभूत होतील, किंवा जिवंत असूनही जगू शकणार नाहीत, त्यांची कथा कुठल्याही पंचवार्षिक योजनेच्या यशाच्या गाथेत नोंदलेली आढळणार नाही. माझी आपल्याशी ओळख नाही, मी कधी आपणाला पाहिलेलं नाही, कधी पाहीन याची शक्यताही नाही. पण एक मला निश्चित ठाऊक आहे की आपण अध्यापक आहात. विद्यार्थी आपल्या आजूबाजूला वावरत असतात, त्यांच्या जीवनातील तरंग आपणाला स्पर्श करीत असतात, कदाचित आपलं त्यांच्यावर प्रेमही असेल. म्हणूनच आपण हे सर्व वाचाल की नाही हे ठाऊक नसूनही मी लिहीत आहे. माझी कर्मकथा आपणाशिवाय आणखी कुणाला सांगू?

महाशय, मी जेव्हा स्वप्न पाहिलं होतं तेव्हा मी मेदिनीपूर जिल्ह्यातल्या एका लहानशा गावातील शेतकऱ्याचा मुलगा असल्याचा मला विसर पडला होता. माझे बाबा शेतकरी होते खरे, पण दिल्लीतील कुठल्याही देदीप्यमान पुढाऱ्याच्या तुलनेनं त्यांचं देशप्रेम तिळमात्र उणं नव्हतं. एकोणीसशे बेचाळीसच्या सप्टेंबर महिन्यात मध्यरात्री एका रानात माझा जन्म झाला. कारण त्यावेळी मिलिटरीवाले आमच्या गावाला आग लावीत होते आणि राष्ट्रीय ध्वज हाती धरून, बंदुकीच्या गोळ्यांनी छातीची चाळण झालेले माझे बाबा धान्याच्या एका शेतात भुईवर तळमळत होते.

मुलगा झाला तर त्याचं नाव स्वाधीनकुमार ठेवायची बाबांची इच्छा होती. त्या अग्निमय प्रलयाच्या रात्री, बाबांच्या रक्ताचा आशीर्वाद घेऊन स्वाधीन आकाशाखाली माझा जन्म झाला होता. कारण मिलिटरीवाल्यांनी इतकी दडपशाही केली, हैदोस घातला तरी देशातील एकाही माणसाचं मन त्या दिवशी पराधीन नव्हतं.

पण या सर्व गोष्टी आता इतिहासजमा झाल्या. जाऊ देत. आपण जर इथवर लिहिलेलं वाचलं असेल तर एव्हाना नक्कीच वैतागून गेला असाल. माझी जन्मकहाणी ऐकण्यात आपणाला काय गम्य असणार आहे? खेरीज मलाही सगळं काही लिहायला तीन तासांपेक्षा जास्त वेळ मिळणार नाही – ते लोक माझा पेपर ओढून घेतील. म्हणून थोडक्यात सगळं सांगायचा प्रयत्न करतो.

शेतकऱ्याचा पोर आहे, शेतीवाडी करून पोट भरता आलं असतं. नाहीतर मग दुष्काळ पडल्यावर इतरांसारखंच भुकेने किंवा नासकं कुजकं खाऊन मरता आलं

असतं. पण दुर्दैवाने माझ्या काकांनी मला गावच्या शाळेत घातलं आणि —आपल्याला खरं वाटेल की नाही सांगता येत नाही; पण मला एक स्कॉलरशिपदेखील मिळाली होती.

महाशय, ती स्कॉलरशिप माझा काळ ठरली. मी स्वप्नं बघू लागलो. आईने मला जवळ घेऊन डोळ्यातल्या आसवांनी भिजवून टाकलं, बाबांच्या आठवणीने आईला पहिल्यांदाच रडताना पाहिलं. त्यानंतर डोळ्यात आकांक्षा घेऊन मी काकांबरोबर निघालो – आठ मैलांवर असलेल्या एका मोठ्या गावाच्या हायस्कूलात प्रवेश घेण्यासाठी!

वसतिगृहात राहण्याइतके पैसे माझ्यापाशी नव्हते. म्हणून मला रहायला जागा मिळाली ती धान्याचा व्यापार करणाऱ्या एका सावकाराच्या घरी. खरं तर ते सावकार माझे दूरचे नातेवाईक होते. पण गरीब शेतकऱ्याला ते आपला नातेवाईक कसा समजणार? खरं नातं एकच होतं इनामदार आणि कूळ, सावकार आणि ऋणको. काकांनीच हातापाया पडून त्यांच्याकडे माझी रहायची व्यवस्था केली होती. मी हायस्कुलात जाऊ लागलो, नादारीही मिळाली.

सावकाराघरी लक्ष्मी पाणी भरत होती. दोनदोन लॉऱ्या, तीनतीन दुकानं. पण व्यापार करणारा माणूस एक पैदेखील कधी फुकट दवडीत नाही. पाचशे रुपये दान करून पंचवीस हजारांच्या उत्पन्नाची सोय करून घेतो. ते मला रहायला, खायला देत, पण त्याची पुरती किंमत वसूल करून घेत.

माझ्या या लेखनावरून माझं हस्ताक्षर वाईट नसल्याचं आपल्या लक्षात येईलच. त्यातून गणितातही माझं डोकं छान चालत असे. माध्यमिक परीक्षेत गणितामध्ये मला शंभरपैकी शंभर मार्क मिळाले होते. मला रहायला देणाऱ्यांनी ही संधी सोडली नाही. सुरुवातीला ते माझ्याकडून पत्रं लिहून घेत. मग खतावणी लिहून घेऊ लागले. मग हिशोबाचं कामही माझ्याच गळ्यात घातलं. रोज सकाळी दोन तास मला ते काम करावं लागे.

अभ्यासाला रात्री आठनंतरच वेळ मिळायचा.

ते तरी धड करता येत होतं का?

दुकानाला लागून असलेल्या एका छोट्या कोठडीत मी रहात होतो. त्याच खोलीत त्यांचा मुनीमही रहायचा. मुनिमाने चाळीशी ओलांडली होती. सुकल्या वटवाघळासारखा चेहरा, मोठाले बटबटीत डोळे. मी अभ्यासाला बसलो की तो हुक्का ओढत गोष्ट सांगायला सुरुवात करायचा.

त्यावेळी माझं वय ते किती होतं? फार फार तर बारा वर्षं. हुक्क्याचे झुरके घेत, आपल्या चमकदार डोळ्यांना आणखी चमकदार करीत, घोगऱ्या आवाजात तो ज्या गोष्टी सांगायचा त्यांचा अर्थ मला त्यावेळी समजत नसे. पुढे तो समजला. पार अर्वाच्य व अश्लील गोष्टी होत्या त्या. कोणकोणत्या पोरींना कसकसं त्याने नासवलं

त्याचीच तपशीलवार वर्णनं!

मला बरंवाईट काहीच समजत नसे. कंटाळा यायचा.

"जरा गप्प बसा ना, मला अभ्यास करायचा आहे."

"अरे थांब जरा, ऐक. शेतकऱ्याचा पोर काय विद्यासागर होणार आहे? –हूं! त्यापेक्षा हा हुक्का घे, तंबाखू ओढायला शीक."

मुनीम दमून झोपला तरी लगेच कंदील मालवला जायचा. सावकाराच्या घरून जे घासलेट मिळायचं त्यात रात्री नऊच्या पुढे दिवा लावणं शक्यच नव्हतं. आणि स्कॉलरशिपचे जे पैसे मला मिळायचे त्यातून माझा बारीक सारीक खर्च भागायचा. तेल विकत घेण्याइतके पैसे शिल्लक रहात नसत.

तरीदेखील पहिला दुसरा येत येत मी आठवीपर्यंत मजल मारली. त्यानंतर पुस्तकांचा प्रश्न समोर आला. पुस्तकं विकत घ्यायची तर त्यासाठी सत्तर ऐंशी रुपये लागणार होते. पण घेणं आवश्यकच होतं. शाळेचं अखेरचं वर्ष होतं. काकांनी घरचं धान विकून काही रुपये पाठवले. सावकारांनी दहा रुपयांची मदत केली. मुख्याध्यापकांनी कृपा करून शाळेतून तीन वह्या मिळवून दिल्या. तरीसुद्धा निम्मी पुस्तकं काही जमली नाहीत. आणि सावकारांच ते दहा रुपयांचं कर्ज फेडण्यासाठी मला कितीतरी खतावण्या लिहायला लागल्या.

महाशय, माध्यमिक शाळेत मला स्कॉलरशिप मिळाली तेव्हा मला वाटलं होतं की मी काही एक सामान्य विद्यार्थी नाही. माझ्यात अपूर्व शक्ती आहे आणि त्या बळावर–मी स्वाधीनकुमार – स्वाधीन गौरवाने मस्तक उंचावून, ताठ मानेने उभा राहीन. ज्या भारतासाठी माझ्या बाबांनी आपल्या छातीचं रक्त सांडलं त्याच भारतवर्षात मी माझ्या रचनात्मक कार्यासाठी जागा शोधून घेईन. पण मी नीट अध्ययन करू शकलो नाही की नीट परीक्षा देऊ शकलो नाही. रिझल्ट लागल्यावर मी थर्ड क्लासमध्ये पास झाल्याचं दिसलं.

मुख्याध्यापकांपासून ते खालपर्यंत सर्वजण छी : थू: करू लागले. सावकारांचा एक मुलगा आहे. बी.ए.ला तो तीनतीनदा नापास झाला आहे. आणि खांद्यावर बंदूक घेऊन हळदी नदीकाठी पक्ष्यांची शिकार करीत तो भटकत असतो. तो म्हणाला, "अरे, पास झालास हे नशीब समज! नाहीतर कितीतरी हुशार विद्यार्थी स्कूल फायनलला गचके खातात."

दोन दिवस मी खोलीबाहेर पडलो नाही. कुणाला तोंड दाखवलं नाही की जेवलो नाही. आणि त्याचवेळी आईचे अश्रू टपदिशी माझ्यावर ओघळू लागले.

"ऊठ बाळ, ऊठ.पुढच्या वेळेला खूप मन लावून अभ्यास कर. नक्कीच तू एक दिवस मोठा होशील. तुझ्यासारखी आणखी कितीतरी मुलं आहेत. त्यांच्यापैकी कित्येक जण तर पासदेखील झाले नाहीत. त्यांचा जरा विचार कर."

महाशय, मी पुन्हा कंबर कसली. या खेपेला कलकत्त्याला आलो.

काय करणार? त्याच सावकारांकडून एक पत्र घेऊन आलो. सरकार घराण्याचं सावकारांशी नातं आहे. बडा बाजारात त्यांचा तंबाखूचा व्यापार आहे. तिथेच आश्रय घेतला.

पुन्हा तेच काम. दुकानात धंद्याच्या कामकाजात मदत करणे आणि वेळ आली तर तगाद्यासाठीही जाणे. तरीदेखील वाटलं की कलकत्ता ते कलकत्ताच! किती विशाल आहे इथलं आयुष्य – किती संधी आहे. मोठमोठाली महाविद्यालये, विख्यात, विद्वान शिक्षक. या महाविद्यालयात पाय ठेवून नामांकित प्राध्यापकांच्या ज्ञानाचा जरासा स्पर्श होताच माझ्या अंतःकरणात लक्ष दीप उजळतील. जगभरच्या चैतन्याची लाट या कलकत्त्याला येऊन पोचते तिच्याशी एकदा सुसंवाद साधला की हां हां म्हणता मी या खुल्या आकाशाखाली ताठ मानेने उभा राहू शकेन – कोमेजलेल्या रोपाला पहिल्या सरीचं पाणी मिळताच ते तरारून जावं, अगदी तसंच!

महाविद्यालयात गेलो – जवळ काही रुपये होते, तेच घरच्या धानाच्या विक्रीचे! यामुळे घरच्या लोकांना बरेच दिवस अर्धपोटी तरी रहावं लागेल नाहीतर उपाशी तरी रहावं लागेल हे ठाऊक होतं मला. पण परीक्षेत चांगले मार्क मिळाले. माणूस बनलो, तर –

महाविद्यालयाची इमारत खूप मोठी आहे– रथयात्रेसारखी गर्दी होती तिथे. त्या गर्दीचे धक्केबुक्के खात कसाबसा कार्यालयात पोचलो तर कानावर आलं, ''थर्ड क्लास? आय. एस. सी. ला सीट हवी? शक्य नाही.''

एकदोन नाही, चांगल्या सहासहा कॉलेजांनी वाटाण्याच्या अक्षता लावल्या. अखेर एका रद्दी कॉलेजात एक सीट मिळाली. थोडं फार कन्सेशन मिळावं म्हणून व्हाईस प्रिंसिपॉलना भेटायला गेलो.

''कन्सेशन?'' त्यांच्या भुवया उंचावल्या, ''थर्ड डिव्हीजन?''

''सर–''

''आय. एस. सी. ला आम्ही एरवीदेखील कन्सेशन देत नाही. त्यातून थर्ड डिव्हीजन!''

''सर, गरीब आहे–''

''सगळी बंगाली मुलं गरीब असतात. हा विचार केला तर कॉलेजच्या सगळ्या विद्यार्थ्यांना फ्री स्टूडन्टशिप द्यावी लागेल.''

''सर, मी शेतकऱ्याचा मुलगा आहे–''

व्हाइस प्रिंसिपॉल भडकले, ''तर मग कॉलेजात शिकायला कशाला आलास? शेती का नाही करीत? उच्च शिक्षण हे तुम्हा लोकांसाठी नाही. गो–गो–डोन्ट डिस्टर्ब मी–''

कन्सेशन मिळालं नाही. परत येताना वाटेत मला त्या मुनीमचे शब्द आठवत होते, ''शेतकऱ्याचा पोर विद्यासागर होणार आहे? हूं!''

महाशय, मी त्याच वेळी आपल्या गावी परत जायला हवं होतं नाही का? रणरणत्या उन्हात मूठभर चुरमुरे खाऊन माझे काका शेतात नांगर चालवतात, त्यांच्या निढळाचा घाम खाली मातीत गळत असतो – त्यांच्यापाशीच मी परत गेलो असतो तर बरं झालं असतं. शहरी अपमानाचा हा आसूड मला असा पाठीवर झेलावा लागला नसता. पण आशा मोठी चिवट असते. मला ती सोडवली नाही. कुठली जिद्द माझ्या मनात निर्माण झाली कुणास ठाऊक. पण मी निश्चय केला की तडीस गेल्याखेरीज सोडायचं नाही, तोवर स्वस्थ बसायचं नाही.

सरकारांच्या तंबाखूच्या दुकानात एका कोपऱ्यात मी पडून राही. सावकारांच्या व इथल्या जागेत किती फरक होता. तिथेही मी एका छोट्याशा खोलीत रहात होतो. पण बाहेर आकाश होतं, प्रकाश होता, आंघोळीसाठी विहिरीचं काळंशार पाणी होतं, वाऱ्यात चाफा बकुळीचा गंध होता. पण इथे बडा बाजारची गल्ली होती. भर दुपारीदेखील दिव्यांच्या उजेडातच काम करावं लागत होतं. तीन हात रुंद गल्लीच्या दोहों बाजूंना गगनचुंबी, दमट, ओलसर इमारतींच्या रांगा होत्या. वाऱ्याचं नाव नाही. रात्री दीड दोन वाजेपर्यंत लोकांची गर्दीच गर्दी, गुदमरून टाकणारी उष्णता, दुकानांच्या रांगांमधून येणारा गूळ व तंबाखूचा उग्र वास, और कान फुटतील इतका कोलाहल.

याच वातावरणात भिंतीला चिकटून ठेवलेल्या एका तक्तावर मी रहात होतो. रात्रभर उंदरांचा धुमाकूळ चाललेला असे, दिवसा झुरळं चैन घेऊ देत नसत. सरकार कुटुंब माझा कॉलेजचा खर्च देत होतं, हातखर्चासाठी पाच रुपयेही देत होतं. बदल्यात मला सकाळ-संध्याकाळ तगाद्यासाठी जावं लागत होतं. धावपळ करून एखादी शिकवणी करावी म्हटलं तर तेही शक्य नव्हतं. आणि पुस्तकं? आय. एस. सी. साठी सगळी पुस्तकं विकत घ्यायला किती पैसे लागतात ते आजही मला ठाऊक नाही. महाशय, आपणास कदाचित ठाऊक नसेल. पण आपल्या काळी पाच रुपयात मिळणाऱ्या पुस्तकाची किंमत आज बारा रुपये झाली आहे. एकदोन पुस्तकांच्या जुन्या आवृत्त्या फुटपाथवरून विकत घेतल्या होत्या. पण त्याने निम्म्या अभ्यासक्रमाचंही काम भागलं नाही.

अभ्यास? जेवण्यासाठी सरकारांच्या बहूबाजारमधील घरी जावं लागायचं. तिथून परत येईपर्यंत दहा वाजून जात. त्यानंतर अंधुक प्रकाशाचा एक पिवळसर मंद बल्ब लावून अभ्यासाला बसलो की डोळे चुरचुरू लागायचे. वह्यातील टिपणं न सोडवता येणाऱ्या कोड्यांसारखी वाटायची. केव्हा डोळे मिटायचे ते समजायचं देखील नाही. रात्रभर उंदीर आणि झुरळं अंगावर धुडगूस घालायचे.

आणि कॉलेजात? अशी गर्दी की विचारू नका. एकेका बाकावर सात सात, आठ आठ जणांना गर्दी करून बसावं लागे. खरं म्हणजे तो बाक असे पाच जणांसाठी. टिपणं घेण्यासाठी वही ठेवायला जागा नसे. प्रयोगशाळेची अवस्था तर याहून

विलक्षण होती. पंधरा जण काम करू शकतील त्या जागी पन्नास जणांना काम करावं लागत होतं.

वा रे उदयोन्मुख शास्त्रज्ञ! हेच आपला उद्याचा भारत घडवणार आहेत – त्यांच्या अभ्यासाची ही व्यवस्था!

तरीदेखील मी प्रयत्नात कसूर केली नाही. दोनचार मुलांविषयी बोलत नाही – माझ्यासारखे सामान्य विद्यार्थी शिकण्यासाठीच कॉलेजात येतात. तर मग ते का शिकू शकत नाहीत, का नापास होतात !–

एक प्रसंग सांगू? तो दिवस आठवला की आजही या परिस्थितीत देखील मला हसू येतं.

कॉलेजचा संस्थापन दिवस होता. समारंभाची गडबड, ध्वजारोपण, भाषण. सगळ्यात चांगलं भाषण व्हाइस प्रिंसिपॉलनी दिलं होतं. बोलता बोलता त्यांचे डोळे भरून आले होते.

"– आम्ही आकडेवारी जमवून पाहिलं आहे. कॉलेजचे सरासरी दहा टक्के विद्यार्थी सर्व पुस्तकं खरेदी करू शकतात. वीस टक्के विद्यार्थी थोडीफार पुस्तकं घेऊ शकतात. उरलेले सत्तर टक्के विद्यार्थी एकही पुस्तक विकत घेऊ शकत नाहीत. अशा परिस्थितीत आम्ही काय शिकवणार आणि कुणाला शिकवणार? याला जर वेळीच आवर घातला गेला नाही तर आपला देश कुणीकडे जाईल?"

आवर घालण्याच्या उपायाचा देखील व्हाइस प्रिंसिपॉलनी विचार करून ठेवला होता. त्यांनी सांगून टाकलं की महाविद्यालयीन शिक्षण हे गरीब विद्यार्थ्यांसाठी नाहीच मुळी!

महाशय, दुसऱ्या तासाची घंटा झाली आहे. आता फार वेळ नाही मला लिहिता येणार नाही. आपण इतकं सर्व वाचलं त्याचा गैरफायदा घेऊन आपणाला आणखी जास्त वाचायची तसदी नाही देणार. मला जे काही सांगायचं आहे ते थोडक्यात सांगतो.

माझ्या आईला लिहिता वाचता येत नाही. तिच्या वतीने माझे काकाच वेड्यावाकड्या अक्षरात पत्र लिहायचे–

"तू खूप मोठा हो बाळ. राष्ट्राच्या सुप्रसिद्ध लोकांमध्ये तुझी गणना होवो. तुझे बाबा जे कार्य करून गेलेत ते तू पुढे चालव, त्याचा मान ठेव. तुला स्वतंत्र भारताचा नेता व्हायचं आहे हे विसरू नकोस–"

नाही विसरलो – क्षणभरही विसरलो नाही. पण स्वतंत्र भारताने माझी जबाबदारी घेतली नाही– शिक्षणाचा मार्ग मोकळा केला नाही. तंबाखूच्या दुकानात नोकरी करीत, वर्गाच्या नावाखाली त्या गर्दीत, अंधुक, दमट, कोलाहल असलेल्या बडा बाजारमधल्या त्या गल्लीतील दुकानात, विजेच्या पिवळट प्रकाशात सारं काही माझ्या नजरेसमोर अस्पष्ट होऊन जाई– मस्तकात रक्त सळसळत राही. इथून पळून

जावं. एखाद्या जुन्या विहिरीच्या खोल काळ्या पाण्यात उडी घ्यावी, श्वास भरभरून चाफ्या बकुळीचा वास घ्यावा, पावसाच्या काळ्या मेघाला खुणावून ''ये रे ये रे पावसा, तुला देतो पैसा–' म्हणावं, असं माझ्या मनात सारखं येई.

पण कलकत्त्यात विहिरीचं ते काळंशार पाणी कुठे? चाफ्या बकुळीचा वास कुठे? देशाच्या घरात पोटभर अन्न नाही आणि माणसाच्या ज्वलंत वक्षात कुठेही पाण्याचे तुषार नाहीत.

कुठं जाऊ –कुठे पळून जाऊ?

आशा सोडणार नाही. मी जगणार, मोठा माणूस होणार. मी नसलो तर ब्लास्ट फर्नेसमधील आग प्रज्वलित होणार नाही, हायड्रो इलेक्ट्रिक वीज चालू होणार नाही, अणुविषयक संशोधनाचं काम अर्धवट राहील, रिफायनरीचं पेट्रोलियम, पेट्रोल, केरोसिन, ब्लू ऑईल, पॅराफिन नवी नवी रूपं धारण करू शकणार नाहीत! त्या ध्येयाचा, उद्दिष्टाचा मंत्र मला जबरदस्तीने मिळवायलाच हवा! मी स्वतंत्र भारताचा शास्त्रज्ञ नाही का?

महाशय, सारं स्वप्न आहे! बांगला देशच्या प्रत्येक कॉलेजातील असंख्य विद्यार्थी स्वप्नांवरच जगतात – स्वप्नाच्या खुमारीतच वावरतात. त्यानंतर एक दिवस ते स्वप्न भंग पावतं – त्यांना दिसतं की –

महाशय, माझा अभ्यास होऊ शकला नाही. केव्हा अभ्यास करणार? कुठून पुस्तकं आणणार? जी काही चारदोन पुस्तकं कशीबशी जमवली, पिवळ्या बल्बच्या अंधुक प्रकाशात त्यांना काही अर्थच नव्हता. किड्यांसारखी त्यातील अक्षरं डोळ्यांपुढे नुसती वळवळत रहायची. त्यानंतर कधी देहभान हरपायचं, चेतनेवर पडदा पडायचा कुणास ठाऊक? तंबाखू, गूळ आणि उंदीर, झुरळं, दंमटपणा या सर्वांचा संमिश्र वास कोंदून राहिलेल्या त्या दुकानात सकाळी जाग आल्यावर असं वाटायचं जणू डोक्यावर मणाचं ओझं ठेवलेलं आहे. आठ वाजेस्तोवर हाती हिशोबाची वही यायची.

वार्षिकला वह्या तपासल्या जात नाहीत. फी भरली तरच प्रमोशन होतं. प्री टेस्ट दिलीच नाही–कशी देणार? त्यानंतर चाचणी परीक्षा आली.

महाशय, या ठिकाणी मी माझा अपराध कबूल करतो. जसजशी परीक्षा जवळ येऊ लागली, माझ्या मनात एक कधीही न विझणारी चिता सतत पेटलेली राहू लागली. पुस्तकं – माझ्यापाशी काही पुस्तकं असती तर? तर फर्स्टक्लास जरी नाही तरी निदान सेकंड क्लास नक्कीच मिळाला असता. आणि गणितात एक प्रमाणपत्र!

रागावू नका महाशय, जरा माझ्या मन:स्थितीचा विचार करा. मला वेड लागल्यासारखं झालं आणि मग – आणि मग – मी वर्गातल्या विद्यार्थ्यांची पुस्तक चोरू लागलो.

आपणाला माझ्याविषयी काय वाटत असेल कुणास ठाऊक. वाटू द्या. मी चोर

असल्याचं मला तरी कुठे मान्य आहे? माझ्या बाबांनी देशासाठी रक्त सांडलं होतं, स्वातंत्र्य मिळवलं होतं, मी त्यांचा मुलगा, चोरी करू लागलो?

महाशय, शक्य असेल तर–निर्णय घेण्यापूर्वी एकदा विचार करून पहा. मुलं चोरी का करू लागतात? का परीक्षेत कॉपी करतात? अवघड प्रश्न आल्यास का इतके अनावर होऊन परीक्षेच्या हॉलमधून बाहेर पडतात, दंगे करतात? या सर्व वाईट गोष्टी आहेत– खूप खूप वाईट. असं व्हायला नको आहे. कुणीही त्याचं समर्थन करणार नाही. पण तरीदेखील ते का व्हावं? का मुलं अशी चुकीच्या मार्गावर पाय ठेवतात? नुसतं पास नापास होण्यावर त्यांचं पुढील आयुष्य किती अवलंबून असतं याचा कधी कुणी विचार केला आहे?

चोरीच्या पुस्तकांच्या आधारे खुरडत कशीबशी चाचणी परीक्षा पास झालो. फी भरली होती. चाचणी परीक्षा दिली नसती तरी परवानगी मिळाली असती. पण त्यानंतर? परीक्षेची फी भरायची होती. आणखीही बरेच रुपये भरायचे होते.

गावाकडची परिस्थिती वाईट होती. काकांच्या पत्रावरून कळलं की दोन वेळच्या जेवायची भ्रांत आहे. देवीच्या चरणी वाहिलेला, सिंदूर लावलेला आईचा अखेरचा रुपयादेखील संपला आहे. कदाचित गाय विकून थोडेफार पैसे पाठवता येतील.

मी कळवलं, गाय विकायची जरूर नाही. मीच इथे काहीतरी करून व्यवस्था करीन.

पण काय व्यवस्था करू? कुठून आणू? स्टूडन्टस एड फंडामधून पंधरा रुपयांची मदत मिळाली. पण बाकीचं काय?

सरकार मालकांनी बोलावलं. म्हणाले, ''परीक्षेच्या फीची काळजी करू नकोस. मी तुला पन्नास रुपये देईन.''

इतकी मेहेरबानी? इतकी कृपा?

महाशय, इतक्या दिवसांनी आता कुठे मला कळलं आहे की कुठलीही कृपा ही निव्वळ कृपा नसते. त्यामागे एक फार मोठा हक्क असतो. कृपेची फार मोठी किंमत द्यावी लागते या जगात.

फी भरली गेली. त्यानंतर – त्यानंतर गेल्या दोन महिन्यांपासून कृपेचं ऋण फेडीत आहे.

आपणाला खरं वाटेल? गणित, फिजिक्स, केमिस्ट्री, बंगाली, इंग्रजी – एक अक्षर वाचू शकलो नाही. पन्नास रुपयांच्या बदल्यात रात्र रात्र जागून डोळे विस्फारून आणि डोक्यावर मणांचं ओझं घेऊन मी सरकार मालकांची खतावणी तयार करीत राहिलो आहे.

खतावणी तरी कसली? सगळा इन्कमटॅक्स चुकवायचा गुप्त हिशोब. पन्नास रुपयांच्या बदल्यात मला आपल्या रक्ताचा थेंब थेंब देऊन स्वतःला नामशेष करावं लागलं आहे. इतकं करून मी अभ्यास करायचा –मी काय महामानव आहे?

तरीसुद्धा परीक्षा द्यायला आलो होतो. आशा सोडली नव्हती. वाटलं होतं, एखादा चमत्कार घडून येईल. पुस्तकं चोरून चोरून हाताला सवय झाली होती. कॉपी करण्यासाठी पुस्तकांची पानंही फाडून आणली होती. पण चमत्कार झालाच नाही. कुडत्याच्या आतून कागदाचा एक कपटाही मला काढता आला नाही. पहिला पेपर, दुसरा पेपर, तिसरा पेपर—माझ्या डोळ्यांसमोर सगळे पेपर फेर धरू लागले. सरकार कंपनीच्या खोट्या हिशोबांचं खातं डोक्यात गरगरू लागलं. प्रत्येक विद्यार्थी व इन्व्हिजिलेटरचा चेहरा जमाखर्चाच्या पानांसारखा दिसू लागला.

बंगालीचा हा पेपर माझा अखेरचा पेपर आहे.

महाशय, वेळ संपल्याची सूचना झाली आहे. पाचच मिनिटांत ते ही उत्तरपत्रिका ओढून घेऊन जातील. माझंही सांगून झालं आहे. आजच सायंकाळनंतर कुठल्या तरी एका आगगाडीच्या चाकांखाली माझ्या उरावरचं ओझं हलकं करीन.

मला जगायचं होतं—मी स्वाधीनकुमार आहे. स्वतंत्र भारतासाठी मला जगायचं होतं. पण मी का जगू शकलो नाही? माझ्यासारख्या हजारो विद्यार्थ्यांच्या वतीने मी हा प्रश्न आपणासमोर ठेवून जात आहे. आपणच उत्तराचा विचार करून पहा.

भ्याडासारखी आत्महत्या करतोय मी? नाही महाशय, नाही. हा माझा पराजय नाही, माझा लढा आहे. बेचाळीसच्या सप्टेंबर महिन्यात एका प्रलय रात्री माझ्या बाबांनी देशाच्या मातीवर आपल्या छातीचं रक्त सांडलं होतं. देशाच्या लाखो विद्यार्थी-विद्यार्थिनींसाठी माझं रक्तदेखील एक ऐतिहासिक सूचना देऊन जाईल. तो इतिहास कधी निर्माण होईल ते मला ठाऊक नाही. आपणाला माहीत आहे? आपण सांगू शकाल? प्रणाम!

# लहानशी गोष्ट

## संतोषकुमार घोष

तो माझ्या पाठीवर वाकला होता. त्याचा श्वास माझ्या कानाला स्पर्श करीत होता. का कुणास ठाऊक, माझी बोटं सुन्न झाली होती. तो बोलत होता; उगाच जळलेले कागद चिवडतो आहेस, धूळ उडवतो आहेस. ती कथा तुला कधीच मिळायची नाही, सरसिज.''

त्याचं तोंड माझ्या कानापाशी होतं. त्याचा आवाज विलक्षण घोगरा, अनैसर्गिक, प्रेतवत होता. किल्लीच्या भोकातून अशाप्रकारच्या आवाज निघतो.

मी म्हटलं, ''काही असो, मला ती कथा हवीच.''

''हवीच हवी, '' त्याने जणू चेष्टा केली, ''कशाला हवी?''

''ताडून पाहिली असती. तीच आहे की बिंदु मामीची जी गोष्ट तुला सांगितली होती ती आहे?''

''त्या गोष्टीत काय आहे?''

''नीटसं आठवत नाही. वादळी रात्र, घोंघावणारा वारा, आमच्या ओसरीवर बसलेल्या भिकारणीने घाबरून पोराला झाकून घेतलं. तरीसुध्दा पोर थरथरत होतं, निळं पडत चाललं होतं. अखेर त्या बाईने इकडे तिकडे पाहून आपल्या अंगावरचं लुगडं फेडलं आणि त्याच्या चारपाच घड्या करून त्यात ते पोर गुंडाळलं. बस्, इतकंच आठवतं.''

ऐकून तो मोठ्यांदा हसू लागला. काळा पायघोळ अंगरखा मधून मधून फुगून हेलकावे खात रात्रीच्या रंगाशी हातमिळवणी करीत होता.

त्याच्या नजरेला नजर भिडवण्याचं साहस मला झालं नाही. क्षुब्ध स्वरात विचारलं, ''ही काय हसण्यासारखी गोष्ट आहे?''

तो म्हणाला, ''ऐकून हसू येतं. तुलाही ते ठाऊक आहे. किती वर्षांपूर्वी लिहिली होती सांग बघू.''

''किती वर्षांपूर्वी ते काही सांगता नाही येणार. त्या काळी एक पैशाच्या शेंगा घेऊन एक तास सहज घालवता यायचा. चहाच्या दुकानावर दोन पैशांचा पेला घेऊन दोन तास घालवता यायचे. दोन आण्यात दुपारी धरमतहल्ल्याहून अलीपूर मार्गे बालीगंजपर्यंत जाता यायचं. त्याकाळी –''

तो हात उंचावून म्हणाला, ''जाऊ दे ते. त्याची काही जरूर नाही. सरसिज, तू

आता ती कथा शोधायच्या भानगडीत पडू नकोस.''

''का?''

''कारण ती आता तुला सापडायची नाही.''

तो जरासा खाकरला, त्याच अनैसर्गिक पद्धतीने! हसला. ''खरं तर ती कथा माझ्यापाशी आहे. ही बघ.''

इतकं बोलून त्याने आपल्या काळ्या अंगरख्यात हात घातला. घड्यांवर घड्या, लाटा उचंबळल्या आणि रात्रीच्या शरीरात सामावून गेल्या. कुठली वस्तू बाहेर काढून तो माझ्या डोळ्यांपुढे हलवत राहिला कुणास ठाऊक! अंधुक प्रकाशात नीट ओळखता येत नव्हती. असं वाटलं, एखादं मांजराचं पिल्लू असावं, काटकुळं, डोळे खापरांसारखे बाहेर आलेले. जणू मेलेले दोन मणीच.

हात पुढे करून धरल्यावर मी हात मागे ओढून घेतले. तो हसत होता. ''पाहिलंस ना? तुलाही आता तो नको आहे. ज्याला हात लावायची भीती वाटते, त्याला वाचवणार कसा तू?''

त्याने तो विलक्षण प्राणी पुन्हा अंगरख्यात लपवला. ''माझ्याचपाशी राहू दे तो.''

त्याच्याकडे टकमका पाहात भीत भीत मी विचारलं, ''कोण आहेस तू?''

उत्तर न देता तो हळूहळू मागे सरकला. त्याचा अंगरखा थरारला. हलत डुलत, थरथरत तो रात्रीत मिसळून गेला आणि स्थिरावला. लक्षपूर्वक पाहिलं तर तोसुद्धा नाहीय. तेव्हा मी त्याला ओळखलं. तो काळ होता. तोच काळ ज्यावेळी–

एका पैशाच्या शेंगा घेऊन --- वगैरे, वगैरे. गावच्या खुंटीवरच्या जाहिरातीवरून ज्यावेळी घरापासून ते नोकरीपर्यंत, वधूवरापासून ते विद्यार्थी-विद्यार्थिनीपर्यंत सर्व गोष्टींचा पत्ता लागत होता, ज्यावेळी ती वत्सल भिकारीण आई–

काळाने तो प्रसंग मला आजच्या प्रकाशात दाखवला होता म्हणून मला तो मेलेल्या, केसाळ मांजराच्या पिल्लासारखा वाटला. त्याने जर मला त्याच्या अंगरख्यात डोकावू दिलं असतं, त्याच्या वयाला जर त्या काळच्या नजरेत परत नेता आलं असतं आणि मन व प्रकाश, आणि त्या दिवसांतला गंध व मोह–सारं काही. तर मी त्या सुंदर निर्लज्ज भिकारणीला जिवंत पाहू शकलो असतो. त्या अंगरख्याच्या आत सगळे जिवंत असतात, बाहेर पडताच मरतात.

(पुढे काय झालं, सरसिज?)

''त्यानंतर बिंदु मामी अगदी थंड स्वरात मला म्हणाली, ''ये.' टॅक्सी भाडं चुकतं करून मी उतरलो. खाली चिखल होता. मोठी उडी मारावी लागली. तरीदेखील शार्क स्किनवर चिखलाचे शिंतोडे उडालेच.

ही गल्ली जणू टॅक्सीच्या मापाचीच आहे. आगकाड्या आणि आगपेटीसारखी अगदी फिट्ट. शिरताच वाटलं हे सर्व परिचित आहे. विलक्षण वास आहे इथला. मागेही एकदा मी इथे राहिलो आहे. अचानक जुन्या प्रेयसीच्या घरी जाताना वाटावं

तसं मला झालं. थोडं अडखळल्यासारखं काही अडथळा आल्यासारखं वाटलं पण मग सगळं परिचित असल्यासारखं वाटू लागलं– शरीराचे सांधे, जांभई, केसांचा गंध, सारं काही पूर्वीसारखं तंतोतंत वागणं आता जमणार नाही, विचित्र वाटेल. समोरासमोर येऊनही चेहऱ्यापाशी चेहरा आणता येणार नाही. एक अंतर मध्ये कायम राहील.

अडचण कसली आहे? माझ्या वयाची? खिशातल्या कोऱ्याकरकरीत नोटांच्या गड्डीची? बुटांचा कर्रकर्र आवाज जरा कमी झाला असता तर काय बिघडलं असतं?

बिंदुमामी कंदील घेऊन आली. मी म्हटलं, "कशाला उगाच? याची काही जरूर नव्हती. मी तसाच आलो असतो. परिमल कसा आहे मामी?"

बोलता बोलता आतल्या खोलीत आलो. खोली इतकी बंदिस्त होती की ताप आलेल्या माणसाला घाम येऊन त्याचा ताप तिथे उतरला असता. आत जाण्यासाठी दार लागतंच म्हणून एक दार तेवढं खोलीला होतं. पण खिडकी नावाचं काही नव्हतं.

"परिमल कसा आहे?"

बिंदुमामीचा रागावलेला चेहरा पाहूनच आपला प्रश्न निरर्थक असल्याचं मी ओळखायला हवं होतं.

मामीने आतल्या खोलीकडे निर्देश केला. एक स्टूल ठेवलेलं होतं. बसलो. खरं तर माझ्या पोटाची चरबी दबली जात होती. छातीवरची बटणं उघडावीत की काय याचा मी विचार करीत होतो. आणि बूट घालून आत आलो त्यात काही चुकलं तर नाही याचा निर्णय करण्यासाठी खोलीत आणखी कुणाची पादत्राणे– मग ती जुनी का असेनात–शोधत होतो.

"चहा घेणार?"

मी भानावर आलो. बिंदुमामी विचारीत होती. म्हटलं, "हो, चालेल." खोलीतल्या एका कोपऱ्यात एका पेल्यावर मुंग्यांची धावपळ चालली होती. बिंदुमामी तो पेला उचलून बाहेर जाताना दिसल्या.

(त्यानंतर काय झालं सरसिज? काहीसुद्धा लपवू नकोस.)

"छे, काहीसुद्धा लपवणार नाही. हे पहा, तुम्ही कोण आहात ते मला ठाऊक नाही. कदाचित माझा आत्मा, विवेक किंवा माझे कन्फेसर असाल. सारं काही सांगण्यासाठीच तर तुम्हाला बोलावलं आहे. तुमच्यापाशी मी कबूल करतो की तो चहा काही मी पिऊ शकलो नाही. काय झालं ठाऊक आहे? पेला घेण्यासाठी मी हात पुढे केला तोच तो निसटून अचानक खाली जमिनीवर पडला. माझ्या चमकदार शार्क स्किनवर आणखी काही शिंतोडे उडाले. लज्जित होऊन बिंदुमामी म्हणाली, "अरे!" आणि फडकं आणण्यासाठी ती धावली. मी मात्र वैतागलो.

हसताय? तुम्हाला काय म्हणायचं आहे ते मला ठाऊक आहे. मी मुद्दामच पेला खाली पाडला असंच ना? किंवा माझ्या वृत्तीने नकळत तसं केलं असेल. कारण

थोड्याच वेळापूर्वी मला त्या पेल्यात झुरळं दिसली होती. याखेरीज बुरसटलेली फरशी, कुजका वास, अशी खोली—तिथे बसून काहीही माझ्या घशाखाली उतरणं शक्यच नव्हतं.

या गोष्टीचा मला नंतर पश्चात्तापही झाला. हे काही बरं झालं नाही. वाईट झालं. क्षुद्र लोकांसारखं झालं. बिंदुमामीच्या हे लक्षात आलं की नाही ठाऊक नाही. नाहीतर मी काय करणार? आपण सगळे आपापल्या वृत्तींचे दास आहोत. मळमळायला लागलं तर ती काय माझी चूक आहे? आपण ढेकर थांबवू शकतो का? शिंक अडवू शकतो का?

(फार नाही. फक्त दहाबारा वर्षांपूर्वी तुम्ही याच्याहीपेक्षा खालच्या पातळीवर होता ते आठवलं नाही तुम्हाला? असली गल्ली, असलं घर ते सर्व तुम्हाला तुमच्या श्वासाप्रमाणेच नैसर्गिक होतं.)

''होतं तेव्हा होतं. पण आता नाही आहे. त्याचं असं आहे की आपण एक सवय सोडून दुसरी सवय लावून घेतो. नव्या जन्मासारखं. इतके दिवस त्या अंधकूपाशी एकजीव होऊन राहिलो होतो हे जितकं सत्य आहे तितकंच तिथून बाहेर पडलो हे देखील सत्य आहे. वास्तविकाला निष्कपट भावाने स्वीकार करता येणं शक्य आहे. वयाच्या दहाव्या वर्षाचा शर्ट जर विसाव्या वर्षी लहान झाला तर त्यात दोष कुणाचा? ज्या माणसाचा शर्ट आहे त्याचा थोडाच आहे—तो काळाचा दोष आहे.

शेजारच्या खोलीतून घर्रघर्र आवाज ऐकू येत होता. तो कान देऊन ऐकत मी प्रश्नार्थ नजरेनं बिंदुमामींकडे पाहिलं.

''परिमल आहे. छातीत कफ झालाय. श्वास घ्यायला त्रास होतो म्हणून हा असा आवाज सारखा येतो. आता झोपलाय तरीदेखील आवाज येतो आहे.''

बुरसटलेली फरशी. कधीपासून शेवाळ साचत राहिलं कुणास ठाऊक? खोली रस्त्याच्या पातळीवरून थोडी खाली. जणू एखादं सुकलेलं पोर असावं—

(सरसिज, आणखी बोलू नकोस. यानंतर तू काय बोलणार आहेस ते ठाऊक आहे मला. पांघरुणाला वाळवी, फाटकी उशी, दाराच्या कोपऱ्यातही कोळिष्टकं—हेच सगळं सांगणार आहेस ना तू? यात खोटं काही नाही. पण त्याचं वर्णन काही मनाला सुखावणारं नाही. ज्या जीवनाशी आता तुझा काही संबंध राहिलेला नाही त्याचं वर्णन करू नकोस.)

मालवत चाललेला कंदील भकभक करीत होता. त्याकडे पहात विचारलं, ''मामी, परिमल केव्हापासून आजारी आहे?''

''बावीस दिवस झाले आज.''

''डॉक्टर काय म्हणतात?''

''डॉक्टरांना दाखवायला जमलंच नाही, तर तो काय सांगणार?''

त्या दुर्दैवी बाईपाशी काय ठेवलंय? बुच्चा गळा, बुच्चे हात—बघतात नाही

तिच्याकडे सरसिज! लग्नाच्या वेळी जे दोनचार तोळे सोनं अंगावर घातलं होतं ते कधीच मोडलं गेलं आहे.

"तुम्ही कधी आलात मामी?"

"गेल्या बुधवारपासून या बुधवारपर्यंत आज आठ दिवस झाले. पोटची पोर–निरोप मिळताच धावत आले. तुला तर ठाऊकच आहे सरसिज-माझी बाळी किती लहान आहे."

"ठाऊक आहे मामी."

"जे काही हाती लागलं ते सगळं गोळा करून घेऊन आले. तिथली परिस्थितीही तुला ठाऊकच आहे. टुकुला यावर्षी परीक्षा द्यायची आहे. अजून त्याची फी भरलेली नाही."

"समजलं मामी."

"पदर डोळ्यांना लावून मामीने मला पदराच्या फाटका भाग दाखवला.

"सरसिज, मुलींचे सगळे फ्रॉक फाटले आहेत. दोन महिन्यांचं भाडं दिलेलं नाही–सव्वीस दुणे बावन्न रुपये. सकाळी भात, संध्याकाळी चपात्या–तरी सगळा खर्च भागत नाही. तरीदेखील. बिन्दुमामी म्हणाली, "तरीदेखील बातमी कळताच होतं नव्हतं ते सारं जमवून यावं लागलं. परिमलचा प्राण अगोदर, बाकीचं सगळं नंतर."

पदराच्या टोकाशी बांधलेली गाठ सोडून बिन्दुमामी एक नोट काढू लागली–जुनी, चुरगळलेली. एकेक पाऊल टाकीत बिन्दुमामी पुढे येत होती. स्थिर दृष्टी. मी मागे सरलो होतो. मी ओळखलं होतं. माझ्या हस्ते बिंदुमामी त्यांना रुपये देऊ इच्छित होती. दिले देखील. तिचा हात थरथरत होता. आवाजही कापत होता.

"सरसिज, माझ्यापाशी आणखी काही नाही. यातून परिमलसाठी इंजेक्शन आणता आलं तर पहा प्रयत्न करून. परतीच्या गाडीभाड्यासाठी मोठ्या मुष्किलीने हे पैसे वाचवून ठेवले होते."

मी पैसे घेतले नाहीत. मला घेताच आले नाहीत. निघून आलो. पण ही काही फार मोठी गोष्ट नव्हे. मला माझी ती कथा आठवली– "क्रोडपत्र.' भिकारणीने लुगडं फेडून त्यात मांडीवरच्या मुलाला गुंडाळलं होतं.

(मुन्नी, म्हणजे उषाशी तुझी त्या दिवशी भेट झाली नाही सरसिज?)

"झाली होती. कंदील घेऊन उषाच पाठोपाठ आली होती. गल्लीच्या नाक्यापर्यंत. तिथे पोचून मी मागे वळून पाहिलं. थांबलो. कंदिलाच्या प्रकाशाने व जाळीने तिच्या शरीराचे तुकडे तुकडे करून टाकले होते. "तुझा चेहरा असा का झालाय उषा?" उषा हसली. तिने तोंड फिरवलं. आजारी पडली होती ना? त्यातून परिमलचं हे आजारपण. जवळजवळ रोजच रात्री जागरण होतंय.

डोक्यावर पदर नव्हता. उषाचे केस भुरभुर उडत होते. कंदिलाच्या कड्या

थरथरत तिच्या देहावर, चेहऱ्यावर, खांद्यांवर, गालांवर, डोळ्यांवर प्रकाशाची आकृती रेखाटत होत्या. उषा पुन्हा हसली. ''कशी दिसतेय मी? भुतासारखी? गेल्या काही वर्षांपासून मी अगदी भूतच झालेय.''

मी बोलायला हवं होतं, ''छे, छे, उषा, तू अजून तशीच आहेस.'' पण मी गप्प राहिलो.

अचानक उषा तोंड वाकडं करून हसली. ''पण तुझा चेहरा मात्र खुलला आहे हं!''

''तू आणखी लठ्ठ झाला आहेस'' हेच उषाला सांगायचं आहे का? ते नीटसं लक्षात न आल्याने मी रुमालाने तोंड पुसलं. शार्क स्किन आणि हवाई शर्टमुळे त्यावेळी मला घाम येत होता.

उषा सांगू लागली, ''आमच्या या गल्लीत रात्रभर उभा राहिलास तरी टॅक्सी काही मिळायची नाही.''

तिच्या बोलण्यातला गर्भितार्थ ओळखून मी झटपट तिथून निघून मुख्य रस्त्यावर आलो. निघताना पुन्हा येईन,किंवा उद्या येईन किंवा अशाच प्रकारचं काहीतरी मी अस्पष्ट स्वरात म्हटलं असेन.

* * *

तो म्हणाला, ''जेवण तसंच झाकलेलं राहिलंय सरसिज. तू हातसुद्धा लावला नाहीस?''

मी म्हटलं, ''नको, मला या व्हरांड्यात बसून सिगारेट संपवू दे.''

तो हसला. अतिशय वाईट रीतीने त्याने मला मागून घट्ट आवळून टाकलं. अंधाराच्या रंगाचे हात माझ्या गळ्यात – गळा आवळणार आहे का?

त्याचा चेहरा मला त्यावेळी दिसत नव्हता, पण तो तिथे होता, त्याने मला जखडून टाकलं होतं. तो म्हणाला, ''खतम करून काय होणार आहे? थोडीशी राख होऊन शिल्लक राहील, थोडासा धूर होऊन वाऱ्यात मिसळून जाईल, शिवाय या दोन तासात किती सिगारेटी ओढल्या, जरा तरी विचार कर. त्यापेक्षा झाकण उघडून पोटात दोन घास घाल. ते जास्त चांगलं.''

''सांगितलं ना, मला भूक नाही.''

''का नाही?''

''का नाही ते तुला ठाऊक आहे. माझं मन बेचैन आहे. आज उषा भेटली होती ना? ती खोलीत आली त्यावेळीच तिची अवस्था पाहिली असती तर तुलाही रडूच कोसळलं असतं. ठाऊक आहे तुला? उषाचा नवरा परिमल भयंकर आजारी आहे. जगण्याची आशा नाही. उषापाशी पैसे नाहीत. हातात एक बांगडी सुद्धा नाही.''

तो म्हणाला, ''अस्सं? म्हणून का तू अस्वस्थ आहेस सरसिज?''

त्याची बोलायची तऱ्हा किती तिरकस होती.

मी म्हटलं, ''उषाशी माझं काय नातं आहे हे तुला ठाऊक नाही म्हणून असा बोलतो आहेस. तिला कुठच्या कुठे पोचता आलं असतं. एका जराशा चुकीची तिला किती मोठी किंमत मोजावी लागतेय.'' सांगताना मला त्रास होत होता.

तो खो खो करून हसला. त्याचं ते हसणं काचेच्या असंख्य तुकड्यांसारखं मला विंधून गेलं. हसणं थांबल्यावर तो म्हणाला, ''जरा छातीवर हात ठेवून खरं सांग बघू सरसिज, खरंच का तुला मनापासून वाईट वाटलं आहे? उषाने तुला अव्हेरून परिमलशी लग्न केलं. आज ती सुखी नाही, अंधाऱ्या खोलीत उसासे टाकतेय, या गोष्टीचा तुला आत मनात कुठेतरी आनंद नाही झाला?''

मी उत्तर दिलं नाही. देण्यात काही अर्थ नव्हता. तो परका आहे. अविश्वासू आहे. त्याने उषाला ओळखलंच नाही. बिंदुमामीविषयी सांगितलं तर ते तरी समजेल का?

बिंदुमामीचं मुलीवर खूप प्रेम आहे. आपल्याजवळची अखेरची दहाची नोटही पदराची गाठ सोडून काढून दिली होती – हे ऐकूनही तो कदाचित खो खो करून हसू लागेल.

* * *

(–सरसिज दुसऱ्या दिवशी सकाळी तू पुन्हा तिथे गेला होतास ना?)

''हो, गेलो होतो. त्या दिवशी टॅक्सी गल्लीच्या आत नव्हती नेली. हातात औषधं, खिशात फळं आणि धोतराचा सोगा सांभाळीत उषाच्या घरी पोचलो होतो. आजूबाजूच्या घरात त्यावेळी चुली पेटवल्या जात होत्या.

आजही बिंदुमामीनेच दार उघडलं.

''परिमलचं कसं आहे मामी?''

''तसंच आहे. ये, आत ये.''

खोलीत शिरायची जितकी परवानगी दिवसाच्या उजेडाला मिळाली होती तितकाच तो फक्त आत शिरला होता. त्यातून खोलीतलं दारिद्य स्पष्ट दिसून येत होतं. तपशील द्यायची माझी इच्छा नाही. जुना पंचा, फाटकी लुंगी, डागाळलेल्या भिंती, मळकी उशी, माश्या हे सर्व तर होतंच, राहणारच होतं. आदल्या दिवशीचा मोढा शोधून काढला होता. आज धोतर कुडता नेसलो होतो. म्हणून बसायला अडचण वाटली नाही.

औषधं बिंदुमामीच्या हातात दिली. फळांचा पुडा देखील दिला. बिंदुमामीच्या चेहऱ्यावरच स्मितरेखा झळकली. ती लपवण्याचा प्रयत्न तिने केला नाही.

शेजारच्या खोलीतून घरघर आवाज येत होता. माझे कान कुठे लागले आहेत ते अंदाजाने ओळखून बिंदूमामी म्हणाली, ''कालची अख्खी रात्र अशीच गेलीय. पाळीपाळीने आम्ही दोघी मायलेकी रात्रभर जागलो आहोत. मुलीचे हातपाय गाळलेले पाहून मी देवाचा धावा केला होता–देवा, आजची रात्र कशीबशी पार पडू दे. त्यावेळी लेक या खोलीत डोकं आपटून घेत होती आणि त्या खोलीतून रोग्याची घरघर ऐकू येत होती. माझी काय स्थिती झाली होती ते मी सांगू शकत नाही तुला.''

अचानक बिंदुमामी गप्प झाली.

"– मधून मधून मुन्नी या खोलीत धावत यायची. तिच्या तोंडाकडे बघवत नव्हतं. डोळे लाल झाले होते. काल पाहिलंसच तू. कपाळ आपटल्याने रक्तबंबाळ झालं होतं. मी परिमलच्या छातीवर हात फिरवला. बेड पॅन दिला, चादर बदलली. तर पोरीला काही त्याच्यापाशी फार वेळ जागू दिलं नाही. तिची अवस्था तू बघितलीच आहेस. हाडांचा नुसता सापळा उरलीय. नशिबात असेल ते काही चुकत नाही. तरीदेखील जोवर डोळ्यांसमोर आहे तोवर तिला सांभाळीत असते. सरसिज, कितीही झालं तरी मी आई आहे तिची!"

माझ्या अंगावर शहारा आला. मामीच्या डोळ्यांभोवती काळी वर्तुळं होती. केस मातीने घुतले होते. मी म्हटलं, "मामी, तुझी तब्येत तरी कुठे बरी आहे? अशी रात्र रात्र जागलीस तर तूही आजारी पडशील."

बिंदुमामी हसली. हास्य आणि विषाद यांची संमिश्र भावना तिच्या चेहऱ्यावर तरळून गेली.

"माझं जाऊ दे. कधी देवाघरचं बोलावणं येईल त्याचा काय नेम? आज जातेय की उद्या कुणी सांगावं. पण कधीही गेले तरी मनाला एक समाधान राहील की आता कसली भीती नाही, या दुर्दैवी पोरीला सत्यानाश होण्यापासून वाचवलं आहे."

(सरसिज, या बोलण्यामुळे बिंदुमामीकडे बघायचा तुझा दृष्टिकोन नाही का बदलला?)

" हो बदलला, त्या क्षणापासून बिंदूमामी मला गरीब वाटेनाशी झाली. दुर्दैवामुळे उणीवांच्या ओढाताणीत बिंदुमामीचं सगळं काही गेलं–पण जे शिल्लक उरलं त्याचं मोलही काही कमी नाही. हे वेगळ्याच प्रकारचं आयुष्य आहे– इथे एक जण दुसऱ्या एक जणाच्या पाठीवर ओझं टाकून उभा राहतो, उभा राहू शकतो. पत्त्यातली दोन पानं एकमेकांच्या पाठीला पाठ लावून उभी राहतात ना तसंच. रोग्यासाठी भाडोत्री नर्स ठेवणं या लोकांना शक्य नाही. आणि शक्य असतं तरी त्यांनी ठेवली नसती. एकेकाळी मला या आयुष्याची ओळख होती. आता पुन्हा ती ओळख झाली.

दबल्या स्वरात विचारलं, "मामी, उषा कुठाय?"

बिंदुमामी म्हणाली, "झोपली आहे. रात्रभर या खोलीतून त्या खोलीत धावपळ केल्यावर नुकताच थोड्या वेळापूर्वी तिचा डोळा लागला आहे. मी तिला उठवलं नाही. निजू देत. तिची कायमची झोप उडणार आहे."

बाहेर, बहुधा गल्लीच्या टोकाशी एक कुत्रं बराच वेळपासून जोरजोरात रडत होतं. बोटाने तिकडे निर्देश करून बिंदुमामी कुजबुजली, "ऐक, रोज रडत असतो. सकाळी, दुपारी, संध्याकाळी, रात्रीदेखील. मग अचानक दाराशी येऊन उभा राहतो. कुत्र्याचं रडणं फार अशुभ असतं. वाटतं, परिमल काही आता वाचणार नाही."

काय झालं कुणास ठाऊक, या बोलण्याने मला स्वतःविषयी अगदी तुच्छ व असहाय्य वाटू लागलं. मोठ्या प्रयासाने उठून उभा रहात आणि गळ्यात सारं बळ एकवटून मी

म्हणालो, ''वाचेल मामी! आपण वाचवू त्याला.''

माझं बोलणं बिंदुमामीला उमगलं नाही. ती टक लावून माझ्याकडे पहातच राहिली. मी म्हटलं, ''वाचेल मामी. आपण प्रयत्नांची शर्थ करू या, मामी—''

एकदा खाकरून आवाजातला सगळा संकोच नाहीसा करून मी म्हणालो, ''मामी, रागावू नकोस. माझ्याही हातात तसं काही फारसं नाही. मी हल्ली लखनौला रहातो ते तुला ठाऊकच आहे. हॉटेलसाठी माझा खूप खर्च झाला आहे. तरीदेखील परिमलच्या औषधपाण्यासाठी, फळं वगैरेसाठी थोडेफार पैसे देऊन जातो.

मी खिशात हात घालणार तोच बिंदुमामीने मला अडवलं. माझ्या बोलण्याचा तिच्यावर खूप परिणाम झाला होता. तिचे डोळे भरून आले होते. हात वर करून म्हणाली, ''थांब बाळ, माझ्यापाशी नको. पोरीपाशी दे. जे द्यायचं असेल ते तुझ्या हाताने तिला दे. आपण अगदीच एकटे नाही, सुखदःखात आपल्याबरोबर उभा राहणारा आपला एक मित्र आहे हे तिलाही कळू दे.''

बिंदुमामी धावत आत जायला निघाली. पण अचानक थबकली. चेहऱ्यावर काही रेषा उमटल्या. एकदा वळून माझ्याकडे पाहिलं. तिचा चेहरा मला स्पष्ट दिसत होता. मामीला काय सांगायचं होतं कुणास ठाऊक. पण शब्द तिच्या ओठांशी येऊन अडखळत होते.

बिंदुमामी परतून माझ्यापाशी आली. जितक्या जवळ येणं शक्य होतं तितक्या जवळ आली, ''सरसिज –''

(मामीने अगदी खालच्या आवाजात चौकशी केली)

''सरसिज, किती?''

ती काय विचारतेय ते अगोदर माझ्या लक्षात आलं नाही. नंतर जेव्हा बिंदुमामीने पुन्हा एकदा त्याच आवाजात विचारलं, ''किती?'' तेव्हा मला अर्थबोध झाला. ते कुत्रं अजूनही रडत होतं. पातळ कुडत्याच्या खिशातून एक नोट काढली. शंभराची. सांगणारच होतो की, ''मामी सध्या—''

बोलणं पुरतं झालंच नाही.

''शंभर?'' क्षणात बिंदुमामी बदलताना दिसली. ''सगळे तिला देणार बाळ? त्यापेक्षा नोट मोडून दे -- मी-मी- मला नाही काही देणार?''

आगीत ठेवलेल्या कागदासारखी बिंदुमामी हळूहळू हावरटपणा आणि मनःस्ताप यांनी चोळामोळा होऊ लागली. शंभर रुपये – हे शब्द जणू स्टीमरसारखे नदीच्या वक्षाचा छेद घेऊन रेघ मारीत निघून गेले. एकीकडे उषा, तिचं लहानसं घाणेरडं घर, मरणासन्न पती, अभाव, आसन्न, वैधव्य, दुसरीकडे बिंदुमामीचा स्वतःचा संसार–भाड्याचं ओझं, मुलींच्या फ्रॉकांचं कापड, रेशन – मायेपोटी ज्या संसाराचा बिंदुमामीला आतापर्यंत विसर पडला होता – दोघांचे एकदम स्पष्ट दोन तुकडे झाले.

* * *

'क्रोडपत्र' कथा - भिकारणीची ती कथा सापडली असती तर तू काय केलं असतंस?'

''फाडून फेकून दिली असती.''

तो म्हणाला, ''हं!'' मग बराच वेळ गप्प राहिला. त्याच्या चेहऱ्यावरचं ते रहस्यमय हास्य मावळलं होतं. अखेर तो हळू हळू म्हणाला, ''सरसिज, तू फक्त बिंदुमामीला बघितलंस. कोठडीकडे बघितलं नाहीस? खरी किल्ली तर त्या कोठडीतच आहे. एक खाट टाकताच जी कोठडी भरून जाते त्या कोठडीत किती विशाल मन राहू शकतं? – हा हिशोब जर तुला लावता येत नसेल तर सरसिज तू ही कथा लिहायला सुरुवात करू नकोस.''

# झाड
## ज्योतिरिन्द्र नन्दी

एक झाड. खूप जुनं झाड. झाड सुंदर आहे की कुरूप कुणीही हा प्रश्न कधी विचारला नाही.

झाड स्वतःच्या मर्जीने उभं आहे. त्याला काही अर्थ आहे की नाही या बाबतीत कुणीही कधी डोकेफोड केली नाही.

लोक डोक्यावर आभाळ पाहातात, ढग पाहातात, पायाखाली धूळ पाहातात त्याचप्रमाणे डोळ्यांसमोर एक झाड उभं असलेलं बघतात. संध्याकाळी बघतात, दुपारी बघतात, सकाळी बघतात. डोळ्यांनी फक्त बघतात. अंतःकरणाने, अनुभूतीने नाही बघत, नाही समजत.

किंवा अशाप्रकारे एका झाडाला समजून घेतलं पाहिजे याची जाणीवच कधी कुणाला झाली नाही.

दिवसांमागून दिवस जातात. ऋतू बदलतात. वर्ष उलटतात – झाड आपल्या जागी उभं असतं.

पावसाळ्यात पानं मोठी होतात, तरारतात, शरद ऋतूत पानं जड होतात, जाड होतात. हिरवा रंग आणखी दाट होऊन काळ्या रंगाशी जवळीक साधू लागतो. हेमंतच्या मध्यास तोच हिरवा काळा दाट रंग अचानक करडा होतो. त्यानंतर थंडीत पिवळ्या फिक्कट रक्तहीन प्रसूतीचं पाण्डुर रूप धारण करून पानं झरझर खाली पडतात. झाड ओकं बोकं होतं.

तरीदेखील झाड झाडच रहातं.

झाडाचं रूप त्यावेळी फक्त लाकडाचं रूप असतं.

लहान लाकूड, मोठं लाकूड, लांब लाकूड, आखूड लाकूड, पातळ लाकूड, मोठं लाकूड, गुळगुळीत लाकूड – माणसाच्या बोटांसारख्या असंख्य लाकडांचा व काड्यांचा एक जबरदस्त सांगाडा होऊन उभं रहातं.

पण त्यामुळे काय माणूस झाडावर रागावतो? नाही. कारण मेघाच्छादित आकाशाखाली अरण्याचं रूप धारण करून झाड उभं असताना माणूस त्याकडे ज्या नजरेनं बघतो त्याच नजरेनं तो थंडीतल्या सुकलेल्या आकाशाखाली जाड बारीक लाकडांची चौकट डोक्यावर घेतलेल्या झाडाकडे बघतो. म्हणूनच तर मी म्हणत होतो की वरवरची नजर! हे काही अंतःकरणापासून बघणं वा समजणं नव्हे. तसं

असतं तर फाल्गुनातल्या लाल हिरव्या नव्या पालवीचा समारंभ पाहून माणूस नाचू लागला असता. नाहीतर उतरत्या वैशाखात असंख्य मंजिऱ्यांनी भरून आपल्या अद्‌भुत गुलाबी छटेने आकाश भारून टाकणाऱ्या झाडाकडे बघून तो आनंदाने ओरडला असता. पण असं कुणी करीत नाही, अजून कुणी केलेलं नाही.

दोनचार घरांमधील मोकळ्या रिकाम्या जागेत जर एखादं हिरवंगार डेरेदार झाड असेल तर आपली काही सोय होते एवढंच लोकांना समजतं. हे या घरातल्या लोकांना समजतं, त्या घरातल्या लोकांना समजतं, आजूबाजूच्या आणखी दोनतीन घरांचे लोकही थोडीफार सोय वसूल करण्यासाठी झाडापाशी येत रहातात यात शंकाच नाही. उदाहरणार्थ, सकाळच्या वेळी दोनचार प्रौढ व्यक्ती हातात वर्तमानपत्र घेऊन झाडाखाली जमतात आणि राजकारण, समाजकारण, अर्थव्यवस्था इत्यादींवर चर्चा करतात किंवा दुपारच्या वेळी झाडाखालच्या मखमली गालिच्यासारख्या हिरवळीवर पाय पसरून बसल्या बसल्या या घरातली म्हातारी, त्या घरातली म्हातारी, या घरातली सून, त्या घरातली लेक या सर्वजणी स्वैपाकपाणी, शिवणकाम, मुलं व्हायच्या, मुलं न व्हायंच्या अशा विविध विषयांवर गप्पा मारत वेळ घालवतात. संध्याकाळच्या वेळी मुलं अभ्यास टाकून धावत येतात. झाडाभोवती दंगामस्ती, गडबड गोंधळ, धावपळ, झाडावर चढणं, फांद्या तोडणं, पानं ओरबाडणं, नाहीतर झाडाला झोके बांधून झोके घेणं सारं काही करतात.

थंडीतल्या दुपारच्या वेळी कुणी कुणी डोकं झाडाच्या सावलीत करून सर्वांगावर ऊन खात एखादा कथासंग्रह वाचत असतात. उन्हाळ्यात रात्रीच्या वेळी याच झाडाखाली गार चटई अंथरून, कंदील लावून आळीतले पाचसहा जण पत्ते खेळताना दिसतात.

आणि ज्यावेळी झाडाखाली कुणीही माणूस नसतो त्यावेळी गायीगुरांचे, शेळ्यामेंढ्यांचे कळप माना खाली घालून आरामात गवत चरताना या झाडाखाली दिसतात.

वर नाना तऱ्हेच्या पक्ष्यांचा किलबिलाट, पंखांची फडफड, चोचीला चोच लावण्याचे आवाज येत असतात.

वाऱ्याने पानं हलत असतात, फांद्या डुलत असतात.

पण कधी कधी असंही होतं की पक्षी नसतात, वाराही नसतो. झाड स्थिर आणि स्तब्ध असतं. पोळलेल्या जमिनीवर आपली दाट सावली पसरीत झाड जणू अनंतकालाचा साक्षीदार होऊन युगायुगापासून निःस्संग उभं असतं. कधी ते एखादा तत्त्वज्ञानी असल्यासारखं वाटतं. मूकपणे अविचल राहून जगाकडे पहात उभं असतं. जगातील उत्थान पतनाची नोंद घेत असतं. पापाचा विजय आणि पुण्याचा पराजय पाहून विस्मित विमूढ होऊन जात असतं.

चिंतनशील मानव जसा मौन धारण करून असतो, त्याची जशी अवस्था असते

तशा मानवाच्या रूपात कधी कधी कल्पना करायला हरकत नाही. त्यावेळी त्याच्या आजूबाजूला अन्य माणसं, पशुपक्षी आणि वाऱ्याच्या गतीची कल्पनाच सहन होत नाही.

झाडाकडे कुणी या दृष्टीने बघितलं असण्याची, झाडाच्या बाबतीत असा विचार केला असण्याची शक्यता आहे. अजून तरी ते समजलेलं नाही, जाणता आलेलं नाही. कुणास ठाऊक, झाडासही अंतर्दृष्टी असेल. त्यानेही कदाचित ओळखलं असेल की पूर्वेकडच्या एका घराच्या हिरव्या खिडकीत बसलेली एक जणी गंभीरपणे त्याच्याकडे बघतेय. सुरुवातीला ती अन्य दहा जणांसारखीच अगदी साध्या नजरेनं झाडाच्या पानांचं खाली गळणं बघत असे, नव्या पालवीचं बहरणं बघत असे. पण आता तिची नजर तितकी साधी राहिलेली नाही. काजळ घातल्याने दाट काळी झाली आहे. आता ती वेण्या सोडून फ्रॉक फलकारीत हुंदडत नाही. घरासमोरच्या रिकाम्या जमिनीवर एखादं झाड उभं आहे की कळकाची काठी रोवलेली आहे याविषयी बेफिकीर रहात नाही, नुसती वरवर सगळीकडे पहात नाही. आता ती शांत आणि गंभीर झालेली आहे. केसांच्या घट्ट बांधलेल्या अंबाड्यासारखं तिचं मनदेखील घट्ट आणि बद्ध झालेलं आहे. आणि त्याच घट्ट मनाने व सतर्क दृष्टीने ती झाडाकडे पाहात असते. झाडाविषयी विचार करीत असते. पण विचार करता करता एक दिवस तिची दृष्टी कशी कुणास ठाऊक, भयभीत आणि व्याकुळ झाली. आता तिच्या डोळ्यातल्या बाहुल्या हलत नाहीत. दोन्ही काळी बुबुळं काचेसारखी स्थिर व कठीण झाली आहेत. तिला कुठल्या तरी भयंकर काळजीने ग्रासून टाकल्याचं झाडाने ओळखलं. काळजीमुळेच जणू तिच्या काळ्याभोर नजरेत निव्वळ भयच नव्हे तर द्वेषही मिसळला गेला आहे. झाड घाबरलं. त्याला दिसलं की फक्त दिवसा उजेडीच नव्हे, तर रात्रीच्या दाट अंधारातही ते डोळे खिडकीशी जागे आहेत. निराकार अस्पष्ट छायामूर्ती होऊन रात्रीच्या गहन काळोखात लपूनही झाडाला जणू त्या नजरेपासून स्वतःचा बचाव करता येत नसावा. भीतीबरोबरच तिरस्काराचा लोटही कुणी त्याच्याकडे ढकलत असावा.

त्यानंतर सर्व गोष्टींचा पत्ता लागला. हिरव्या खिडकीतल्या त्या स्त्रीने बहुधा सर्वांना सांगून टाकलं.

हे झाड दुष्ट आहे, हे झाड सैतान आहे. याला इथून काढून टाका.

आळीतले आजूबाजूचे लोक सावध झाले.

एखादं झाड माणसासारखं सैतान होऊन माणसांबरोबर राहू शकतं ही गोष्ट त्यांनी पहिल्यांदाच ऐकली. पहिल्यांदाच त्यांना समजली.

खरंच आहे ते! सर्वजण विचार करू लागले. म्हाताऱ्यांचा कंपू झाडाखाली बसून राजकारणावर चर्चा करतो, म्हाताऱ्या बायका तरुणींच्या बरोबर बसून पोराबाळांच्या गप्पा मारतात, मुलामुलींची टोळकी झाडापाशी जमून खेळतात, असलं झाड चांगलं

नसेल, जर त्याच्या आत दुष्ट बुद्धी लपलेली असेल तर मग–

तोडावंच लागेल, जाळून टाकावंच लागेल. मुळासकट उपटून टाकावं हे सर्वात उत्तम. पांढरी फुलं माळलेला मोठा अंबाडा घातलेली खिडकीतली ती बाई म्हणाली, ''हो, नाहीतर या झाडामुळे काय संकट ओढवेल ते सांगणं कठीण आहे.''

सगळ्यांनी ऐकलं, सगळ्यांना समजलं.

मुलं खेळतात. एखादी मोठी फांदी मोडून त्यांच्या डोक्यावर पडायला कितीसा वेळ लागणार? या झाडावर वीज कोसळण्याचीही शक्यता आहे. त्यावेळी याच्या खाली जो उभा असेल किंवा बसलेला असेल त्याला तत्क्षणी मृत्यू येणार हे निश्चित. झाडच वज्राला आमंत्रण देतं. सैतानाला अशक्य काय आहे? असलं बोलणं ऐकून लोकांचे डोळे उघडले.

पण हिरव्या खिडकीतली ती बाई गप्प बसली नाही. झाडाच्या बाबतीत आजवर ज्यांनी फारसा विचार केला नव्हता. त्यांनी आणखी भयंकर गोष्ट ऐकली.

फक्त वज्रच कशाला, सैतानदेखील मध्यरात्री वाटेल त्या माणसाला आपल्यापाशी बोलावू शकतो.

हं, मग सकाळी उठल्यावर लोकांना दिसेल की तो माणूस त्याच झाडाच्या कुठल्याशा फांदीला लोंबकळत आहे.

गळ्याला फास लावून घेण्यासाठी झाड फारच उत्तम आहे ही गोष्ट नव्याने लोकांच्या लक्षात आली.

हे झाड जाळून टाकायला हवं. तोडून टाकायला हवं. शक्य तर मुळासकट.

पडीत जमिनीच्या पश्चिमेकडील आणखी एका वाड्याच्या लाल रंगाच्या खिडकीत बसलेला दुसरा एक माणूस झाडाकडे गंभीरपणे पहात असल्याचा कदाचित झाडाला पत्ता नसावा. तिकडे नजर जाताच झाड दचकलं आणि खूषही झालं. लाल रंगाच्या खिडकीतल्या माणसाचे डोळे सुंदर होते. त्या डोळ्यांत भय, द्वेष, तिरस्कार काहीसुद्धा नव्हतं. फक्त स्नेह, माया, प्रेम, सहानुभूती होती. ते बघून झाड थक्क झालं. कारण काही दिवसांपूर्वीपर्यंत या माणसाचे डोळे अस्थिर होते, बोलण्यात चंचलता होती. हाफ पॅन्ट नेसून वेळी अवेळी तो त्याच्यापाशी धावत यायचा, फांद्या व पानावर नेम धरून खडे मारायचा, पानांआड दडलेली चिमण्यांची घरटी शोधून ती मोडायचा आणि मन मानेल तेव्हा झोका बांधून झोके घ्यायचा. आज तोच सुसंस्कृत व सभ्य झाला आहे, प्रेमळ व सुंदर! कुडत्याच्या बाह्या कोपरांपर्यंत मुडपून तळहातावर हनुवटी टेकून खिडकीलगतच्या टेबलाशी बसून तो एकटक झाडाकडे पहात असतो. विचार करता करता टेबलावरच्या पुष्पपात्रातून गुलाबाचं एक फूल काढून नाकाशी धरून हुंगत असतो. जणू तो झाडाविषयी जितका विचार करतो, झाडाकडे जितकं पाहतो, तितकं त्याला समाधान वाटतं, आनंद वाटतो. जणू झाडाचा विचार करण्याशी गुलाबाचाही काही संबंध असावा.

झाड कदाचित त्याला गुलाबासारखं सुंदर भासत असावं.

झाड निश्चिंत झालं, आश्वस्त झालं. लाल खिडकीतल्या माणसाच्या तोंडून लोकांनी दुसरंच काही ऐकलं.

हे झाड देवाच्या आशीर्वादासारखं आमच्यात उभं आहे. हे जिवंत ठेवायलाच हवं. याच्या खाली सकाळ – संध्याकाळ लोक जमतात. लोकांची मनं एकमेकांशी जुळवण्याच्या कामी हे झाड मदत करतं. म्हणजेच हे आपल्याला सामाजिक व्हायला शिकवतं. झाड आहे म्हणूनच तर मुलं खेळू शकतात. मैदानातील ही वनस्पती मुलांवर आईसारखी माया करते, त्यांना सुखावते.

खरंच हे सुंदर आहे!

याची सावली सुंदर आहे, फांद्या सुंदर आहेत. म्हणून तर निर्व्याज सुंदर पक्ष्यांचे थवे याचा आश्रय घेऊन सतत कूजन व गुंजारव करीत असतात. फुलपाखरंही उडत याच्यापाशी येतात.

आळीतले लोक पुन्हा विचारात पडले.

पश्चिमेला लाल खिडकीतला माणूस एवढ्यावरच गप्प नाही बसला.

विटा, चुना, लोखंड, सिमेंट यांच्यामध्ये राहून राहून आपण कंटाळलो आहोत. एक हिरवंगार झाड दिसतंय म्हणून आपल्याला निसर्गाची जाणीव तरी राहिली आहे. या झाडाच्या कृपेनेच आपण संपूर्णपणे कृत्रिम, अनैसर्गिक बनलो नाही. हा या झाडाचाच प्रताप. आपल्या श्रान्त क्लान्त व विषादयुक्त जीवनात हे झाड एखाद्या कवितेसारखं आहे.

तो लाल खिडकीतला माणूस कवी आहे की काय? झाडाच्या मनात आलं. रात्री खिडकीलगतच्या टेबलाशी बसून तो माणूस कागदावर काय लिहीत असतो कुणास ठाऊक? नाहीतर मग चुपचाप बाहेर झाडाकडे बघत बसलेला दिसतो.

वाईट गोष्ट ऐकून लोक अस्वस्थ होतात तर चांगली गोष्ट ऐकून ते निश्चिंत होतात, आनंदित होतात.

म्हणूनच एकाने झाडाला दूषणे दिल्यावर ते जसे त्रस्त होऊन गेले होते तसेच दुसऱ्या एकाने झाडाची प्रशंसा केल्यावर ते शांत झाले.

म्हणून मग त्यांनी झाडाच्याबाबतीत फारशी डोकेफोड केली नाही.

पण पूर्वेकडच्या खिडकीतल्या बाईला गप्प बसवलं नाही. झाडाच्या कानावर आलं की आणखी कुणी जर मदत केली नाही तर आपण स्वतःच कुऱ्हाडीने झाड तोडून टाकू अशी तिने प्रतिज्ञा केली आहे. तिला ते झाड बघवत नव्हतं. असह्य होत होतं. काही झालं तरी या सैतानाला आपल्या नजरेसमोरून दूर करायचा ठाम निश्चय तिने केला आहे.

हे ऐकून झाडाला वाईट वाटलं. तरी पण ते मनातल्या मनात हसलं. जणू पूर्वेकडच्या खिडकीतल्या त्या बाईला त्याला सांगायचं होतं – तुझ्या केसात फुलांचा

गजरा माळलेला आहे, तुझ्या डोळ्यात काजळ रेखलेलं आहे, कपाळावरचं कुंकू किती शोभून दिसतंय, तुझ्या हाताची बोटं चाफेकळीसारखी आहेत, सुंदर आणि कोमल. या हातांनी काय कुऱ्हाड धरता येणार आहे?

ही गोष्ट जणू पश्चिमेकडच्या खिडकीतल्या माणसाच्या कानावरही गेली. त्याची सुंदर बोटं कठोर झाली. झाडाला चांगलं ठाऊक आहे की वेळप्रसंग ते हात व त्यां हातांची बोटं पोलादासारखी कठीण व तीक्ष्ण होऊ शकतात. आणि त्या हातांनी तो कविता लिहीत असला, गुलाब कुरवाळीत असला तरी त्याच हातांनी एके काळी दगड मारून त्याने कितीतरी पक्ष्यांची घरटी उध्वस्त केली आहे, झाडाच्या फांद्या तोडल्या आहेत, पानं ओरबाडली आहेत आणि रुद्रासारख्या हाताच्या मुठी घट्ट मिटून झोक्याचे दोर धरून दानवशिशुवत् झोके घेतले आहेत. म्हणूनच असेल कदाचित, आज त्याने शून्यात आपली वज्र मूठ वळून प्रतिज्ञा केली आहे की वाटेल ते करून झाड वाचवायचंच. जर कुणी हे झाड नाहीसं करायला आलं तर त्याला तो क्षमा करणार नाही. जीवनातून कवितेला हाकलून देता येणार नाही. जर कुणी या झाडाला हात लावायला आलं तर आपल्या रक्ताचा शेवटचा थेंब सांडूनही तो त्याला परास्त करील. झाडाला झळ लागू देणार नाही.

झाडाला पुन्हा भीती वाटू लागली. आपल्यापायी पूर्व आणि पश्चिमेच्या खिडकीतल्या दोन व्यक्तीमध्ये संघर्ष तर नाही होणार?

त्या दिवशी दुपार होऊन गेली होती. दोन पिल्लांना बरोबर घेऊन एक शेळी झाडाच्या सावलीत गवत चरत राहिली. संध्याकाळ होताच मुलं दंगामस्ती करीत राहिली. असंख्य पक्ष्यांच्या गुंजारवानंतर सगळं शांत झालं. रात्र झाली. स्वच्छ आभाळात अगणित तारे लुकलुकू लागले. वारा वहात होता. झाडाची पानं रोजच्यासारखी सळसळत होती. मैदानाजवळच्या आळीतल्या घरांतून तऱ्हेतऱ्हेचे आवाज येत होते, दिवे लागले होते. हळूहळू रात्र जसजशी वाढू लागली तसतशी एकेक घरं निद्राधीन होऊ लागली, दिवे मालवत गेले. त्यानंतर चहूकडे अनंत अंधार पसरला. अंधार आणि अतूट निस्तब्धता. मस्तकावर असंख्य तारे घेऊन झाड चुपचाप उभं होतं. मग वाराही थांबला. झाडाचं एकही पान हलेनासं झालं.

नेमक्या त्याच वेळी.

घनदाट अंधारातही झाडाला दिवसाच्या उजेडासारखंच सगळं स्पष्ट दिसतं. झाडानं पाहिलं की ती पूर्वेकडून येत आहे. पदर कमरेला घट्ट खोचलेला आहे. केसातून फुलं फेकून दिली आहेत. जणू युद्धालाच येत असावी. हातात यावेळी फुलांची माळ नव्हे तर धारदार कुऱ्हाड आहे. झाड शहारलं.

पण त्याचबरोबर दुसरीकडून आणखी कुणाची चाहूल लागली. झाडाने तिकडे नजर वळवली. आता झाड निश्चिंत झालं. तो आला आहे. पश्चिमेच्या खिडकीतला तो माणूस आला आहे. आता त्याच्या हातात लेखणी नाही, एक काठी आहे. अंगावर

कुडता नाही, तर बिनबाह्यांचा गंजीफ्रॉक आहे. त्याचे ओठ घट्ट मिटलेले आहेत. दृष्टी कठोर आहे. जणू आता तो वज्राचा हुंकार करणार आहे.

झाड कान देऊन उभं राहिलं.

विषण्ण स्तब्धता. अनिश्चित वेळ.

झाडाच्या डोक्यावर चिमणीचं एक पिल्लू चिवचिवलं. जणू कुठून तरी कुठल्याशा अनामिक फुलाचा सुवास दरवळत आला, आणि आकाशातल्या ताऱ्यापाशी उडून गेला. वाऱ्याची झुळूकही आली. कोवळ्या फांद्या डोलू लागल्या.

झाड जणू मनातल्या मनात याचीच अपेक्षा करीत असावं म्हणून त्याला काही विशेष आश्चर्य वाटलं नाही.

साडी नेसलेल्या बाईच्या ओठांवर हास्य तरळलं.

पश्चिमेच्या खिडकीतल्या माणसाचा चेहराही किंचित खुलला. वज्रघोष ऐकू आला नाही.

ते एकमेकांकडे बघू लागले. दोघांमधलं अंतर इतकं कमी आहे की दाट अंधःकारातही त्यांना एकमेकांचा चेहरा नीट दिसू शकतोय. जणू एकमेकांच्या श्वासांचा आवाजही त्यांना ऐकू येतोय.

''हातात ही कुऱ्हाड कशासाठी?''

''हे झाड तोडण्यासाठी.''

''काय फायदा?''

''हे झाड सैतान आहे.''

''हे झाड देव आहे.''

''सैतानाला जो देव समजतो तो मूर्ख असतो.''

''देवाला जो सैतान समजतो तो पापी असतो. त्याच्या मनात पाप असतं, अंतःकरणात हिंसा असते. म्हणूनच मी काळा दिसतोय – उजेड असूनही त्याच्या नजरेत सगळं अंधारी असतं.''

''तर मग जगात अंधार नावाचं काही नाही? काळं म्हणता येईल असं काही नाही?''

''नाही.''

''हे कसं शक्य आहे?'' तिच्या हातातून कुऱ्हाड खाली ओघळली. ती विचार करू लागली. झाडाला आनंद झाला. एकाने कुऱ्हाड टाकून दिल्याचं आणि दुसऱ्याने काठी फेकून दिल्याचं झाडाला दिसलं. हे कसं शक्य आहे? विचार करता करता पूर्वेकडच्या खिडकीतली महिला झाडाच्या पानांमधून झिरपणाऱ्या चांदण्यांच्या प्रकाशाकडे बघू लागली. मग थोड्या वेळाने पुटपुटली, ''सर्वत्र उजेड आहे, सारं काही सुंदर आहे, काही सुद्धा काळं नाही, अंधार नाही – असं कधी होत असतं?''

''हो. आपल्या मनात उजेड असेल तर.''

''हा उजेड कसला?''

'प्रेमाचा.''

मुलीच्या पापण्या थरारल्या. तिने एक उसासा सोडला. तिचा स्वर करुण झाला.

''माझ्या मनात प्रेम प्रज्वलित होणं शक्य नाही का?''

''प्रयास करावा लागेल, चर्चा करावी लागेल.'' मुलगा गोड हसला. 'प्रेम करायला शिकावं लागेल.''

''तुम्ही शिकवा ना मला.''

झाडाने डोळे मिटून घेतले. त्याला झोप येऊ लागली. झाडंही झोपतात. काळजीमुळे झोपेशिवायच त्याने किती रात्री जागून काढल्या होत्या. किंवा त्याने मुद्दामच खाली बघायचं टाळलं. माणूस जसा झाडाच्या बाबतीत उदासीन राहतो तसं झाडालाही मधून मधून माणसाच्या बाबतीत उदासीन रहावं लागतं ही गोष्ट झाडाला सांगावी लागली नाही.

# हृदयाची तहान

**समरेश बसु**

कृष्णपक्षातल्या एक अशुभ रात्रीची गोष्ट सांगतो.

हा अशुभ योग अचानक ढग भरून आल्यासारखा आणि विजा कडाडून मुसळधार पावसाच्या एकदोन सरी कोसळण्यासारखा नव्हता. रोगी घशातील एकसुरी क्रन्दनासारखं गेले कित्येक दिवसांपासून पावसाची संततधार लागली होती. जोडीला पूर्वेकडचा वादळी वाराही वाहात होता. शहरातला मोठा रस्ता वगळता सर्व कच्चे रस्ते, गल्लीबोळ चिखलाने भरून गेले होते. सर्वत्र घाण साचली होती. दुर्गंधी सुटली होती. असंख्य घरांमधून ठासलेली आणि घामट गर्दी होती.

मी रेल्वे लाइनच्या जवळून मैदानातील पायवाटेवरून चाललो होतो. पण अंगात नावालासुद्धा उष्णता उरली नव्हती. मैदानावरून येणाऱ्या सोसाट्याच्या वाऱ्याने अंग थरथरत होतं. दात सारखे वाजत होते. निरुपायाने डावीकडे वळून मी शहरात शिरलो. निदान वाऱ्याच्या तडाख्यातून तरी सुटका होईल.

चटकल (ज्यूट मिल) चं शहर निस्तब्ध पेंगत होतं. जणू त्याच्या सगळ्या हालचालींचं आणि चैतन्याचं या अभूतपूर्व पावसाच्या झडीने पोतेरं करून टाकलं होतं. दुसरा एखादा दिवस असता तर कुत्री अंगावर भुंकू लागली असती. पण आज कर्तव्य पुरं केल्यासारखं एकदाच जरा गुरकावून अंगावरून पाणी झाडू लागले. माणसांचा कुठे थांगपत्ता दिसत नव्हता. एकाही दारातून वा खिडकीतून प्रकाशाची साधी तिरीप येत नव्हती. रस्त्यावरचे दिवे एखाद्या चकण्या एकाक्षाप्रमाणे स्तिमित होऊन एकाच डोळ्याने बघत होते, पण त्यामुळे अंधार अजिबात कमी होत नव्हता.

वाट नीट कळत नव्हती तरी उत्तरेकडे जात असल्याचं लक्षात येत होतं. रस्त्याच्या एका कडेने चाललो होतो. रस्ता खालच्या पातळीवर होता. पाणी साचलं होतं. एखाद्या ओसरीवर चढून रात्र घालवावी म्हटलं तर तेही शक्य नव्हतं. कारण ओसरी म्हणता येईल अशी काही जागा कुठे दिसत नव्हती आणि वस्तीची स्थिती बघून आतल्या खोल्याही कदाचित कोरड्या नसतील असं वाटत होतं. हे सर्व काही नवं नव्हतं. त्यातून तिथं झोपल्यास लोक काहीबाही बोलतात हे सर्वांना ठाऊक आहे. पोलिसांचा ससेमिराही भरीला असतोच.

नौहाटीच्या रेल्वे कॉलनीतल्या एका मित्राकडे मला जायचं होतं. निदान काही दिवसांची पोटाची सोय होईल, एक कोरडं धोतर आणि या अशा घोर थंडगार

ओल्या रात्री निवारा तरी नक्कीच मिळेल. पण आता वाटत होतं की अड्डा सोडून निघायला नको होतं. पण दुसरा काही उपायदेखील नव्हता. काही दिवसांपूर्वी आमच्या अड्ड्यावर भुकेमुळे एक माणूस मरण पावला होता तेव्हापासून विशेष करून माझ्या मनात सारखा विचार घोळू लागला होता की जरा सुटकेचा श्वास घेण्यासाठी इथून बाहेर पडावं. मित्राचा मृत्यू बहुधा पथ्यावरच पडला. याखेरीज आणखी काय शक्य होतं, मला तरी काहीच उमजत नव्हतं. जगण्यासाठी जे काही हवं असतं त्यापैकी काहीसुद्धा त्याच्यापाशी नव्हतं. तरीदेखील अंतःकरणात ---जाऊ दे. काय ठेवलंय या बोलण्यात. पण तरीदेखील तो मला एक गोष्ट देऊन गेला आहे. लहानशीच, पण पहाडासारखी अवजड आणि त्रासदायक वाटत आहे. ओझंच आहे---.

बाप रे बाप, वारा जणू सगळी हाडं कडकडा वाजवून गेला. पाण्याचा जोरही अचानक वाढला. इतक्या वेळानंतर आता ढगांचा गडगडाट ऐकू येऊ लागला आहे. आता नुसते दातच नव्हे, तर हाडंदेखील करकरा वाजत आहेत. झाडाच्या वठलेल्या फांदीसारखा भिजून निर्जीव झालो आहे. एका चौकाच्या वळणापाशी येऊन ठेपलो. चटकलचा माल चढवणाऱ्या रेल्वे साइडिंगच्या बाजूला पोचलो. जागा जरा मोकळी आहे. जवळच म्हशींचा एक गोठा दिसला. आत जावं की नाही हा विचार करीत पुढे चालू लागताच अचानक एक हाक ऐकू आली. ''अरे, इकडे, या बाजूला.''

छे, भुताटकीवर माझा विश्वास नाही. तरीदेखील दचकलो. मला हाक मारली? पाण्याचा पडदा भेदून त्या आवाजाच्या मालकाला शोधू लागलो. उजवीकडे एक अंधुक प्रकाशरेषा दिसली आणि अर्धवट मिटलेल्या दारात एक व्यक्ती. होय, एक बाई! तर मग मला नसेल हाक मारली. पुढे जावं झालं. पुन्हा हाक आली, ''काय हो, या ना!''

थांबलो. विचारलं, ''मला हाक मारली?''

उत्तर आलं, ''या अवेळी रस्त्यावर दुसरं कुणी आहेच कुठं?''

बोलायची रीत बघून मी दचकलो, अरेच्या! इतक्या वेळानंतर लक्षात आलं की हा रस्ता वाईट आहे. वेश्यांची वस्ती नसली तरी तसंच काहीसं आहे. आजूबाजूला मजूर वस्ती खेटून उभी आहे.

मनातल्या मनात मी हसलो. चांगलं गिऱ्हाईक पकडलं आहे या बाईने! तिला तसंच वाटत असावं. पण खरंच, या वेळी हिच्या दाराशी थोडा वेळ थांबता आलं असतं तर? मी हललो नाही, ते पाहून ती बाई पुन्हा म्हणाली, 'हे काय? या माणसाला दिसत नाही की काय?''

मनात हसत विचार केला, ''काय हरकत आहे जायला? सगळं नीट पाहून झाल्यावर ती स्वतःच घालवून देईल. आणि पाण्याचा जोर जरा कमी होईपर्यंत कुठे आडोशाला उभं राहता आलं तर त्यात वाईट काय? नाही तरी नौहाटी सोडाच

म्हशींच्या गोठ्यापुढे जायलाही जमणार नाही. शहाणी माणसं कधी अशा परिस्थितीत सापडतच नाहीत.

मी त्या बाईच्या दारी जाऊन पोचतो. मन परंपरागत संस्कारांमुळे संकोचून गेलं होतं. विचारलं, ''कशाला बोलावलंस?''

''वेडपट कुठला,'' आनंद आणि वैताग अशा संमिश्र भावनांनी ती म्हणाली, ''आत ये ना.''

मी आत शिरताच तिने दार लावून घेतलं. पाण्याचा जोर किंचित कमी झाला. वारं आत यायला कुठेही वाट नव्हती, पण जमिनीच्या विटांमधून पाणी येऊन सगळी खोली भिजलेली दिसली. तक्तपोसावरचा बिछाना अजून ओला नव्हता झाला. खोलीत दोनचार मामुली वस्तू आहेत, ताट, ग्लास, माठ. ''या अवेळी कुठं मरायला निघाला होतास?'' मी तिच्या खूप जुन्या ओळखीचा माणूस असल्यागत ती बोलली.

''दूर, खूप दूर, पण –''

''समजलं,'' ती तोंड वेडावून हसली. ''साऱ्या खोलीत चिखल करून टाकलास बघ. ''आता लवकर काढ कपडे.''

थंडीमुळे आणि या नसत्या घोटाळ्यामुळे आता आपण पार गोठून जाणार असं मला वाटत होतं. म्हणालो, ''पण इकडे–''

ती म्हणाली, ''आता नेसायला काय देऊ माझं डोस्कं? ओला कुडता काढून टाक की.''

काढता आला असता तर छानच होतं. पण -- आवाजात जरा दम भरून म्हणालो, ''उगाच बोलावलंस मला. माझ्या खिशात काहीसुद्धा नाही.''

ती बाई थबकली. मला वाटलं होतं तेच झालं. ती थोडा वेळ डोळे विस्फारून माझ्याकडे बघत राहिली जणू विश्वास बसत नसावा. विचारलं, ''काहीसुद्धा नाही?''

क्षणार्धात सगळ्या आशा मावळल्याचा भाव तिच्या चेहऱ्यावर होता.

म्हटलं, ''असतं तर या अवेळी असा बाहेर पडलो असतो?''

असहाय्य झाल्यासारखी ती बाई गप्प बसली. हे असं होणार याची मला अगोदरच कल्पना होती. पण ही बाई धंदा करायला बसली आहे की भीक मागायला? मी दाराकडे निघालो.

तिने मागून विचारलं, ''कुठं जाणार यावेळी?''

उत्तर दिलं, ''त्या म्हशींच्या गोठ्यापाशी.'' दार उघडलं.

देवा रे, वारा जणू आ वासून गिळून टाकायला आला. पाय बाहेर टाकणार तेवढ्यात त्या बाईने मागून हाक मारली, ''आता बोलावलंच आहे, तर रहा रात्रीचा इथं.'' मग एक उसासा सोडून म्हणाली, ''माझं मेलीचं नशीबच वाईट!''

म्हणालो, ''तुझं नशीब चांगलं राहो. मी जातो आपला म्हशींच्या गोठ्यावर.''

''जशी मर्जी.'' ती हताश होऊन तक्तावर बसली, ''आज आता कसली आशा नाही.''

विचार केला, वाईट काय आहे? या अवेळी असा आसरा मिळतोय तर का सोडा? पण बाईसंगे रात्र घालवायची कल्पना मनाला पटत नव्हती. कारण माझ्यासाठी हे सर्व नवीन होतं. खरं तर बायकांच्या बाबतीतलं माझं कुतूहल व उत्सुकता तुम्हा सर्वांपेक्षा कदाचित जास्तच असावी. म्हणून काय झालं या इथं? शी! हे नाही बुवा जमणार आपल्याला. पण तिच्याबरोबर न झोपतादेखील रात्र घालवणं शक्य आहे की! आत शिरून मी पुन्हा दार लावून घेतलं.

उंच, एकेरी शरीरयष्टी आहे. गव्हाळ वर्ण आहे. गाल बसके आहेत. डोळे ताजा चारा शोधणाऱ्या गायीसारखे शांत निश्चल आहेत. डोळ्यांत काजळ रेखलेलं आहे. चेहऱ्यावर रंग - रंगोटी केलेली आहे. ओठ जाड आहेत. नाकाचा शेंडा वर उचललेला आहे.

इकडे तिकडे शोधून तिने मला परकरासारखं एक जुनं वस्त्र नेसायला दिलं, म्हणाली, ''या खेरीज दुसरं काही नाही.''

ते वस्त्र बघून मला हसू आलं. इथं कोण बघतंय? पण–

माझ्या उरात धस्स झालं. गडबडून मी खिसा घट्ट दाबून धरला. मरताना माझ्या मित्राने ज्या एका लहानशा वस्तूचं पहाडाइतकं ओझं माझ्यावर टाकलं ती मी चाचपून पाहिली. वस्तू काय आहे तर रक्ताचं एक लहानसं ढेकूळ आहे. हो, रक्ताचं ढेकूळ. मनात संशय आला. तीक्ष्ण दृष्टीने बाईला न्याहाळलं. त्यावेळी ती पाठ वळवून ब्लाऊजच्या आतली चोळी काढत होती. म्हणालो, ''पण माझ्यापाशी काही नाही, सांगून ठेवतो.''

''कितीदा सांगशील?'' तिने हताश होऊन म्हटलं.

म्हणालो, ''अगोदर सांगून ठेवलं म्हणजे बरं असतं. शिवाय मला त्याची काही खास इच्छाही नाही. फक्त एका रात्रीचा विसावा घ्यायचा होता.''

बाईने एकवार गायीसारख्या नजरेनं माझ्याकडे पाहिलं. म्हणाली, ''मी कुठं तुला कसली शपथ घालतेय?''

हे ठीक आहे. मी ते वस्त्र नेसलो. पण उघडा देह आणखीनच थरथरू लागला. बाहेर वाऱ्याचा व पावसाचा धुमाकूळ चालूच होता.

बाईने माझ्याकडे पाहिलं. पदर तोंडाला लावून ती हसली. मग एका जुन्या साडीचा बोळा माझ्याकडे टाकत म्हणाली, ''घे, ही गुंडाळून झोप जा.''

माझा कुडता व धोतर तिने दोरीवर वाळत घातलं. म्हणाली, ''थोड्या वेळात जरा सुकतील.''

आराम मोठा वाईट. तो देखील या अशा जीवघेण्या परिस्थितीला तर फारच वाईट. आपण एका बाजारी बाईच्या घरात असल्याचा मला जवळ जवळ विसरच

पडला. म्हणालो, "दोन दिवसांपासून उपाशी आहे म्हणून पावसाने इतका बेजार झालो."

ती काहीच बोलली नाही. गुडघ्यांवर डोकं ठेवून तशीच बसून राहिली. म्हणालो, "झोपू या."

तिने मान वर केली. चेहऱ्यावर व्यथा होती, कातरता होती. श्वासाबरोबरच तिच्या फासळ्यांची हाडं वरखाली होताना दिसत होती. म्हणाली, "काही खाणार? भात आहे थोडासा."

भात? याची तर स्वप्नातही कल्पना नव्हती. भाताच्या नुसत्या वासाने ज्याचं निम्मं पोट भरतं त्याच्यासमोर प्रत्यक्ष भात? जिभेला पाणी सुटलं आणि पोट जणू वेगळाच प्राणी असावा. भाताचं नाव ऐकताच आत भयंकर खळबळ माजली. पण –

दरम्यान ती कल्हईच्या ताटात भात वाढू लागली. पाहून माझ्या मनातला संशय आणखी दाट झाला. मी घाईघाईने दोरीवरचा माझा कुडता ओढून घेतला. लक्षण काही ठीक दिसत नाही. घाबरून म्हणालो, "पण माझ्यापाशी भाताचे पैसेबिसे नाहीत."

गायीसारख्या डोळ्यांत यावेळी वैताग दिसला. म्हणाली, "म्हशींचा गोठाच तुझ्यासाठी योग्य आहे असं वाटतं. कितीदा तेच तेच सांगशील?"

सुखाऐवजी स्वस्थता जास्त चांगली असते. तो दुर्दैवी मरताना जी वस्तू देऊन गेला ती घेऊन चालणं आता कठीण झालं. ठेवावी म्हटलं तरी संकट, सोडावी तरी संकट बाहेर पडलो असतो तर कदाचित त्या ओझ्याची आठवणसुद्धा झाली नसती. ती पुन्हा म्हणाली, "कधी माणसांत राहिलाच नाहीस की काय?"

घ्या, आणखी ऐका! हे विचारतंय कोण तर कारखाना बाजारातली एक बाई! म्हणालो, "राहिलो आहे. पण तुझ्यासारख्या माणसांमध्ये नाही."

ती थोडा वेळ चुपचाप माझ्याकडे पहात राहिली. त्यानंतर म्हणाली, "वाढलंय तर खाऊन घे. नाहीतर वाया जाईल." विचार केला, यात कसली अडचण आहे? फुकटचा भात आणि बघतंय तरी कोण इथं? कुडता हातात दाबून अधाशासारखा भात खाऊन टाकला. वरून तांब्याभर पाणी प्यालो. असा आयता वाढलेला भात मला ती बाबूगिरी वाटली आणि म्हणूनच मनात संशय वाटत राहिला.

त्यानंतर झोपायचं. तीही एक मोठी आपत्तीच होती. मी आडवा होत विचारलं, "तू कुठे झोपणार?"

काही न बोलता माझ्याकडे पहात तिने डोक्यावरचा पदर जरा ठीकठाक केला. "तर मग तू झोप. मी बसल्या बसल्या रात्र घालवीन." मी म्हणालो.

पायांपाशी बसून ती म्हणाली, "तू झोप. माझं काय, मी रोजच झोपते. एका रात्रीचाच तर प्रश्न आहे. बोलावलंच आहे तर--- "

बोलता बोलता माझ्या हातात कुडता धरलेला पाहून तिने दोरीकडे पाहिलं. मग

माझ्याकडे पाहिलं. मीदेखील बघतच होतो. म्हणाली, ''कुडता ओला आहे.''

''ओला आहे तर त्याचं तुला काय?''

ती गप्प झाली. शरीराला आराम मिळताच, एरवी गार पडलेल्या संवेदना आपल्या नैसर्गिक स्वरूपात पुन्हा सतेज व गरम झाल्याचं मला जाणवलं. बाहेरचं वादळ व पाऊस इतका वेळ माझा जीव घेत होता. त्याचाच दबलेला अस्फुट स्वर आता मला अंगाई गीतासारखा गोड वाटू लागला. पापण्या जड होऊ लागल्या.

तिच्याकडे बघितलं. ती अजून तशीच बसलेली होती. ती कुणीकडे बघतेय ते समजत नव्हतं. तिच्या डोळ्यात थकवा आणि खोल वेदनेचा आभास होता. कुणी सांगावं? या बायकांचे नखरे काही कमी नसतात. मला झोप येऊ लागली होती -

छे, त्या मेल्याच्या या वस्तूचा उद्याच्या उद्या काही ना काही बंदोबस्त करायलाच हवा. ही वस्तू मरताना माझ्याच हाती द्यायची काय गरज होती त्याला? घामाचा वास येणारी एक लहानशी पुरचुंडी. याला राक्षसी भुकेचा वासही आहे. त्या मुलाने मरताना अखेरच्या वेळी तोंडातून वाहणाऱ्या कडवट रक्ताचा घोट गिळून म्हटलं होतं, ''ही तू ठेवून घे.''

ही गोष्ट तो अशा तऱ्हेने बोलला होता की अजूनही त्याची आठवण होताच छातीत–जाऊ दे, झालं

त्या बाईला अजून तशीच बसलेली पाहून मी अचानक म्हणालो, ''तूदेखील जरा सरकून झोप की.''

ती थोडा वेळ माझ्या चेहऱ्याकडे टक लावून पहात राहिली. मग म्हणाली, ''अगदी जगावेगळा आहेस तू.''

त्यानंतर तीही निजली.

आरामामुळे माझं शरीर तोवर पार शिथिल झालं होतं. आणि स्त्रीचा देह किती उष्ण असतो हे ती बाई जरा दूर असूनही मला समजत होतं. किती अजब रात्र होती. किती विलक्षण वातावरण होतं. कुणी पाहिलं असतं तर काय म्हटलं असतं. शी, शी! पण इतका आराम, या दुःखीकष्टी व थकल्याभागल्या शरीराला सुखाची इतकी जाणीव यापूर्वी कधी झाल्याचं आठवण नाही. झोपेने डोळे मिटत चालले होते. पण-

छे, हे शक्य नाही. त्या मित्राच्याच बाबतीत बोलतोय. मेला मरताना पुरचुंडी देऊन म्हणाला, ''माझं रक्त.''

विचारलं, ''कसलं रक्त?''

अश्रू आणि कडू रक्त पुसून म्हणाला, ''माझ्या छातीचं. रोज रोज उपाशी राहून–''

बोलता बोलता तो रक्तहीन कापऱ्या बोटांनी पुरचुंडी चाचपू लागला.

मला राग आवरला नाही. म्हणालो, ''हे कुणासाठी?''

''घरसंसार मांडायच्या आशेपायी–''

त्याला पुन्हा चार शब्द सुनावणार होतो, पण त्याच्याकडे बघताच माझ्या गळ्यात ---

असो. जाऊ दे ते.

ती बाई मध्येच कसल्याशा व्यथेने कण्हली.

विचारलं, ''काय झालं?''

ती टक लावून बघू लागली. डोळे जणू दुखण्यामुळे लाल झाले असावेत आणि डोळ्यात आसवं दाटून आली असावीत. म्हणाली, ''काही नाही.''

तिच्या उष्ण श्वासांनी माझ्या शरीराला आराम वाटत होता. जणू गार आणि गारठलेल्या शरीराला कुणीतरी ऊब देऊन गोंजारत होतं. अचानक लक्षात आलं, दिसायला काही फार वाईट नाही. ओठ आणि नाक जरा वाईट आहे. मिटलेले डोळे, छातीवर ठेवलेले हात, आणि तिच्या झुकलेल्या छातींनी एक विचित्र मायावी जग निर्माण केलं. तिने विचारलं, ''झोप नाही का येत?''

''मला झोपायचं नाही,'' मी म्हणालो. मनात विचार केला, मी झोपलो तर तुझी किती गैरसोय होईल नाही? खरं ना? ते शक्य नाही. बोलू लागताच माझा संशय बळावतो. त्यापेक्षा गप्प राहणंच चांगलं.

बाहेर अजूनही तांडव चालूच होतं. कौलांवरून खाली जमिनीवर ओघळणाऱ्या पाण्याचा आवाज ऐकू येत होता. चिचुंद्रीची ची ची पण ऐकू येत होती.

ती पुन्हा कण्हली.

''काय झालं?''

थोडं थांबून ती म्हणाली, ''दुखणं.''

''दुखणं? कसलं दुखणं?''

ती गप्प.

''सांग ना.''

तरीसुद्धा गप्पच.

मी अचानक चिडलो. ''सांगत का नाहीस कसलं दुखणं आहे ते? क्षय नाहीतर पटकीबिटकी असेल तर मी चटपट जातो इथून. मला काही दुखण्याचं प्रेम नाही.''

तीदेखील अचानक तोंड वेंगाडून म्हणाली, ''मग कशावर तुझं प्रेम आहे सांग बघू.''

खरं आहे. इथं प्रेमाचा प्रश्नच येत नाही. म्हणालो,

''बरं, सांग बघू काय दुखणं आहे?''

''या धंद्यात राहिल्याने होतं तेच.'' ती म्हणाली.

धंद्यात राहिल्याने? मेलोच! पार गडबडून गेलो. भीती आणि तिरस्काराने विचारलं, ''तरीसुद्धा संध्याकाळपासूनच–''

''का नाही?''

''पाच जण,'' ती म्हणाली.

छे, छे किती भयंकर गोष्ट आहे. विचारलं, ''इलाज का नाही करीत?''

''पैसे कुठून आणू?''

''का? धंद्यातलेच.''

''ते तर मालकाचे पैसे असतात.''

''मालक? ही काय नोकरी आहे?''

''नाहीतर काय? मालकाचा पैसा. घरदार, सामानसुमान. आम्ही फक्त कष्ट करायला येतो.''

तिचं बोलणं ऐकून मला मोठाच धक्का बसला. या बायका मजेत रहात नसतात तर? हीदेखील नोकरी आहे. म्हणालो, ''हा साला मालक तरी असा कसा? इलाज करवून घेत नाही?''

''त्याची मर्जी. कारखान्यातले कितीतरी मजूर रात्रंदिवस मरत असतात. कारखान्याचा मालक काय त्यांच्यावर इलाज करवतो?''

छान! तिच्या व्यथित व्याकुळ शान्त दृष्टीने आता मात्र मी खरंच भडकलो. रणांगणावर शिपाई प्राण देतो. पण आयुष्यातला हा कसला लढा? म्हणालो, ''तर मग---.''

ती म्हणाली, ''तर मग काय? मालकाच्या डोळ्यात धूळ फेकून जो काही धंदा होतो त्यातूनच जमेल तितका इलाज करवून घेते.''

''जगण्यासाठी?'' हसण्याच्या प्रयत्नात माझा चेहरा कसनुसा झाला.

''सगळ्यांनाच जगावंसं वाटतं.'' व्यथेने ओठ दाबत ती म्हणाली. ठीकच आहे . रानात वाघ असतो हे ठाऊक असूनही लोक त्याच रानालगत आपली घरं बांधतात, गाव वसवतात. जगात पूर, वादळ, दुष्काळ – काय नाही आहे? तरीसुद्धा ! आणि मेला घरसंसार थाटू पहात होता. म्हणूनच तर पुरचुंडीतला एकेक पैसा रक्ताचा एक ढेकूळ आहे.

तिने विचारलं, ''झोपणार नाही?''

''नाही. झोप येत नाहीये.'' त्याच्या डोळ्यात झोप नव्हती. तिचा श्वास अडखळतोय. दुखण्याने गरम श्वास. बारीक ताप. तापाने आगीसारखी वाटतेय. पुरचुंडी घट्ट धरून कुडता घेऊन तो उठून उभा रहिला. बाहेर पाऊस वादळ तसंच थैमान घालीत होतं. रात्र संपत आली होती. त्याने आपले कपडे घातले.

ती उठली. हसायचा प्रयत्न केला. ''निघालास?''

खिशात हात घालून पुरचुंडी घट्ट धरून म्हणाला, ''हो.''

मेल्याने तोंडातलं कडू रक्त गिळत मरताना म्हटलं होतं, ''ही तू ठेवून घे.'' का? का?

वेदनेने पिळवटलेल्या अस्फुट आवाजात ती म्हणाली, ''पुन्हा ये कधी.''

काय डोळे आहेत बाईचे! सगळा चेहरा लांच्छनेच्या डागांनी डागाळलेला आहे. जाड ओठ, वर उचललेलं नाक, पण असा चेहरा यापूर्वी कधी पाहिला नव्हता.

अचानक तिच्याकडे वळून पुरचुंडी तिच्या हातावर ठेवली. तिचे श्वास माझ्या अंगाला स्पर्श करून गेले. क्षणात नजर खाली करून रागाने दातओठ खात मी घराबाहेर रस्त्यावर निघून आलो.

तिने मागून काय म्हटलं कुणास ठाऊक? तिचे शब्द वाऱ्यावर उडून गेले. म्हणालो, ''मागून हाक मारू नकोस.''

ओझ्यापासून सुटका होऊन मी उत्तरेकडे चालू लागलो. वानप्रस्थ नाही. पूर्वेकडच्या वाऱ्याने मित्राच्या घरून पश्चिम गंगेच्या घाटाकडे ढकलायचा प्रयत्न केला. ढकलू शकला नाही.

# मित्रासाठी प्रस्तावना

**विमल कर**

माझा दिवगंत मित्र वसुधा मुखोपाध्याय एक अज्ञात लेखक होता. सुमारे वीस बावीस वर्षांपूर्वी आम्ही तिघा मित्रांनी मिळून त्याचं एक पुस्तक काढलं होतं. वसुधा त्यावेळी आमच्यातच होता. गोआबागानच्या एका छापखान्यात बरेच दिवस पडून राहिल्याने ती पुस्तकं नष्ट झाली आहेत. त्या पुस्तकाच्या दोनचार प्रती दोनचार आण्यात फुटपाथवर विकण्यात आम्ही यशस्वी झालो होतो. ती पुस्तकं कुणी विकत घेतली असतील वा वाचली असतील याची आम्हाला आशा नाही.

वसुधाचं तेच पुस्तक आता इतक्या दिवसांनंतर पुन्हा नव्या रूपात छापलं जात आहे. माझा आणि वसुधाचा मित्र भुवन ते पुस्तक छापतोय. पहिल्या आवृत्तीच्या वेळीही तो आमच्याबरोबर होता.

''नरकाची यात्रा–'' ते पुस्तक पूर्वी याच नावाने प्रसिद्ध झालं होतं. यावेळीही तेच नाव ठेवलेलं आहे. जुन्या आवृत्तीत तीन कथा होत्या, त्यातच दोन कथांची आणखी भर घातली आहे. वसुधा ज्या हॉस्पिटलमध्ये मरण पावला तिथे जाणं वा त्याची एखादी शेवटची रचना (त्याने लिहिली असल्यास) मिळवणं अशक्य होतं. आम्ही आमच्या परिचित रचनांमधूनच निवड करून त्याचं पुस्तक प्रसिद्ध करीत आहोत.

वाचकांची मला अगोदरच क्षमा मागायची आहे. मी लेखक नाही. प्रस्तावना कशी लिहितात मला ठाऊक नाही. माझी भाषादेखील प्रस्तावनेस योग्य अशी नाही. माझ्यावर ही जबाबदारी टाकली ती भुवनने. तारुण्यात असताना वसुधाबरोबरच मीदेखील लेखणी चालवायचा थोडाफार प्रयत्न केला आहे म्हणून हे काम मीच करावं असा भुवनचा आग्रह पडला. याखेरीज वसुधाला मीच त्याच्यापेक्षा ओळखतो असं भुवनला वाटते. पण हे काही खरं नव्हे. भुवनने कदाचित लेखणी चालवली नसेल, पण माझ्यापेक्षा त्याचं वसुधावर कमी प्रेम होतं, तो त्याचा कमी प्रशंसक होता वा त्याची वसुधाशी घनिष्ठता कमी होती असं मुळीच नाही. तरीदेखील वसुधाच्या पुस्तकाची प्रस्तावना मलाच लिहावी लागत आहे.

वीसबावीस वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतर वसुधासारख्या प्रसिद्ध नसलेल्या अज्ञात लेखकाचं हे कुणीही न वाचलेलं विस्मृत पुस्तक आम्ही पुन्हा का छापत आहोत याचं स्पष्टीकरण करणं अगोदर जरुरी आहे. खरं म्हणजे मैत्री हेच त्यामागचं मुख्य कारण

होय. दिवंगत मित्रासाठी स्नेहभाव प्रदर्शित करून व्यक्तिगत रूपात आम्हाला काहीसं समाधान लाभेल --- दुसरं कारण मात्र काही वेगळंच आहे. चारपाच महिन्यांपूर्वीच भुवन एकदा काशीला गेला होता. काशीच्या रामपुरा मोहल्ल्यातल्या एका सज्जनाबरोबर त्याचं बोलणं झालं. ते गृहस्थ अतिशय वृद्ध होते. एक दिवस भुवन त्यांच्या बैठकीत बसून त्यांच्याशी गप्पा मारत असता एक मुलगा आला आणि फ्रेम केलेलं एक चित्र देऊन गेला. काही दिवसांपूर्वी खोलीची साफसफाई करत असताना भिंतीवरून खाली पडून त्याची काच फुटली होती. म्हणून पुन्हा काच बसवून घेण्यात आली होती. भुवन तिथेच बसला असल्याने त्या चित्राकडे त्याचं लक्ष जाणं साहजिकच होतं. त्या अस्पष्टशा चित्रात भुवनला वसुधाचा चेहरा दिसला. तीन चेहऱ्यांपैकी एक वसुधाचा होता, दुसरा त्या वृद्ध गृहस्थांचा होता आणि तिसरा त्यांच्या मुलीचा होता. भुवन लगेच म्हणाला, ''मी याला ओळखतो. हा माझा मित्र आहे वसुधा.'' इतकं बोलून वसुधाचा परिचय देत तो म्हणाला, ''लेखक होता तो.'' वृद्ध गृहस्थ म्हणाले, ''माझी मुलगी देखील हेच म्हणायची की ते लिहीत असतात. पण मी मात्र त्याला लिहिताना कधी बघितलं नाही. हं, एकदा त्याला हरिद्वारला क्षयरोग्याची सेवा करताना मात्र पाहिलं होतं. हा फोटो हरिद्वाराला असताना घेतलेला आहे. काय विलक्षण मुलगा होता, जणू साधुसंन्यासीच!--- तुम्हाला याचा पत्ता ठाऊक आहे?'' --- का कुणास ठाऊक भुवनने वसुधाच्या मृत्यूची बातमी सांगितली नाही. म्हणाला, ''नाही, मला नाही ठाऊक.''

काशीहून परतल्यावर का कुणास ठाऊक भुवनच्या डोक्यात वसुधाचं हे पुस्तक प्रसिद्ध करायचं वेड शिरलं. मी खूप विचारलं, ''कशासाठी छापणार आहेस? काय उपयोग होणार आहे छापून?'' पण तो फक्त मान हलवून म्हणतो, ''काही असो, मी हे पुस्तक छापणारच. आपण छापायलाच हवं.'' मागे मी वसुधाला नेहमी म्हणत असे, ''माझ्यापाशी पैसा असता तर मी तुझं पुस्तक छापलं असतं. आता माझी परिस्थिती चांगली आहे. मी तुझ्या पुस्तकासाठी खर्च करायला तयार आहे.''

मला वाटतं, आज शेहेचाळीस सत्तेचाळीस वर्षांच्या वयातही भुवनमध्ये दांडगा उत्साह आहे, माझ्यात मात्र तो उरलेला नाही. मला फक्त एकच समाधान आहे की वसुधासाठी मी ही लहानशी प्रस्तावना लिहीत आहे. माझी तेवढी योग्यता नाही पण वाचकांनी मला क्षमा करावी.

वसुधाचा जन्म पश्चिम बंगालमध्ये झाला होता. पहिलं महायुद्ध संपलं त्या वर्षी म्हणजे एकोणीसशे अठरा साली त्याचा जन्म झाला होता, मार्गशीर्ष महिना असावा तो. त्याचे वडील पोस्टमास्तर होते. बदलीची नोकरी असल्याने वसुधाकुटुंबाने अनेक घाटांचं पाणी चाखलं होतं. अर्थात बंगाल व बिहारमधल्याच फक्त! वसुधाची आई सौम्य स्वभावाची, शांत व धार्मिक वृत्तीची होती. वसुधाला एक थोरली बहीण होती. वसुधा कॉलेजात शिकत असताना त्याच्या बहिणीचं सासरी निधन झालं होतं.

वसुधाच्या अन्य कुणा नातेवाईकाची आम्हाला माहिती नाही.

कॉलेजात शिकण्यासाठी वसुधा कलकत्त्याला आला तेव्हा आमची ओळख झाली. तो काही हुशार विद्यार्थी नव्हता, दिसायला देखणा नव्हता, फार काय, त्याचा आवाजही फुटलेला होता. मित्र रूपातही वसुधा दुर्मिळच होता. अभ्यासापेक्षा दसपट जास्त वेळ तो नुसता विचार करण्यात घालवायचा. आम्हाला काही सांगायला वा समजावयाला लागला की त्याचा फुटलेला आवाज आवेगामुळे काही तरी विलक्षण व गोड वाटू लागायचा. तो थोडा जास्तच भावुक असल्याचं त्याच्या डोळ्यांवरून दिसून यायचं. त्याचा चेहरा लांबट निमुळता होता, नाक धारदार व किंचित वर उचललेलं होतं. डोळे लहान असूनही खूप चमकदार होते आणि भुवया दाट होत्या. वर्ण गव्हाळ होता. केस विखुरलेले असायचे. लोकांचे लक्ष वेधून घेईल असं काहीही त्याच्या चेहऱ्यात नव्हतं. सर्वसामान्य बंगाली मुलांमध्ये तो वेगळा उठून दिसेल याचा प्रश्नच नव्हता. पण आमच्यासारख्या वसुधाच्या घनिष्ठ मित्रांनाच फक्त ठाऊक होतं की त्याच्या स्वभावाचा साचा आमच्यासारखा नाही, त्यात काहीतरी आकर्षण निश्चितच आहे.

आम्ही बी.ए. च्या वर्गात असताना वसुधाने लेखनाविषयी चर्चा करायला सुरुवात केली. त्यापूर्वीपासून कदाचित तो लिहीत असावा पण आम्हाला त्याचा पत्ता नव्हता. वसुधाची पहिली कथा आमच्या एका मित्राच्या मासिकात छापून आली होती. ते मासिक आणि ती कथा दोन्ही आता नाहीसे झाले आहे. त्या काळी कलकत्त्यावर बाँबवर्षाव होत होता. परिस्थिती गंभीर होती. लोक भीतीने शहर सोडून जात होते. त्या अस्थिरतेच्या काळात इतर चारचौघांसारखीच वसुधानेही एक कथा लिहिली होती. अगदी सामान्य कथा. त्यावेळी आम्ही त्या कथेची खूप प्रशंसा केली होती. पण ती कथा अगदी सामान्य दर्जाची असली पाहिजे यात काहीच संशय नाही. कारण आज मला ती कथा अजिबात आठवत नाही आहे.

आपल्या खऱ्या लेखनाला त्रेचाळीसपासूनच सुरुवात झाली, असं वसुधाही मान्य करीत असेल याची मला खात्री आहे. त्यावेळी आम्ही सगळेच नोकरीला लागलो होतो. वसुधा सिव्हिल सप्लायमध्ये नोकरी करीत होता, मी आणि भुवन दुसरीकडे कुठेतरी. बहूबाजारच्या एका खाणावळीत वसुधा रहात होता. मित्र असे आम्ही दोघे होतो. खाणावळीच्या खोलीत संध्याकाळपासूनच आमची बैठक भरायची. वसुधा स्वतःच्या लेखनाविषयी चर्चा करीत रहायचा. काही लिहिलं असल्यास आम्हाला वाचून दाखवायचा. त्याचं मन मोठं अस्थिर होतं. कधी कुठली रचना पूर्ण करीत नसे. आज काही लिहायचं ठरवायचा, पण दुसऱ्या दिवशी तो बेत सोडून द्यायचा. त्याने किती रचना सुरू केल्या, पण थोडं फार लिहून सोडून दिल्या याची गणतीच नाही. कित्येकदा महिनेच्या महिने तो लिहायची चर्चा करायचा, पण प्रत्यक्षात एक शब्ददेखील लिहायचा नाही.

प्रस्तुत पुस्तकातील पहिली कथा, 'विनोदिनीचं दुःख'– त्यावेळी एका मासिकात प्रसिद्ध झाली होती. कथेत जणू पहिल्यांदा वसुधाने स्वतःला अभिव्यक्त केलं. तेराव्या वर्षी विनोदिनीचं लग्न झालं होतं. तिच्या नवऱ्याचं वय होतं अठरा वर्षांचं. लाल काठाचं जाडंभरडं लुगडं अंगावर टिकत नसे. म्हणून विनोदिनी निम्म्या साडीचा बोळा करून तो पाठीवर टाकून ठेवायची. तिचा नवरा गंगापद तिच्यासाठी स्टीमरघाटच्या बाजारातून मातीची बाहुली, काचेच्या बांगड्या, लाखेची बिंदी, चिनी सिंदूर, कच्चे पेरू आणि जांभळं विकत आणायचा. गुपचूप आणून बायकोला द्यायचा. तक्तपोशीखाली लपवलेल्या वस्तू बाहेर काढून विनोदिनी रात्रीच खेळायला बसायची; नाहीतर कच्चा पेरू रात्रीच खाऊन टाकायची. गंगाधरला स्टीमरघाटवर नोकरी लागली, तेव्हा तो विनोदिनीसाठी गौरांगठाकुरची एक काचेची मूर्ती विकत घेऊन आला. तेव्हापासून विनोदिनी ठाकुरभक्त बनली. असं होता होता विनोदिनी तरुण झाली. पोराबाळांची आई झाली. गृहिणी झाली. तारुण्य ओसरलं. म्हातारपण आलं. आणि त्यावेळी तिचा नवरा गंगापद देवाघरी गेला. नवऱ्याच्या मृत्यूनंतर विनोदिनीला या जगात जगणं असह्य वाटू लागलं. पंचेचाळीसहूनही अधिक वर्षं तिचं आयुष्य तिच्या पतीशी निगडित राहिलं होतं. दोघांनी जणू आपल्या संसाराची, आपल्या नात्याची एक विशिष्ट रूपरेषा आखून घेतली होती. (इंग्रजीत ज्याला पॅटर्न म्हणतात तशी) पतीच्या मृत्यूने ती रूपरेषा विस्कळीत झाली. विनोदिनीचं जीवन आता शुष्क, निरर्थक आणि व्यर्थ होतं. जणू एखाद्या नदीचा प्रवाह वाहाता वाहाता अचानक कुठेतरी हरवला असावा, सुकून गेला असावा. विनोदिनीच्या मनःस्थितीचं लेखकाने वर्णन केलं आहे – ज्या रेषांनी व रंगांनी विधात्याने तिच्यासाठी या जगाचं एक अत्यंत क्षुद्र चित्र रेखाटलं होतं, त्यातल्या निम्म्या रेषा पुसल्या गेल्या होत्या, बरेचसे रंग धुतले गेले होते. आता विनोदिनी चित्र नव्हती. चित्र व्हायची शक्यताही उरली नव्हती.

मनाची ही रिक्तता भरून काढण्यासाठी विनोदिनी मुलाचा विचार करायची. त्याच्याकडे लक्ष द्यायची. तरी मनाला पुरेसं समाधान नव्हतं. ठाकुरदेवाच्या पूजेअर्चेत ती स्वतःला विसरून जायचा प्रयत्न करायची, पण विसरता येत नसे. गौरांगठाकुरची ती काचेची मूर्ती विनोदिनीला अतिशय आवडायची. पंचेचाळीस वर्षांपासून ती त्या काचेच्या मूर्तीची रोज उपासना करीत आली होती. गंगापदच्या मृत्यूनंतर त्या मूर्तीतलं देवपण जणू हरवलं, ती निव्वळ काचेची मूर्ती राहिली. अखेर एक दिवस विनोदिनीला जाणवलं – मूर्तीचं विसर्जन करतात, तिची सजावट, तिची माती, काहीसुद्धा मागे शिल्लक रहात नाही. माणसाच्या जीवनातही हे विसर्जनच अंतिम सत्य आहे. गंगापद आणि विनोदिनीला जणू काही लोक विसर्जनाची वाद्ये वाजवीत नदीकाठी घेऊन आले. पती निघून गेला आणि नदीचं पाणी विनोदिनीची वाट पहात आहे. एकाच नदीत बुडाल्याने दोन्ही मूर्ती विरघळून

एकरूप होऊन जातील, असा विचार करून विनोदिनीने ईश्वराला नमस्कार केला.

'विनोदिनीचं दु:ख' ही कथा वसुधाने आपल्या आईवरून लिहिली होती. त्याच्या आईत आणि विनोदिनीत अजिबात फरक नाही. धार्मिक वृत्तीची असूनही, पतीच्या मृत्यूनंतर त्याच्या आईचं वसुधाकडे पाहून खरं सांत्वन झालं नाही की धर्मानेही झालं नाही. वसुधा सांगायचा, 'आईचा परलोकावर विश्वास नाही. फक्त मृत्यूवर विश्वास आहे. काय करावं ते मला समजत नाही.'

आईच्या मृत्यूनंतर बराच काळ लोटल्यावर वसुधाने आणखी एक कथा लिहिली. कथेचं नाव होतं 'दु:ख निवारण.' प्रस्तुत पुस्तकातली ही दुसरी कथा. फारशा प्रसिद्ध नसलेल्या एका मासिकात ही कथा छापून आली होती. 'विनोदिनीचं दु:ख' या कथेची भाषाशैली संस्कृतप्रचुर आहे. वसुधा सुरुवातीला त्याच शैलीत लिहायचा. 'दु:ख निवारण' कथा त्याने बोलचालीच्या भाषेत लिहिली.

'विनोदिनीचं दु:ख' कथेत विनोदिनीचं अखेरचं सांत्वनेचं स्थान होतं मृत्यू. विनोदिनीने मृत्यूला दु:खनिवारकाच्या रूपात पाहिलं होतं. मी नीट सांगू शकलो नाहीसं वाटतं. मला सांगायचं होतं की विनोदिनीला मृत्यूमध्ये एक प्रकारच्या आत्मिक पुनर्मिलनाची आशा होती. 'दु:ख निवारण' कथेत वसुधाने जणू याच मृत्यूची आणखी आग्रहपूर्वक इच्छा व्यक्त केली.

अगोदर सांगितलंच आहे मी की वसुधाने ही कथा आपल्या आईच्या मृत्यूनंतर बऱ्याच दिवसांनी लिहिली होती. वसुधाची आई मरण पावली त्यावेळी त्याची एका मुलीशी ओळख झाली होती. तिचे नाव सांगणार नाही. लेखनाच्या सोयीसाठी आपण तिला नीरू वा निरुपमा म्हणू या. आईच्या आजारपणाची बातमी कळताच वसुधा गावी निघून गेला होता. आईच्या मृत्यूनंतर श्राद्धकर्म वगैरे उरकेपर्यंत गावीच राहिला होता. आम्ही–मी आणि भुवन–त्याच्या आईच्या श्राद्धाच्या दिवशी त्याच्या गावी गेलो होतो. त्यावेळी वसुधाने आम्हाला एक विलक्षण गोष्ट सांगितली होती. म्हणाला होता, नदीकाठी स्मशानात आईची चिता धगधगत असताना तो एका जांभळाच्या झाडाखाली बसल्या बसल्या नीरूचाच सारखा विचार करीत होता. त्यानंतरच्या कित्येक दिवसांत, सुतकाच्या दिवसात देखील तो आईपेक्षा नीरूचाच जास्त विचार करीत राहिला होता. असं का?

वसुधाच्या प्रत्येक गोष्टीत 'का' चं शेपूट अडकलेलं असे. आईसाठी त्याला जसा शोक वाटायला हवा होता, जशी व्यथा जाणवायला हवी होती, तसा शोक वा व्यथा त्याला जाणवली नव्हती. उलट तो फक्त निरूपमाचीच काळजी करीत राहिला – या टोचणीमुळे तो बरेच दिवस खिन्न होता. जणू तो खूप मोठा अपराधी होता, व त्याने फार मोठा अन्याय केला असावा. तो उगाचच हे मनाला लावून घेत असल्याचं त्याला समजावण्याचा आम्ही खूप प्रयत्न केला; पण व्यर्थ!

पुढचे काही दिवस वसुधा खिन्न आणि विमनस्क होता. त्यामुळे नीरूदेखील दु:खी

व विषण्ण होती. त्यानंतर स्वतःच्या मनानेच एक उत्तर शोधून वसुधाने 'दुःख निवारण' कथा लिहिली.

'विनोदिनीचं दुःख' कथेत विनोदिनीला मृत्यूतच आपल्या दुःखाचा परिहार जाणवला होता. 'दुःख निवारण' कथेत सुखेन्दूला जाणवतं की मृत्यू निष्क्रिय आहे, जडतुल्य आहे. जीवन प्रतिक्रिया निर्माण करते. मृत्यू कुठलीही प्रतिक्रिया निर्माण करीत नाही. साध्या शब्दांत सांगायचं म्हणजे, विनोदिनी मृत्यूला जवळ करून शांती मिळवू पहात होती, सुखेन्दू जिवंत राहून जीवनातूनच शांती मिळवू पहात होता.

सुखेन्दू हा 'दुःख निवारण' कथेचा नायक. त्याचं वय थोडं वाढवलं आहे. वरवर पाहता कथेचा मुख्य विषय 'प्रेत' असल्यासारखं वाटतंय. पण माझ्या मते तो मृत व जीवित किंवा मृत्यू व जीवन यामधील झगडा हा आहे. कथेच्या सुरुवातीलाच आपल्याला दिसतं की सुखेन्दू एका विलक्षण अनिश्चित अवस्थेत अतिशय दुःखी मनाने जगत आहे. त्याचं रेणू नावाच्या एका मुलीवर प्रेम आहे. पण आईच्या सर्वव्यापी स्मृतीने त्याला इतकं ग्रासून टाकलं आहे की रेणूशी त्याचे नैसर्गिक संबंध निर्माण होऊ शकत नाहीत. त्याच्या मनाला सतत अपराधाची टोचणी लागून राहते. त्याची विवेकबुद्धी त्याला छळत राहते. आपल्या आईचा शाप रोज घेत आपण जगत आहोत, असं सुखेन्दूला वाटतं. असं का होतं ते सुखेन्दूला ठाऊक नाही. त्याला फक्त एकच माहीत आहे की आईबद्दलच्या आपल्या कर्तव्याचं आपण यथोचित पालन करू शकलो नाही.

या मानसिक द्वंद्वातून सुखेन्दूची सुटका व्हायची आम्हाला काही आशा उरली नव्हती. त्याचवेळी एका प्रसंगाने सगळं द्वंद्व संपून जातं. कथेच्या शेवटी जो एक अलौकिक प्रसंग आला आहे त्याविषयी मी बोलत आहे. थंडी सुरू झाली होती. त्या दिवशी संध्याकाळी रेणूच्या घरच्या छतावर रेणू आणि सुखेन्दू बोलत बसले होते. धूर, धुकं, गॅसचा प्रकाश, आणि अंधुकसं चांदणं हे सगळं मिळून कलकत्त्याचे गल्लीबोळ अस्पष्ट धुरकट झाले होते. बोलता बोलता रेणू अचानक उठून गेली होती आणि सुखेन्दू बसला होता. अचानक कुणीतरी आपल्यापाशी येऊन बसल्यासारखं त्याला जाणवलं. अंधुक चांदणं आणि धूरधुक्यामुळे त्या मौनमूर्तीला त्याला अगोदर ओळखता आलं नाही. ती मूर्ती जणू पांढऱ्या छायेसारखी भासत होती. जरा लक्षपूर्वक पहिल्यावर सुखेन्दूने ओळखलं, त्याची आई. सुखेन्दू थक्कच झाला. पण त्यानंतर लगेच जणू त्याला आई का आली ते उमगलं. मृत आईविषयी त्याच्या मनात प्रेम दाटून आलं होतं. आईच्या आठवणीने तो बेचैन, व्यथित झाला होता. कुठल्याशा विलक्षण औदासीन्याने आणि चिन्तेच्या अनुभूतीने त्याच्या मनाचा ताबा घेतला होता. सुखेन्दू आईशी काही बोलणार तोच त्याला कसलासा सुवास जाणवला. हा कसला सुवास? कशाचा हा गंध? विमनस्कपणे मान खाली घातल्यावर छातीवरच्या खिशातून फुलांचा वास आला. थोड्याच वेळापूर्वी रेणूने

आपल्या केसात माळलेलं गुलाबाचं फूल काढून त्याच्या खिशात ठेवल्याचं त्याला आठवलं. त्या फुलाचा वास त्याला विलक्षण, जिवंत, मनोहर आणि स्पर्शयोग्य वाटला. क्षणार्धात रेणूच्या तन–मन–प्रेमाने जणू एक विशाल लाटेचं रूप घेऊन त्याला आपल्यात सामावून घेतलं. त्याच अवस्थेत सुखेन्दू आईला कसाबसा म्हणाला, आता तू कधी येऊ नकोस.

वसुधाच्या स्वतःच्या मनाला जी टोचणी लागून राहिली होती तीच सुखेन्दूच्या माध्यमाने नाहीशी झाली. मृत आईसाठी त्याला अपार शोक वा व्यथा झाली नाही. उलट तो नीरूच्या चिंतनात तन्मय झाला होता – या टोचणीमुळे त्याला इतके दिवस जे दुःख वाटत होतं ते इतक्या दिवसांनी आता कुठे नाहीसं झालं. नीरू सजीव आहे म्हणूनच तिचं आकर्षण अधिक आहे. नीरू सजीव आहे म्हणूनच तिला अर्थ आहे. जीवन हेच प्रेम आहे.

'दुःख निवारण' ही खऱ्या अर्थाने प्रेमकथा नाही. प्रेम हे या कथेचे उद्दिष्ट नव्हे. समस्त मानव जातीला जीवनाची आसक्ती असते आणि ही आसक्ती नसल्यास तो जगू शकत नाही हेच सत्य जणू वसुधाने या कथेत सांगायचा प्रयत्न केला आहे.

वैयक्तिक दृष्टीने मला हेच वाटतं की ही कथा खुद्द वसुधासाठी उपकारक ठरली होती. सुखेन्दू तर निमित्तमात्र होता.

या पुस्तकातील तिसरी कथा आहे 'नरकाची यात्रा.' वर सांगितलं आहेच तरी पुन्हा एकदा आठवण करून देतो. की याच कथेच्या नावावरून आम्ही पहिल्यांदा हे पुस्तक छापलं होतं. यावेळीसुद्धा हेच नाव ठेवलेलं आहे.

'दुःख निवारण' कथा लिहिल्यानंतर सुमारे वर्षाने वसुधाने ही कथा लिहिली होती. ही प्रेमकथा म्हणता येईल. खरं म्हणजे, प्रेमकथेचं 'नरकाची यात्रा' हे नाव मोठं चमत्कारिक आहे.

'नरकाची यात्रा' मध्ये एका तरुणाची प्रेमपिपासा, त्याचं प्रेम आणि नंतर त्यातील व्यर्थपणा यांची कथा सांगितलेली आहे. कथेत नायकाचं नाव परिमल असलं तरी कथेचा खरा नायक खुद्द वसुधाच आहे. नायिकेचं नाव मात्र यात खरंच निरुपमा आहे. कलकत्त्याच्या सदानंद चौधुरी लेनच्या ज्या घरात निरुपमा रहायची त्याच घराच्या खालच्या मजल्यावर परिमलचा एक मित्र रहायचा. परिमल मधून मधून आपल्या मित्राकडे जायचा. त्याच सूत्राने निरुपमेशी ओळख झाली. ओळख दाट व्हायला थोडा वेळ लागला असला तरी परिमलला सुरुवातीपासूनच निरुपमाचं आकर्षण वाटू लागलं होतं यात शंकाच नाही. प्रेमाला दैवी शक्ती मानणाऱ्या, आणि प्रेमानेच माणसाच्या हृदयाची ज्योत तेवत राहते, यावर ठाम विश्वास असणाऱ्या मुलांपैकीच परिमल एक होता. तोंड लपवणाऱ्या, लाजाळू आणि भावुक वृत्तीच्या या तरुणाला निरुपमासारखी सामान्य मुलगी आवडली नसती तर त्यात वावगं काही नव्हतं. कारण निरूपमा जात्याच अगदी सामान्य होती.

कथेच्या पहिल्या भागात परिमल व निरुपमा यांच्यात हळूहळू जवळीक कशी निर्माण होत गेली, त्याचं वर्णन आहे. दुसऱ्या भागात त्यांच्यातील प्रेमाचं वर्णन आहे. परिमलचं प्रेम गहनगंभीर आणि आंतरिक असल्याचं म्हणता येईल. या प्रेमाने आपलं अस्तित्व सार्थ करून टाकलं आहे, आपलं जीवन बहुमूल्य करून टाकलं आहे, असं परिमलला वाटायचं. निरुपमा असला काही विचार करीत नसे, विचार करायची जरूरच तिला वाटत नसे. कदाचित तिला विचारच करता येत नसावा. तरीदेखील प्रत्येक तरुणीप्रमाणे तिलाही या प्रेमप्रकरणाने आनंद होत होता.

हे प्रेम एक दिवस संपलं का भंग पावलं, ते सहज लक्षात येण्यासारखं आहे. तरीदेखील, कधी असं वाटतं की निरुपमाच्या घरच्या खालच्या मजल्यावर भाडेकरू म्हणून राहणाऱ्या परिमलच्या मित्राच्या मन्मथच्या दुराव्या व चातुर्यामुळे हे प्रेम संपुष्टात आलं, कधी वाटतं परिमलचीच चूक होती, आणि कधी निरुपमालाच दोषी ठरवायची इच्छा होते. मन्मथला जर या प्रेमभंगाचं कारण मानलं तर असं वाटतं की परिमलच्या प्रतिस्पर्ध्याच्या रूपात मन्मथने निरुपमेला मिळवायचा प्रयत्न केला होता. पण तो अति चतुर असल्याने त्याने उघडपणे स्पर्धा न करता, गुपचूप केली. साध्या सरळ व्यावहारिक मार्गाने एखाद्या धूर्तासारखं त्याने अगोदर निरुपमाच्या आईचं मन वळवून घेतलं आणि मग निरुपमाचंही. निरुपमेच्या आईला जगरहाटी ठाऊक होती, मुलीचं सुखसमाधान ती जाणत होती, फक्त हे प्रेमबिम काही तिला माहीत नव्हतं. परिमल तिला योग्य स्थळ वाटलं नाही. निरुपमाने देखील कशी कुणास ठाऊक चूक केली. मन्मथची चतुराई व त्याचा शक्तिसामर्थ्ययुक्त हक्क याचं तिला अधिक आकर्षण वाटलं. शिवाय परिमलचा स्वीकार करण्यास आईचा प्रचंड विरोध होताच. लहानपणापासूनच निरुपमेला कुठल्याही प्रकारच्या अस्वस्थतेची भीती वाटायची, तिरस्कार वाटायचा. परिमलकडे प्रियकर म्हणून पाहण्याचा तिने बरेच दिवस प्रयत्न करून पाहिला, पण त्यात तिला यश आले नाही. हे प्रेम जेव्हा जगात व्यवहाराचा विषय होईल तेव्हा – तेव्हा काय होईल? त्यावेळी निरुपमाला सुख व समाधान लाभेल का? परिमल आपल्याला सांसारिक सुखसमाधान देऊ शकेल असं तिला वाटलं नाही.

परिमलचं काय चुकलं याचा जेव्हा मी विचार करतो, तेव्हा मला दिसतं की फारसे सायास न करता प्रदीर्घ वाटचाल करून आल्यावर कसा कुणास ठाऊक, पण परिमल अचानक थबकला, थांबला. का थांबला. हे सांगायला हवं. त्यापैकी एक शक्यता अशी आहे की प्रेमात जे काही मिळवण्यासारखं होतं ते परिमलने मिळवलं होतं आणि आता प्रेमाच्या दुसऱ्या बाजूकडे, विषाद व अपूर्णतेकडे त्याचं लक्ष वेधलं होतं. एका विशिष्ट टप्प्यावर पोचल्यानंतर परिमलने प्रेमाच्या क्षणिक प्राप्तीच्या विषयावर विचार करून पाहिला, तेव्हा त्याच्या लक्षात आलं की प्रेम काही स्थायी नसतं, आज आहे त्याच स्वरूपात ते कायम राहणार नाही. प्रेमात जो विषाद आणि

अपूर्णत्व आहे त्यामागचे कारण हेच की अन्य सर्व गतिशील सौंदर्याप्रमाणे त्याचाही ऱ्हास होतो, क्षय होतो, त्यातही परिवर्तन होतं--- परिमलला कदाचित अक्षय प्रेम, अपरिवर्तनीय प्रेम हवं होतं आणि ते या जगात अशक्य आहे.

निरुपमाची चूक म्हणजे ती एक सामान्य मुलगी आहे. पार सामान्य दृष्टीने ती प्रेम व घरसंसाराचं सुख याकडे पाहू इच्छिते. परिमलचा स्वीकार करण्यात तिची द्विधा मनःस्थिती झाली आहे. या द्विधा अवस्थेतील बराचसा भाग मन्मथकडून आलेला आहे, बाकीचा उरलेला भाग निरुपमाच्या सामान्य इच्छेतून निर्माण झालेला आहे.

'नरकाची यात्रा' वसुधाची स्वतःची कहाणी आहे. नीरूच्या प्रेमाने त्याला अखेरपर्यंत कुठलंही समाधान काही दिलं नाही. इतकंच नव्हे, त्याच्याच कुठल्याशा मित्राने खरंच नीरूशी लग्न केलं होतं. प्रेमाचा हा व्यर्थपणा आपण ज्याप्रकारे मान्य करतो, त्याप्रकारे वसुधाने काही मान्य केला नाही. तो म्हणायचा, आपली प्रेमाची कल्पना फार मर्यादित आहे, लहान आहे. आपण फक्त एकाच व्यक्तीवर प्रेम करतो. ती व्यक्ती सोडून निघून गेली की आपण दुःखाने मरून जातो, तळमळत राहतो, कातर होतो. असं का? का?

'का' चं हे भूत कधीही त्याच्या डोक्यातून गेलं नाही. आमचं हे लहानसहान प्रेम वसुधाला पसंत नव्हतं हे सांगायला नकोच. तो अखेरपर्यंत प्रेम करीत राहिला, पण ते त्याच्या कल्पनेप्रमाणे! त्याने पाहिलं की या जगातील तऱ्हेतऱ्हेच्या टोचण्या, धूर्तपणा, प्राप्तीची इच्छा या सर्व गोष्टी मिळून आपल्या आत्मिक दीनतेला आणखीनच दीन करून सोडतात. त्याची कल्पना होती की आपल्या दीनपणामुळे आपण नरकातले किडे बनलो आहोत. या नरकातून सुटका करून घेण्याचा प्रयत्न हीच त्याची 'नरकाची यात्रा' आहे. व्यक्तिगत प्रेम आणि त्याची प्राप्ती हे सोडून बहुधा तो अन्यत्र कुठेतरी निघून जायचा प्रयत्न करीत होता.

वसुधा ज्या वर्षी कलकत्ता सोडून निघून गेला त्याच वर्षी माझं लग्न झालं. माझ्या बायकोला वसुधाच्या कथा आवडायच्या की नाही ते ठाऊक नाही, पण ती त्याला ओळखत होती. वसुधाला मी लग्नासाठी थांबायचा आग्रह केला होता. पण तो थांबला नव्हता. त्याच्या काहीच महिने अगोदर आम्ही त्याचं पुस्तक प्रसिद्ध केलं होतं.

त्यानंतर वसुधाची भेट व्हायचा योग काही कधी आला नाही. वर्षातून एखादे वेळी त्याचं पत्र यायचं. भुवनला देखील माझ्याचसारखी त्याची एकदोन पत्रं यायची. वसुधाच्या पत्रावरून आम्हाला वाटायचं की तो भटक्या बनला आहे. त्यानंतर तो भलताच आस्तिक झाल्यासारखा वाटला. आणि अगदी अखेरीस समजलं की ईश्वराचं विसर्जन करून त्यानं सेवाव्रत धारण केलं आहे.

वसुधाच्या अखेरच्या दोन कथांविषयी मला काही बोलायचं नाहीय. मी

नरकातला किडा आहे. नरकापासून आपल्या प्रवासाला आरंभ करून वसुधाने कोणत्या मार्गांवरून चालायचा प्रयत्न केला त्याची मला काही माहिती नाही. त्याच्या आयुष्याच्या अखेरच्या काळाचा इतिवृत्त चौथी कथा 'ईश्वर' आणि पाचवी कथा 'आश्रय' यातून कदाचित समजू शकेल. या दोन्ही कथा काशीहून परतताना भुवन त्या वृद्ध गृहस्थांच्या मुलीकडून घेऊन आला होता. या कथांच्या हस्तलिखितावरून स्पष्टपणे कळून येतंय की दोन्ही कथा अपुऱ्या आहेत, त्यांना शेवट नाही. कथा वाचल्यावर वाचकांनाही हे जाणवेल.

'ईश्वर' कथा ही नेहमीच्या पद्धतीने लिहिलेली कथा नाही. या कथेला प्रतीक—कथा म्हणता येईल. वाचताना आपल्याला विलक्षण सहजतेचा बोध होतो. अखेरीस एक प्रकारची उणीव जाणवते हे मात्र खरं. कथेच्या सुरुवातीलाच अनैसर्गिकता, कृत्रिमता वाटते. एका अवेळी अंधारात एक प्रवासी एका मंदिरात येऊन आसरा घेतो. तिथे अंधारातच त्याची एका संन्याशासी भेट होते. गप्पांच्या ओघात तो संन्यासी सांगतो की, 'माझ्यापाशी एक दिवा आहे, अद्‌भुत दिवा. तो वाटेल तेव्हा, वाटेल त्या संकटात पेटवून मार्गक्रमण करता येते.' प्रवासी विचारतो, ''तर मग तो दिवा न पेटवता आपण अंधारात का बसला आहात?'' संन्यासी उत्तर देतो, ''माझ्यापाशी तीन दिवे आहेत. एक खरा आणि दोन नकली. अंधारात मला खरा कोणता आणि नकली कोणता ते ओळखू येत नाहीय.''

ते ऐकून प्रवाशाच्या मनात येतं की हे दिवे जर आपल्यापाशी असते तर किती बरं झालं असतं. संन्याशाला जणू त्याच्या मनातली ही गोष्ट समजते. तो म्हणतो, ''तुला जर ओळखता येत असेल तर तू यापैकी खरा दिवा शोधून घे.'' प्रवासी ते दिवे आपल्या हातात मागून घेतो. संन्यासी देतो. अंधारात प्रवाशालाही तिन्ही दिवे सारखेच वाटतात. त्याला त्यातला खरा दिवा शोधून काढता येत नाही. संन्यासी विचारतो, 'मिळाला?' प्रवासी उत्तरतो, 'नाही.' तेव्हा तिन्ही दिवे परत घेऊन संन्यासी म्हणतो, 'यापैकी एक दिवा नक्कीच प्रज्वलित होणार. ज्याला प्रज्वलित करता येत असेल त्याच्याच हातून तो प्रज्वलित होणार. तो आपल्या गुणांच्या बळावर प्रज्वलित करून जाईल.'

कथा इथेच संपते. पण हस्तलिखित पाहिल्यावर लक्षात येतं की वसुधा त्या कथेत आणखीही बरंच काही लिहायचा प्रयत्न करीत होता. परंतु ते त्याला जमलं नाही. कदाचित या कोड्याचा अर्थ उलगडून दाखवायचा त्याचा प्रयत्न असावा, पण त्यात यश मिळालं नाही.

अखेरच्या कथेचं नाव आहे 'आश्रय'. काशी शहरातली गोष्ट आहे. कथेला सुरुवात आहे पण शेवट नाही. वसुधाने कथा आत्मनिवेदनात्मक शैलीत लिहायला सुरुवात केली होती. थंडीच्या दिवसात काशीच्या परिसरात दर वर्षी महामारीची साथ येते. त्या वर्षी भयंकर साथ पसरली होती. लोक घरदार सोडून जात होते.

सरकारी अधिकारीदेखील खेड्यात जात नव्हते. गंगेच्या घाटावर सतत चिता जळत होत्या. कथेचा नायक एक दिवस भल्या पहाटे गंगास्नान आटोपून घरी परत येत असतो. त्यावेळी त्याला जाणवतं की गावातून कुणीतरी आपल्याला हाक मारत आहे. कदाचित, त्याला ग्राम्य स्वरात अभंग गाऊन दाखवणारा त्याचा तोच ग्रामीण मित्र असावा.

--- वसुधाला जणू त्याच अभंगाचे सूर ऐकू आले: आम्ही अतिशय दु:खी आहोत, अतिशय अस्थिर आहोत. झाडाला जशी मुळं असतात तशी आम्हाला मुळं नसतात. आम्ही एकाच जागी टिकू शकत नाही.

कथा इथपर्यंतच लिहिलेली आहे. त्याच्या पुढे लिहिली जाऊ शकली नाही. भुवनचं म्हणणं आहे की ही कथा लिहिल्याच्या दुसऱ्याच दिवशी वसुधा कुठे तरी निघून गेला होता. काशीतल्या त्या वृद्ध गृहस्थांना वा त्यांच्या मुलीला काहीच माहिती नाही.

छोटा नागपूरच्या एका अनोळखी जागी मिशनच्या एका हॉस्पिटलमध्ये वसुधा मरण पावला. त्याच्या मृत्यूची बातमी आम्हाला काही दिवसांनंतर कळली. हॉस्पिटलमध्ये त्याने काही लिहिलं असेल असं वाटत नाही. त्याच्या लेखनाचं प्रयोजन संपलं होतं.

वसुधाच्या सर्व कथांचा परामर्ष मी एका मित्राच्या दृष्टिकोनातून घेतला आहे. त्यामुळे अन्याय झाला असण्याचीही शक्यता आहे. पण मला तेच शक्य होतं, वाचकांनी मला क्षमा करावी.

या पुस्तकाच्या सुरुवातीला एक अर्पणपत्रिका आहे. पहिल्या आवृत्तीतही होती. या अर्पणपत्रिकत ज्या निरुपमाचा उल्लेख आहे ती माझी पत्नी नसून वसुधाचीच निरुपमा आहे हे सांगायला नकोच!

# भारतवर्ष

## रमापद चौधुरी

सैनिकी भाषेत नाव होतं बी एफ थ्री थर्टी टू. BF 332. खरं म्हणजे, ते एखादं स्टेशन नव्हतं. प्लॅटफॉर्म नव्हतं की तिकीटघर नव्हतं. फक्त एक दिवस दिसलं की चकाकत्या नव्या काटेरी तारांनी रेल्वे लाइनच्या कडा बंदिस्त करून टाकल्या आहेत. बस्स, इतकंच. दिवसभरात अप वा डाउन कोणतीही गाडी थांबत नसे. कधी कधी अचानक सकाळच्या वेळी येऊन थडकणारी एक खास गाडी काय ती थांबायची. ती कधी कोणत्या वेळी येणार आहे ते अगोदरपासून आम्हालाच काय ते ठाऊक असायचे. बिहारी कुक भगौतीलालसकट आम्ही एकूण पाच जण होतो.

स्टेशन नव्हतं, ट्रेन थांबत नव्हती, तरी रेल्वेच्या लोकांच्या तोंडी एक नवं नाव प्रचलित झालं होतं. त्यावरूनच आम्हीही म्हणू लागलो होतो. 'अंडं हॉल्ट.'

अंडं म्हणजे अंडं. अंडं हॉल्टला लागून असलेल्या दोन लहान लहान टेकड्यांच्या पायथ्याशी एक गाव होतं. गावात घरोघरी कोंबड्या होत्या. गावकरी खूप दूरवरच्या भुरकुंड्याच्या शनिवारच्या बाजारात कोंबड्या विकायला नाहीतर कोंबड्यांची अंडी विकायला जायचे. कधी कधी पाळीव कोंबडा बगलेत धरून कोंबड्यांची झुंज लावायचा खेळही करायचे. पण बी एफ थ्री थर्टीटूला 'अंडं हॉल्ट' नाव पडलं ते यामुळे नव्हे!

खरं सांगायचं म्हणजे गावच्या अंड्यांचा आम्हाला काही लोभ नव्हता.

आमच्या ठेकेदाराशी रेल्वेचा करार होता. त्याची एक ट्रॉलीदेखील होती. लाल उपरणं उडवीत ती आगगाडीतून गडगडत यायची आणि सामानसुमान उतरून निघून जायची. अंड्यांचे ढीगच्या ढीग खाली उतरले जायचे. बिहारी कुक भगौतीलाल ती सगळी अंडी पुढच्या रात्री उकडून तयार ठेवायचा.

पण अंडं हॉल्ट नाव पडायचं हेही काही कारण नव्हतं. ते नाव पडायचं कारण हे होतं की काटेरी तारांच्या पलीकडे हळूहळू फुल बॉइल्ड अंड्यांच्या टरफलांचा स्तूप तयार झाला होता. अंड्यांच्या टरफलांचा दिवसेंदिवस डोंगर तयार होत चालला होता. म्हणून ते नाव पडलं होतं.

सैनिकी भाषेत बी एफ थ्री थर्टीटू च्या सुरुवातीची जी दोन अक्षरं होती त्यांच्या बाबतीतही आमची हीच कल्पना होती की ते काही विशिष्ट संकेत नसून ब्रेक फास्ट (फराळ) याचंच संक्षिप्त रूपांतर होतं.

त्या दिवसांत रामगडमध्ये पी. ओ. डब्ल्यू. ची छावणी होती. इटालियन कैदी ठेवलेले होते. त्यांच्या चारी बाजूंना लाकडी ओंडके व काटेरी तारांचं कुंपण घातलेलं होतं. अधून मधून त्यांना एका गाडीत घालून या वाटेने कुठे पाठवीत कुणास ठाऊक. का आणि कुठे पाठवीत ते काहीच आम्हाला ठाऊक नव्हतं.

आम्हाला फक्त इतकीच बातमी मिळायची की सकाळी एक ट्रेन येऊन थांबणार आहे.

ठेकेदाराची चिट्ठी वाचून आदल्या दिवशी अंड्यांच्या टोपल्या दाखवून आम्ही भगौतीलाल कुकला सांगत असू, 'तीनशे तीस ब्रेकफास्ट,'

भगौतीलाल मोजून सहाशे साठ आणि वरची पंचवीस अंडी काढून घ्यायचा. काही अंडी सडकी निघाली तर म्हणून. त्यानंतर पाण्यात उकडल्यावर ती अंडी विटेसारखी घट्ट झाली की तीन कुलींबरोबर बसून त्या अंड्यांची वरची टरफलं सोलत बसायचा.

काटेरी तारांच्या पलीकडे याच टरफलांचा दिवसेंदिवस स्तूप तयार होत चालला होता.

भल्या पहाटे ट्रेन येऊन उभी रहायची. आणि त्याच बरोबर डब्यांमधून गाडीच्या दोहो बाजूंना मिलिटरी गार्डचे शिपाई धाडधाड खाली उतरायचे. संगीनधारी रायफली घेऊन ते युद्धकैद्यांवर पहारा करायचे.

कैद्यांच्या पट्ट्यापट्ट्यांच्या पोषाखातील ते परदेशी कैदी एकापाठोपाठ एक डब्यातून खाली उतरायचे. हातात ॲल्युमिनियमचं भांडं आणि थाळी असायची.

दोन मोठमोठ्या ड्रमना उलटून त्यांचंच टेबल करून तिथे वाढपी कुली उभे रहायचे. आणि ते कैदी रांगेने एकेक करून यायचे व ब्रेकफास्ट घ्यायचे. एक जण मग मध्ये कॉफी ओतायचा, एक जण ब्रेडचे दोनदोन तुकडे द्यायचा आणि एक जण दोनदोन अंडी द्यायचा. बस्स. त्यानंतर ते लोक पुन्हा गाडीत चढायचे. खांद्यावर आय ई, खाकी बुशशर्ट घातलेला गार्ड शिट्टी वाजवायचा, झेंडा हलवायचा गाडी चालू लागायची.

गावकरी जवळ येत नसत. दूर शेतात खुरपणी करता करताच ताठ उभे राहून डोळे विस्फारून बघत रहात.

गाडी निघून गेल्यावर मागची व्यवस्था भगौतीलालवर सोपवून आम्ही कधी कधी भाज्यांचा शोधात गावाकडे जात असू. डोंगरउतारावरच्या खडकाळ जमिनीत ते पालेभाजी, वांगी व दोडकी लावीत.

एक दिवस रातोरात 'अंडं हॉल्ट'चं हॉल्ट स्टेशन झालं. लाइनीच्या काठाला तारांनी वेढलेल्या जागेत मुरूम घालून त्या जागेला प्लॅटफॉर्मसारखं उंच करण्यात आलं.

तेव्हा मग नुसतरी पी. ओ. डब्ल्यू. च नव्हे तर मधूनमधून मिलिटरी स्पेशलदेखील

येऊन थांबू लागली. गॅबर्डीनची पॅंट घालून हिप–पॉकेटमध्ये रुपयाचं पाकीट ठेवलेल्या अमेरिकन सैनिकांची स्पेशल! मिलिटरी पोलीस गाडीतून उतरून पाय मोकळे करायचे, थोडाफार थट्टाविनोदही करायचे. आणि सैनिक तसेच रांगेने मग आणि थाळी घेऊन एकापाठोपाठ एक यायचे आणि ब्रेड, अंडी व कॉफी घ्यायचे. त्यानंतर ते गाडीत आपापल्या डब्यात चढायचे. खाकी बुशशर्टवाला गार्ड शिट्टी वाजवायचा, झेंडा हलवायचा आणि मी धावत जाऊन सप्लाय फॉर्मवर मेजरची सही घ्यायचा.

ट्रेन कुठे निघून जायची ते आमच्यापैकी कुणालाच कळत नसे.

त्या दिवशी देखील अशीच अमेरिकन सैनिकांची ट्रेन येऊन उभी राहिली. तिथे वाढपी कुली ब्रेड, अंडी व कॉफी वाढत होते. भगौतीलाल देखरेख करीत होता की एखादं अंडं सडकं तर नाही ना, आणि ब्रेडच्या दोन्ही बाजूच्या शेवटच्या स्लाइसेस टाकून दिल्या जात आहेत की नाहीत.

त्याचवेळी अचानक माझी नजर काटेरी तारांच्या आवारापलिकडे गेली.

काटेरी तारांपासून थोडं लांब, अर्धी विजार घातलेला एक गावकरी पोर डोळे विस्फारून बघत होता. कमरेच्या करगोट्यात लोखंडाचा तुकडा बांधून एका वासराच्या पाठीवर बसून जाताना हा मुलगा मला एक दिवस दिसला होता.

मुलगा थक्क होऊन ट्रेनकडे पहात होता, लाल तोंडाच्या अमेरिकन सैनिकांकडे पहात होता.

त्याला पाहून एका सैनिकाने 'ए -' म्हणून त्याला हाक मारली. त्याबरोबर तो मुलगा तिथून गावाकडे पळून गेला. ते बघून काही अमेरिकन सैनिक खो खो करून हसू लागले.

तो मुलगा आता पुन्हा कधी या बाजूला फिरकायचा नाही असं वाटलं होतं.

गावकऱ्यांपैकी कुणीच कधी येत नसे. कुणीसुद्धा नाही. ते आपले शेतात काम करता करता सरळ उभं राहून दुरूनच डोळे विस्फारून बघायचे.

पण त्यानंतर पुन्हा ज्या दिवशी ट्रेन आली त्या दिवशी पुन्हा दिसलं की कमरेच्या करगोट्यात लोखंडाचा तुकडा बांधलेला तो मुलगा काटेरी तारांपाशी येऊन उभा राहिला आहे. त्याच्याबरोबर आणखी एक मुलगा आहे. तो त्याच्यापेक्षा वयाने जास्त वाटत होता. गळ्यात लाल दोऱ्यात ओवलेला ताईत लटकत होता. एकदा भुरकुंडाच्या बाजारला गेलो होतो. तिथे तसल्या ताईतांचा ढीगच्या ढीग विक्रीसाठी जमिनीवर मांडलेला होता. सिंदूर, ताईतांचे ढीग, तांब्या-पितळेची-जस्ताची भांडी, काठीला लटकावून ठेवलेल्या रंगीत सुतळ्या, मण्यांच्या माळा, सारंच असतं त्या बाजारात. तिथं मी एक फेरीवाला बघितला आहे. खांद्यावर मण्यांच्या असंख्य माळा घेऊन, गुडघाभर धुळीतून कधी कधी तो दूरवरच्या गावीदेखील पायी जातो.

काटेरी तारेपलीकडून डोळे विस्फारून ती दोन्ही मुलं अमेरिकन सैनिकांकडे

पहात होती. आदल्या दिवशीच्या मुलाच्या डोळ्यात किंचित भीती होती. आणि कुणी जरासुद्धा डोळे वटारून दटावलं तर पटकन पळून जाता यावं म्हणून तो पाय उचलून तयारीतच उभा होता.

हातात फॉर्म घेऊन मी इकडे तिकडे करीत होतो. संधी मिळताच हसून मेजरचं आदरातिथ्य करीत होतो. डब्याच्या दारात उभा राहून मगमधून कॉफीचे घुटके घेणाऱ्या एका सैनिकाने त्या दोन्ही मुलांना पाहून जवळ उभ्या असलेल्या जी. आय्. ला म्हटलं, 'ऑफुल' (awcful)

इतक्या वेळ माझ्या लक्षातच आलं नव्हतं. ती मुलं मजेत शेतात काम करतात, कधी गोफणीने नाहीतर धनुष्यबाणाने एखादं जनावर टिपतात, तमाशावाल्यांची गाणी ऐकतात, तांदळाची दारू पितात, धनुष्याच्या दोरीसारखे कधी ताणून ताठ उभे राहतात. अर्धी विजार घातलेले, काटकुळे, काळे, कोरडे. पण त्या बेट्या जी. आय. चा 'ऑफुल' शब्द मला बोचला. दोघा मुलांचा मला राग आला.

सैनिकांपैकी कुणीतरी घसा खरवडून मोठ्यादा गायला, चारपाच जण खो खो करून हसले, एकाने आपल्या मगमधील कॉफी चटदिशी संपवली आणि वाढपी कुलीला डोळ्याने खूण करून दुसऱ्यांदा मग भरून द्यायला सांगितलं. गाडी सुटायला अजून किती वेळ आहे हे बघायला गार्ड पुढे झाला. गार्ड पंजाबी होता. पण मिजाशीच्या भरात मेजरशी नाकात बोलू लागला.

त्यानंतर शिट्टी वाजली, झेंडा हलवला गेला, सगळे जण भराभरा गाडीत चढले. हातांना रुंद लाल रिबिनी बांधलेले मिलिटरी पोलीसदेखील गाडीत चढले.

ट्रेन निघून गेल्यावर पुन्हा तीच निस्तब्धता. पोळणाऱ्या रेतीमधील निवडुंगाच्या झाडासारखं काटेरी तारांचं ते आवार. बस्स!

काही दिवसांनी पुन्हा एक ट्रेन आली. यावेळी पी. ओ. डब्ल्यू. गाडी होती. इटालियन कैदी रामगडहून पुन्हा कुठेतरी पाठवले जात होते. कुठे ते आम्हाला ठाऊक नव्हतं. जाणून घ्यायची इच्छाही नव्हती.

त्यांच्या अंगावर पट्ट्यापट्ट्यांचा आणखी एक कपडा होता. चेहरे कोमेजलेले होते. रायफली घेतलेले गार्ड सतत त्या ट्रेनचा पहारा करीत होते. आम्हालासुद्धा काहीशी भीती वाटू लागली. भुरकुण्डात अफवा कानावर आली होती की धोतर कुडता नेसून कुणीतरी पळून जायचा प्रयत्न केला होता. पण यश मिळालं नव्हतं. मी बंगाली असल्याने मला आणखीनच भीती वाटली.

ट्रेन निघून गेल्यावर मी पाहिलं. काटेरी कुंपणापलीकडे फक्त ती दोन मुलंच नव्हे तर उंच साडी नेसलेली एक पंधरा वर्षांची मुलगी आणि दोन पुरुष शेतीचं काम सोडून येऊन उभे राहिले होते. ट्रेन निघून गेल्यावर ते आपसात काय बोलले कुणास ठाऊक, मग हसले, आणि खळाळत वाहणाऱ्या झऱ्यासारखे गावाकडे निघून गेले.

एक, दोन, पाच ट्रेन येताना दिसताच दहाएक जण माळरानावरून धावत येत

असल्याचं त्या दिवशी दिसलं. ट्रेनच्या खिडक्यांवरचा खाकी रंग बघताच ते कदाचित ओळखत असावेत. दिवसा दोन पॅसेंजर मेल गाड्या धडाडत निघून जायच्या, एकदोन गुड्स ट्रेनदेखील खाडखाड करीत जायच्या. पण त्या थांबतील असं वाटून गावकरी कधीही गर्दी करीत नाहीत.

एक दिवस मी गावात जाऊन पाटलाला म्हटलं, ''आमच्या अंडं हॉल्टच्या तंबूत भाज्या आणि मासे विकायला माणसं पाठवत जा.''

म्हातारा हसून म्हणाला, ''शेतीचं काम सोडून कोण येईल?''

म्हणूनच त्या दिवशी मी थक्क होऊन बघतच राहिलो. अर्ध्या विजारी घातलेले काळेकुट्ट पुरुष आणि उंच साड्या नेसलेल्या बायका. उघड्या अंगाच्या पाटलाच्या पायात काय ते जोडे होते, गावच्या चांभाराने केलेले. सगळेजण काटेरी कुंपणाच्या आवारापलीकडे रांगेने उभे होते.

तोवर ट्रेन आली. अमेरिकन सैनिक धाडधाड खाली उतरले आणि मग व थाळ्या घेऊन रांगेने चालू लागले.

बी एफ थ्री थर्टीटू मध्ये त्यावेळी दोनशे अठरा ब्रेकफास्ट तयार होते. बी एफ थ्री थर्टीटू म्हणजे अंडं हॉल्ट.

त्या दिवसांत थोडी थंडी पडायला सुरुवात झाली होती. दूर डोंगरावर धुक्याची शाल पसरलेली होती. दवबिंदूंनी धुतल्याने झाडंझुडपं हिरवीगार झाली होती.

यांकी गळ्याने एका सैनिकाने आनंद व्यक्त केला.

दुसरा एक सैनिक डब्यासमोर उभा राहून काटेरी कुंपणापलीकडचा शून्यपणा एकटक नजरेनं पहात होता. अचानक हातातला कॉफीचा मग डब्याच्या पायरीवर ठेवून त्याने हिप पॉकेटमध्ये हात घातला. अधेली काढली आणि म्हाताऱ्या पाटलाकडे भिरकावली.

ते लोक थक्क होऊन त्या सैनिकाकडे पहात राहिले. काटेरी तारांच्या आत मुरुमावर चकाकत पडलेल्या अधेलीकडे बघत राहिले, आपसात एकमेकांकडे बघत राहिले, मग नुसतेच दंग होऊन पहात राहिले.

ट्रेन निघून गेल्यावर ते लोक चुपचाप चालू लागले तेव्हा मी म्हटलं, ''साहेबांनी बक्षीस दिलं आहे, बक्षीस.''

अधेली उचलून मी म्हाताऱ्या पाटलाच्या हातावर ठेवली. तो वेड्यासारखा माझ्याकडे बघत राहिला. मग सगळे जण गुपचूप निघून गेले. कुणाच्या ओठांवर चकार शब्द नाही.

या ठेकेदाराची ताबेदारी मला अजिबात पसंत नव्हती. तंबूत भगौतीलाल आणि तीन कुली यांच्याखेरीज दुसरी माणसं नाहीत, एकही पॅसेंजर गाडी थांबत नाही, आजूबाजूला कुणी नाही. सगळीकडे नुसती जीवघेणी निस्तब्धता. कोरडी माती, दुपारचं आभाळही कोरडंच, माझं मनही कोरडं.

गावकरी कधी या बाजूला फिरकत नसत. मीच मधून मधून जाऊन भाजी व मासे विकत आणायचा. ते आमच्या इथे विकायला येत नसत. तीन कोस पायी चालत भुरकुंडाच्या बाजारला मात्र जायचे.

कित्येक दिवसांपासून एकाही ट्रेनची बातमी नव्हती. सगळीकडे शांत मौन.

अचानक, कमरेच्या करगोट्याला लोखंडाचा तुकडा बांधणाऱ्या त्याच मुलाने एक दिवस येऊन विचारलं, ''बाबूसाब, टरेन नाही का येणार?''

हसत म्हटलं, ''येणार, नक्कीच येणार.''

मुलाची तरी काय चूक? लहान लहान डोंगर, कोरडी माती. गावकऱ्यांची एक साधी बस बघायचं म्हटलं तरी त्यासाठी खैराच्या रानातून दोन कोस पायी वाट तुडवीत जावं लागायचं. सकाळी एक पॅसेंजर ट्रेन वेगसुद्धा कमी न करता धाडधाड करीत निघून जायची. संध्याकाळची डाऊन ट्रेनदेखील थांबत नसे. तरीसुद्धा खिडक्यांमधून अस्पष्टसे दिसणारे चेहरे पहाण्याशिवाय, नवे चेहरे दिसल्याशिवाय आम्हाला चैन पडत नसे.

म्हणूनच अमेरिकन सैनिकांची स्पेशल ट्रेन येत असल्याची बातमी ऐकून आमची जरी धावपळ होणार असली तरी त्याचबरोबर मला बरंही वाटायचं.

थोड्याच दिवसांनी अगोदर बातमी आली. त्याच्या दुसऱ्याच दिवशी मिलिटरी स्पेशल आली. धाडधाड सैनिक उतरले, जी. आय. उतरले. सैनिकांनी रांगेने ब्रेड, अंडी आणि मग भरून कॉफी घेतली.

अचानक वर पाहिलं तर काटेरी कुंपणाच्या आवारापलीकडे गावकऱ्यांची गर्दी जमल्याचं दिसलं. वीस जण असतील, कदाचित तीसही असतील. गुडघ्याएवढ्या पोरांना मोजलं तर किती जण असतील ते विचारायलाच नको. उंच साड्या नेसलेल्या बायकाही वेड्यासारख्या डोळे विस्फारून बघत होत्या. त्या सगळ्यांना बघून माझा जीव वरखाली होऊ लागला. भगौतीलाल वा तिघा वाढपी कुलींना गावाकडे जाताना बघूनही मला भीती वाटायची.

प्लॅटफॉर्म नव्हताच. फक्त चढण्या-उतरण्याच्या सोयीसाठी लाइनीच्या काठाला मुरूम घालून जमीन थोडी उंच केलेली होती. कॉफीचे घुटके घेत अमेरिकन सैनिक सहज हिंडत होते. एकदोन जण गावच्या काळ्या लोकांकडे रोखून पहात होते.

अचानक एका सैनिकाने हिप पॉकिटमधून पर्स काढली. त्यातून दोन रुपयांची नोट काढून ती भगौतीलाल पुढे धरीत विचारलं, ''नाणी आहेत?'' नोट मोडून नाणी जवळ बाळगणं कुणाही सैनिकाला फारसं आवडत नसे. म्हणूनच दुकानदार, फेरीवाला किंवा टॅक्सी ड्रायव्हर यांना नोट दिली की उरलेले पैसे परत न घेता ते म्हणत, ''ठीक आहे, ठीक आहे.'' राचीला गेला असताना कितीदा तरी बघितलं आहे मी!

आणे, पावल्या, अधेल्या -- भगौतीलाल चिल्लर देत होता. तेवढ्यात दिसलं की काटेरी कुंपणा पलीकडच्या गर्दीतला तोच मुलगा हसत हसत हात पसरून काही तरी मागतोय.

नेमक्या त्याच वेळी भगोतीलालकडून घेतलेली ती मूठभर चिल्लर त्या अमेरिकन सैनिकाने गावकऱ्यांकडे भिरकावली.

एव्हाना सप्लाय फॉर्मवर सही घ्यायचं माझं काम संपलं होतं. गाडीने शिटी वाजवली होती.

ट्रेन हलली. मी वळून गावकऱ्याकडे पाहिलं.

ते लोक अजूनही चुपचाप उभे राहून बघत होते. त्यानंतर अचानक काटेरी तारा ओलांडून ती दोन मुलं आत आली आणि लाल मुरुमावर चकाकत पडलेल्या नाण्यांवर तुटून पडली.

त्याचवेळी कातडी जोडे पायात घातलेला तो म्हातारा पाटील ओरडला, ''खबरदार!'' तो इतक्या जोरात किंचाळला की मीसुद्धा दचकलो.

पण त्या मुलांनी त्याचं ऐकलं नाही. त्या दोघांनी जमेल तितकी नाणी त्यावेळी गोळा केली. मक्याच्या सोललेल्या कोवळ्या कणसांसारखे त्यांचे चेहरे हसत होते. स्त्रीपुरुषांची सगळी गर्दी हसत होती.

कातडी जोडे चढवलेला म्हातारा पाटील त्याच्या भाषेत काय काय बडबडत राहिला कुणास ठाऊक. स्त्रीपुरुष सगळे हसत राहिले.

म्हातारा पाटील संतापाच्या भरात एकटाच गावाकडे चालू लागला. गावकरीदेखील खळाळून हसत, गप्पा मारत निघून गेले.

ते सर्व निघून जाताच अंडं हॉल्ट पुन्हा शांत झालं, निस्तब्ध झालं, ओस पडलं. कधी कधी मी फार अस्वस्थ व्हायचा. दूरवर डोंगर, मोहाच्या झाडांची वनं, खैराची झाडं, त्यांच्यापलीकडे एक लहानसा ओढा, गावची हिरवीगार शेतं, आणि त्यात अर्ध्या विजारी घातलेले काळे लोक. डोळे मिटायचे, डोळे मिटायचे.

हल्ली वरचेवर अमेरिकन सैनिकांची ट्रेन यायची, थांबायची, ब्रेड, अंडी, मग भरून कॉफी पिऊन निघून जायची. गावकरी येत, गर्दी करीत, काटेरी कुंणापलीकडे ओळीत उभे रहात--

'-- साब बक्षीस, साब बक्षीस!'

एकाच वेळी अनेक गावकरी गिल्ला करीत. फॉर्मवर मेजरची सही घेता घेता दचकून मी मागे वळून पाहिलं.

दिसलं, फक्त त्या दोन मुलांनीच नव्हे तर कित्येक जवानांनी देखील हात पसरले आहेत. उंच साडी नेसलेल्या एका चलाख बाईने देखील!

एक दिवस भाजी विकत घ्यायला गेलो होतो. ती बाई हसत चौकशी करीत होती, 'टरेन कधी येणार आहे?'

कधी कधी ते असेच टोळ्यांनी यायचे, ट्रेनची वाट पहायचे नि निघून जायचे.

खांद्यावर पट्ट्या असलेल्या तीनचार अमेरिकनांनी एकदा हिप पॉकेटमधून मूठभर नाणी काढली आणि त्या लोकांकडे फेकली. त्या लोकांनी ट्रेन सुटायचीदेखील वाट बघितली नाही. पैशांवर अक्षरशः तुटून पडले. घाईघाईत काटेरी तारांखालून आत यायच्या धडपडीत कित्येकांचे हातपाय सोलले गेले. कित्येकांचे कपडे फाटले.

ट्रेन निघून गेल्यावर मी त्यांच्याकडे नीट लक्षपूर्वक पाहिलं. निम्मा गाव तिथे जमल्यासारखं मला वाटलं. सगळ्यांच्या चेहऱ्यांवर चलाखीचं स्मित होतं, प्रत्येकाला काही ना काही मिळालं होतं. पण डोळे चोळून चोळून पाहिलं तरी तो कातडी जोडे घातलेला म्हातारा पाटील काही दिसला नाही. म्हातारा आलाच नव्हता. त्या दिवशी त्याने दटावलं तरी त्या मुलांनी त्याचं ऐकलं नव्हतं, पैसे खाली टाकले नव्हते म्हणून रागावून कदाचित तो पुन्हा आला नसावा.

तो म्हातारा एकटाच शेतात नांगरट करतोय, ढेकळं फोडतोय ही कल्पना मला सुखावून गेली.

आमचे, भगौतीलालसकट आम्हा पाच जणांचे दिवस अंडं हॉल्टच्या तंबूत कसेबसे रेटले जात होते. मधूनमधून एखाद दिवशी सैनिकांनी भरलेली ट्रेन यायची, थांबायची, निघून जायची. गावकऱ्यांची गर्दी काटेरी कुंपणापाशी येऊन ओळीने उभी रहायची, आणि हात पसरून 'साब बक्षीस, साब बक्षीस' ओरडायची.

अचानक एखाद दिवशी म्हातारा पाटील मधूनच दिसायचा. कधी कधी शेतातलं काम सोडून हातांवरची धूळ झाडत धावत यायचा, रागाने सगळ्यांना दटावू लागायचा. नाहीतर कधी कधी लोकांनी त्याचं ऐकलं नाही की असहाय्यपणे रोषपूर्ण नजरेने गावकऱ्यांकडे पहात रहायचा.

पण त्याच्याकडे कुणीदेखली ढुंकूनसुद्धा पहात नव्हतं. हिप् पॉकेटमध्ये हात घालून खो खो हसत सैनिक मुठी भरभरून नाणी फेकायचे. गावकरी त्या पैशांवर तुटून पडायचे, हिसकाहिसकी ओढाताण करता करताच आपसात भांडू लागायचे. ते बघून सैनिक चेव आल्यासारखे हसायचे.

अखेर लागोपाठ कित्येक दिवस नीट पाहिल्यावर लक्षात आलं की कातडी जोडे घातलेला तो म्हातारा आताशा येत नाही. म्हातारा त्या लोकांवर रागवायचा, म्हातारा हल्ली येत नाही, याचा मला एकप्रकारचा गर्व वाटायचा. कारण कधी कधी त्या लोकांचं वागणं पाहून मी आणि भगौतीलाल खिन्न होत असू. आतल्या आत लाजेने मेल्याहून मेल्यासारखं आम्हाला होत असे. त्यांचा काळा वर्ण आणि हीन दीन

वेष बघून ते सैनिक त्यांना नक्कीच भिकारी समजत असले पाहिजेत. म्हणूनच मला खूप वाईट वाटे.

त्या दिवशीची गोष्ट आहे. काटेरी तारांपलीकडून ते 'बक्षीस बक्षीस' ओरडत गोंगाट करीत होते. खांद्यावर आय. ई. असलेल्या, खाकी बुशशर्टवाल्या जानकीनाथ गार्डशी मी बोलत उभा होतो. माझ्या जवळून एक अधिकारी कर्र कर्र करीत बूट वाजवीत चालला होता. अचानक त्या लोकांचा गोंगाट ऐकून थुंकल्यासारखं करीत म्हणाला, ''ब्लडी बेगर्स (bloody beggars)

मी आणि जानकीनाथने परस्परांच्या चेहऱ्याकडे पाहिलं. अपमानाने आमचे चेहरे काळवंडले. मान वर करून बघणं कठीण झालं. बस्स्! असहाय्य संतापाने आतल्या आत पेटत राहिलो.

ब्लडी बेगर्स, ब्लडी बेगर्स!

सगळा राग गावकऱ्यांकडे वळला. ट्रेन निघून जाताच भगौतीलालच्या मदतीने मी त्यांना तिथून हाकलून दिलं. वेचलेले पैसे कमरेला खोचत हसत ते पळून गेले.

तरीदेखील त्यांच्यापायी स्वतःची सारी लज्जा मी एका अहंकारात लपवून ठेवली होती.तो अहंकार डोंगरासारखा उंच होऊन माझ्या डोळ्यांसमोर उभा राहतो - म्हाताऱ्या पाटलाच्या चेहऱ्याच्या रूपात.

पण त्या दिवशी माझ्या छातीतली सगळी आग थंडगार झाली.

भुरकुंडाच्या ठेकेदाराला भेटायला गेलो होतो त्याचवेळी बातमी मिळाली.

दोन वाढपी कुली टेबलाचं काम देणाऱ्या त्या दोन ड्रमांना पायाने लोटत लोटत काटेरी तारांपलीकडे त्यावेळी नेत होते. तिसरा कुली तंबूच्या दोऱ्या सोडत होता. ड्रमला एक जोराची लाथ घालीत भगौतीलाल म्हणाला, ''खेळ संपला, संपला.''

अचानक गोंधळ ऐकून चमकून मागे वळून पाहिलं तर गावकरी धावत येताना दिसले.

थक्क होऊन आम्ही त्यांच्याकडे बघू लागलो. भगौतीलाल का कुणास ठाऊक हसू लागला.

दरम्यान ते लोक काटेरी कुंपणापलीकडे गर्दी करून उभे राहिले होते.

त्याचबरोबर एक शिटी ऐकू आली. ट्रेनचा आवाज ऐकू आला.

वळून पाहिलं तर ट्रेन अंडं हॉल्टकडे येत होती. खिडक्यावर खाकी पोशाख!

आम्ही वैतागलो, थक्क झालो. भुरकुंडाचं ऑफीस बातमी द्यायला विसरलं की काय? किंवा मी जी बातमी ऐकून आलो तीच चुकीची आहे?

ट्रेन जसजशी जवळ येऊ लागली. तसतशी गुणगुणण्याचा एक विचित्र आवाज ऐकू येऊ लागला. आणखी जवळ आल्यावर समजलं की ट्रेनमधले शिपाई सगळे एकत्र मिळून जोर- जोरात गात होते.

भान विसरल्यागत एकदा मी ट्रेनकडे पाहिलं, पुन्हा एकदा काटेरी कुंपणापलीकडील गर्दीकडे पाहिलं. आणि त्याच क्षणी मला तो म्हातारा पाटील दिसला. सगळ्या गर्दीबरोबर तोदेखील हात पसरून ओरडत होता, 'साब बक्षीस साब बक्षीस.'

ते सगळे वेड्यासारखे, भिकाऱ्यांसारखे ओरडत होते. ते देखील आणि तो म्हातारा पाटीलदेखील.

पण अमेरिकन सैनिकांची ती गाडी अन्य दिवसांसारखी अंडं हॉल्टवर थांबली नाही. पॅसेंजर ट्रेनप्रमाणे अंडं हॉल्टची उपेक्षा करीत धाडधाड निघून गेली.

आम्हाला ठाऊक होतं की ट्रेन आता कधीच थांबणार नाही.

ट्रेन निघून गेली. पण त्या गावचे सगळे लोक भिकारी झाले. शेतात काम करणारे सगळेच्या सगळे लोक - सगळे भिकारी झाले.

# पत्याच्या घरासारखं

## सैयद मुस्तफा सिराज

### १

### दीपक मित्र

खूप दूरवर धावलो. पण कुठंही कुठल्याही घराचं दार उघडं सापडलं नाही. खिडकीसुद्धा नाही. माणूसदेखील नाही. दाट अंधार. ओला रस्ता. शहरात जणू अचानक ब्लॅक आऊट झाला असावा. इतकी निस्तब्धता कशीशीच वाटत होती. खरं तर रात्रीचे दहा वाजले होते आणि नुकताच मागच्या बाजूला काहीतरी भयंकर प्रकार घडला होता. या शहराला घाबरून सोडण्यासाठी किंवा त्याचा आवाज बंद करण्यासाठी तेवढं पुरेसं होतं. माणसाचं रक्त दिवसेंदिवस अधिकाधिक थंडगार होत चाललं होतं, मन निष्ठुर होत चाललं होतं – तरीसुद्धा रामबाबू, शामबाबू, यदू आणि बसू हातात पिशव्या घेऊन भाज्यांच्या भावाविषयी घासाघीस करायचे - पायांखाली ताजं रक्त! आणि रक्ताला कुठलीही भाषा नसते.

मागे लांबवर - खूप लांबवर पायांची चाहूल ऐकून आणखी जोरात धावतो. मला ठाऊक आहे की यावेळी मी कितीही ओरडलो, हातापाया पडलो तरी कुणीही दार उघडणार नाही. फार काय खिडकी उघडून काय झालं ते बघायला कुणी बाहेर डोकावणारसुद्धा नाही. या अवेळी प्रत्येकाने कासवासारखे आपले हातपाय आखडून घेतले आहेत, आपल्याच ढालीखाली स्वतःला लपवून घेतलं आहे. आणि प्राणिशास्त्रात मी वाचलं आहे की कासवाच्या गळ्यातून कुठलाही आवाज उमटत नाही.

शहराचा हा विभाग मला अगदी अपरिचित आहे. धावता धावता मला एक गोष्ट मोठी मजेदार वाटली. बढाई मारताना असं म्हणतात की माणूस जिथे पोचला नाही अशी कुठलीही जागा जळी–स्थळी–नभी सध्या नाही. पण पृथ्वीचं सोडाच, या शहरातही अजून कित्येक जागा अशा आहेत जिथे आजवर माझे पाय लागले नव्हते. त्या जागा मला आजही अज्ञातच आहेत. आश्चर्याची गोष्ट आहे, नाही? नुसत्या बढाईने काय होतं? मी – सत्तावीस वर्षांचा दुर्दम्य युवक दीपक मित्र, मी अजून कितीतरी जागा पाहिलेल्या नाहीत, अजून कितीतरी गोष्टी मला अज्ञातच आहेत - आणि संकटांनी भरलेलं हे अनिवार प्रक्षोभक आयुष्य, कोणत्याही क्षणी बुडबुड्यासारखं फुटून जाईल. त्यासाठी एक लहानसा पोलादी तुकडादेखील पुरेसा

आहे आणि अरेरे, माझी व्यर्थ सत्तावीस वर्षं! पृथ्वी आणि जीवनापासून मुक्तता होण्यापूर्वीच मला जाळून टाकलं जाईल, नाहीतर पाण्यात फेकून दिलं जाईल, कावळ्या, कुत्री, गिधाडांच्या मेजवानीसाठी – हाय, सुंदर स्वादिष्ठ फळाच्या गरासारखं माझं शरीर, माझं तारुण्य, माझं मन -----!

म्हणून तर मी धावत होतो. माझं अवघं शरीर, तारुण्य, आणि मन आपापल्या भाषेत किंचाळत होते - 'पळ, जीव वाचव, पळ, जीव वाचव!'

त्यांनी अजून माझी आशा सोडली नसल्याचं मला ठाऊक होतं. मला मारल्याखेरीज त्यांना चैन पडणार नाही. ते सारखा माझा पाठलाग करताहेत. आणि आज संकटाच्या या काळ रात्री हे शहरसुद्धा विलक्षण रीतीने बदललं आहे – संस्कृतीचं बहरलेलं उद्यान प्रागैतिहासिक काळाचं घनदाट अरण्य बनलं आहे. सगळे स्कायस्क्रॅपर्स त्रस्त होऊन आपले बुरखे टाकून विशाल वृक्ष होऊन उभे आहेत. आणि सगळे रामबाबू, शामबाबू, यदुबाबू गुडघ्यांवर रांगत अंधारात त्याच आद्य स्वर्गीय वृक्षांचं मूळ शोधत आहेत – त्याच वृक्षांचं फळ खाल्ल्यानें मानवजातीची पार दुर्दशा झाली आहे. त्याच्या हातात आज त्या पाकिटात बंद असलेले तीनतीन लहान अस्त्रं आहेत - जाहिरातीत त्यांची किंमत आहे फक्त पाच पाच पैसे!

समोर आता एक तिठा दिसतोय. डावीकडे जावं की उजवीकडे - थोडा वेळ मागेपुढे करीत राहिलो. तेवढ्यात एका कर्कश आवाजाने कान बधिर झाले. ते अंदाजाने गोळ्या चालवत आहेत. स्प्लिटर्सचा काजव्यासारखा प्रकाश बघण्यासाठी मी पुन्हा पुन्हा माझी मान इकडे तिकडे वळवतो ही किती आश्र्चर्यजनक आहे, नाही? संकटातसुद्धा आपलं निर्बोध बालपण आपलं काम करीत राहतं.

पुढल्याच क्षणी उडी मारून डावीकडे निघालो. त्यानंतर उंचावर थोडा प्रकाश दिसला. खिडकी उघडून कुणी दुःसाहसी चेहरा - जणू एखादा कैदी गोरिला गजांना नाक घासत असावा. निर्जन वाडा. फाटकावर धनुष्यासारख्या वेली पसरलेल्या. कोण जाणे कुठल्या फुलाचा वास इच्छेविरुद्ध माझ्या मस्तकात भिनत होता. फाटकाचं छातीएवढं उंच दार ओलांडून आत पलीकडे पोचलो, तेव्हा कुठे जिवात जीव आला. त्यावेळी आठवलं की अशातऱ्हेच्या घरांतून बहुधा कुत्री असतात. बाहेर पाटीवर लिहिलेलं असतं-कुत्र्यांपासून सावध रहा. पण आत आलो तरी गुरगूर काही ऐकू आली नाही, त्या अर्थी या घरात कुत्रा नाही. आणि समजा, असला तरी तो यावेळी बांधलेला असला पाहिजे.

मी जरा दम घेतला. बाहेर आता आवाज ऐकू येत नाही आहे. ते लोक कदाचित दुसऱ्या गल्ल्यांमधून मला शोधत धावत असावेत. शोधू देत - निदान काही वेळ तरी आता मी निश्र्चित आहे. वरच्या उघड्या खिडकीतल्या अंधुक प्रकाशात मी आत नजर टाकली. एक मोठं लॉज, दोहोबाजूंना झाडं, फुलांचे ताटवे आणि या अंधाऱ्या धोकादायक विभागात या संकटसमयी मेंदीचं हे धाडस! भलतं धाडस! रागाने

आणि बेचैनीने डोकं तापलं. हे काही बरं नव्हे, अजिबात बरं नव्हे. वाटलं, शहरातल्या साऱ्या फुलझाडांना थप्पड मारून म्हणावं, बस करा आता! सगळ्या चिमण्यांना धमकवावं, खबरदार, इथे यायचं नाही. प्रियकर प्रेयसींना दटावावं. पतिपत्नींना एकमेकांच्या कुशीत निजू देऊ नये. आणि कारागिरांनी मरून जावं, इंजिनीयरनी हात आखडून घ्यावा, शास्त्रज्ञांनी आता विश्रांती घ्यावी.

त्याचवेळी दूर कुठेतरी धम धम आवाज झाला. इमारती हादरल्या. गाड्यांचा घरघराट, गडगडाट ऐकू आला. बाहेर क्षणभर मोठा प्रकाश झलक दाखवून पुन्हा अंधारात विलीन झाला. पोलिसांचा छापा. आता पोलीस आले आहेत.

मागच्या मागे झेप घेतली. समोर रुंद जिना आहे. रेलिंगच्या साऱ्याचा मोठा दरवाजा उघडा आहे. याचा अर्थ आहे की फ्लॅट असलेलं घर आहे. बेवारशी संपत्तीसारखं. रामबाबूंना वाटतं की जिन्यासमोरचं दार शामबाबू लावतील, शामबाबूंना वाटतं यदुबाबू लावतील आणि समजा,एखादा पहारेकरी असला तरी तो नशेत धुंद होऊन पडला असेल. हो, हो, तोच आहे. जिन्याच्या पायऱ्यापाशी एकीकडे एक लहानशी कोठडी आहे - तिथे खाटेवर स्तब्ध पडलेला माणूस नक्की तोच आहे. चुपचाप बऱ्याच पायऱ्या चढून वर जाऊन पाहिलं. दुसऱ्या मजल्याच्या जिन्याच्या टोकाशी एक बल्ब जळतोय. बल्बवर धूळ साचलेली आहे. सुरुवातीला फाटक, फुलझाडं वगैरे बघून वाटलं होतं की घर स्वच्छ आणि सुंदर असेल. पण हळूहळू त्याच्या म्हातारपणाची, जर्जरतेची व अव्यवस्थेची लक्षणे दिसू लागली. जसजसा वर चढू लागलो तसतसं आपण एखाद्या रहस्यमय जागेत शिरत असल्यासारखं वाटू लागलं. दुसऱ्या मजल्यावरच्या चार दारांना कुलपं लावलेली होती. सगळेजण कट करून कुठे गेले की काय? तिसऱ्या मजल्यावर तीन बाजूंना तीन दारं आहेत. वरचा बल्बदेखील तितकाच मळलेला आहे. इथंदेखील दोन दारांना कुलपं आहेत, एकाला नाही, तर मग याच खोलीच्या खिडकीत तो गोरीला दिसला असावा. तो सहकुटुंब रहातोय की एकटा? कुठल्याही फ्लॅटवर कुठलीही नावाची पाटी नाही, कुठलीही कॉलिंग बेल नाही, काय चमत्कारिक आहे! भिंतीवर लाल व काळ्या शाईने लिहिलेल्या अगणित गोष्टी – त्या मला व सगळ्यांनाच ठाऊक आहेत. माझं अंग शहारलं. ही जागा कदाचित माझ्यासाठी निर्विघ्न नसावी. मी कदाचित जाणून बुजून 'त्यांच्या'च पैकी कुणाच्या तरी तावडीत चाललो असेन.

मी अर्धमेला झालो. दुसरा काहीच उपाय नाही. खिशात हात घालून. ३८ कॅलिबरचं रिव्हॉल्व्हर घट्ट धरलं. एकच गोळी फक्त शिल्लक उरली आहे. पुरेल ती. निदान काही तास तरी मला सुरक्षित रहायलाच हवं – आगामी असंख्य तास, दिवस, महिने, वर्षं बचावून राहण्यासाठी! आणि ते माझ्यासाठी फार आवश्यक आहे. अरे दैवा! माझी सत्तावीस वाया गेलेली वर्षं! विमुग्ध मांजरीच्या पिल्लांसारखी ती माझ्या आत निमूटपणे टक लावून बघत बसली आहेत.

अगदी हलकेच कडी वाजवली. दोनदा. त्यानंतर मग हळू हळू दाराला धक्का दिला ---

२

**हिरण्मय दत्तराय**

--- हा काय प्रकार आहे? पुन्हा वीज गेली. पाऊस आणि सगळी गडबड एकदम एकाच वेळी सुरू होते. मेणबत्त्या विकत घेता घेता दिवाळं वाजलं. कॉर्पोरेशन---

त्याचवेळी सून धावत आली. --- ऐकलंत का? आज रात्री पुन्हा सुरू झालं आहे.

मी दचकलो, ''काय? काय सुरू झालं आहे?''

राणू माझ्यावर रागावली आहे का? खरं म्हणजे या म्हातारपणाने माझे कान बिघडून टाकले आहेत - अगदी डोळ्यांसारखेच - हे तिला समजायला हवं. तिला कदाचित ठाऊक असावं तरी रागावते माझ्यावर. राणू दिवसेंदिवस माझ्यावर जास्तच रागावत चालली आहे हे मला ठाऊक आहे. माझं अचानक उसळून झेप घेणं, तळमळणं, खिडकी उघडून रात्रंदिवस खाली बघणं आणि अचानक 'कोण आहे' म्हणून दाराकडे धाव घेणं - सगळंच तिला विक्षिप्तपणाचं वाटतं. मला कल्पना आहे त्याची. सौमेनचं चित्र बैठकीत लावणं तिला अजिबात पसंत नाही. सौमेनचा अलीकडचा असा हा एकच मोठ्या आकाराचा फोटो आहे. याखेरीज त्याचे जितके फोटो आहेत ते खूप पूर्वीचे आहेत आणि काही बायकोबरोबर घेतलेले आहेत. ते सगळे फोटो फॅमिली आल्बममध्ये आहेत. आल्बम कधी मी माझ्या खोलीत ठेवतो तर कधी राणूला देतो किंवा तीच कधी मागून नेते. पण हल्लीचा सौमेन काही त्यात दिसत नाही. हल्ली त्याला टक्कल पडायला लागलं होतं, जबडा आत शिरू लागला होता. हळू हळू त्याच्या लावण्याला ओहोटी लागली होती. या नव्या फोटोत या सगळ्या गोष्टी आलेल्या आहेत. सौमेन माझा एकुलता एक मुलगा, माझा लाडका सौमेन! देवापाशी प्रार्थना करीत होतो की त्याची सगळी इडापिडा मला दे! जगातल्या शत्रू-शक्तींशी सामना करायची कला या म्हाताऱ्याला अवगत आहे. मोठमोठ्या दुर्दान्त गोष्टी मी पाहिल्या आहेत. मोठमोठ्या भयंकर घटना, गोळा फुटताच झेपावणारी सर्वनाशी आग, वादळवारा, अज्ञात दैत्यांशी दोन हात करावे लागले आहेत. किती संकटांतून पार पडलो आहे. आणि सगळं काही सहन करून, सर्व काही जिंकून आजही जिवंत आहे. म्हणूनच मला त्रास आणि दाह, आधी व्याधी, छळ सहन करण्यात कसलीच अडचण येणार नाही. पण सौमेन? तो अजून तरुण आहे. त्याचं मन नवं आहे, त्याचा आत्मा अतिशय कोमल आहे. त्याला अजून जगाकडून फार मोठ्या अपेक्षा आहेत. तो जीवनाला अतिशय अतूट मोहातून विलक्षण गंभीर स्वप्नाकडे घेऊन चालला आहे. मी प्रार्थना करतो, त्याचे सगळे कष्ट, व्यथा, वेदना त्रास मला मिळोत - त्याचं सुख मात्र त्याचंच राहो. पण -

फोटोविषयी सांगत होतो. हा फोटो त्याने का काढून घेतला हे त्यावेळी समजू शकलो नव्हतो. पण जणू नंतर समजलं. ही होती जाताना सांत्वन देण्यासाठी दिलेली एक ताजी स्मृती! जणू जाणून बुजूनच तो आपल्या वडिलांना व पत्नीला ती देऊन गेला होता. जणू, याच्या आधारे जगत रहा हेच तो सांगून गेला असावा.

हो, मी बहात्तर वर्षांचा म्हातारा आहे - मला फक्त स्मृतींवरच जगता येण्यासारखं आहे. पण सून राणू? तिला जगणं कठीण आहे. तिची शारीरिक मानसिक सारी कामं अजून अपुरी आहेत. तिला हवं आहे सौमेनचं शरीर - त्याचं प्रत्यक्ष अस्तित्व, नुसता परोक्ष आभास नव्हे. म्हणूनच राणूला काय खुपतंय तेदेखील मला ठाऊक आहे. विवश संतापाने तिचा जळफळाट होत असतो हे मला ठाऊक आहे. ती आपल्या पतीला शाप देत असते. डोकं आपटून शिव्या देत असते. ती कदाचित त्याला भ्याड समजत असावी. तरीदेखील मी राणूला दोष देत नाही. खरं म्हणजे, असं घर सोडून पळून जायचं होतं तर लग्न तरी कशाला केलं सौमेनने? त्याने स्वतःच बायको निवडली होती. मला तर काहीच माहीत नव्हतं. नंतर समजलं तेव्हा आनंदच झाला होता. मोठ्या हौसेने सून घरात आणली होती --- आणि त्यानंतर जर राणूने रागाच्या भरात कुणाबरोबर---.

अशक्य वाटतं ते! हल्लीच्या मुलींमध्ये शरीराची भूक अनावर झाल्याचं पाहिलंय मी तेच, काय नाव आहे त्याचं, सेक्स, यौवन --- कळतं नकळत त्या त्याला बळी पडत आहेत-पोकळ कवच फोडून बाहेर पडणे हाच कदाचित आधुनिकपणाचा अर्थ असावा --- आधुनिक संस्कृती त्यांना हळूहळू हेच शिकवीत आहे की नव्या नीतिनियमांना आणि कामवासनेला मुक्त केल्यानेच मानवाचा आत्मा मुक्त होईल. ते काही असो. राणूला तरी अजून या विचारांची लागण लागलेली दिसत नाही. शिवाय तिचं घराणं, तिचं शिक्षण, तिचं व्यक्तित्व - हे सगळं माझी खात्री करून द्यायला पुरेसं आहे. ईश्वरचन्द्र विद्यासागरचं डोकं फोडायला मी काही प्रागैतिहासिक काळातला रानटी माणूस नाही. सौमेन जर खरंच मरण पावला असेल तर मग राणूचे वडील काहीही म्हणोत; मी तिचा पुनर्विवाह करून द्यायची खटपट करीन. अर्थात ते राणूच्या मर्जीवरच अवलंबून राहील.

अरे हो! मी तरी कसल्या विचारात गुंतलो! छाती धडधडू लागली माझी. हातापायांना कंप सुटला आहे. सौमेन, माझा एकुलता एक मुलगा सौमेन! तर काय मी नकळत त्याच्या मृत्यूची इच्छा करू लागलो की काय? नाही, नाही - तो असेल तिथे सुखात राहो. त्याला काय वाटेल ते करू देत, माझा आता मुळीच आक्षेप नाही - बस् तो जिवंत राहो! वर्तमानपपत्रात आजवर किती जाहिराती दिल्या, प्रत्येक पोलीसस्टेशनला बातमी दिली, ओळख न पटलेली जितकी प्रेतं होती त्यांचे फक्त फोटोच नव्हे, तर तिथे खुद्द जाऊन स्वतःच्या डोळ्यांनी ती प्रेते बघून आलो आहे - किती वेळा किती प्रेतांना मी सौमेन समजलो आहे त्याची गणतीच नाही. थोड्याच

दिवसांपूर्वीची गोष्ट आहे. नऊ प्रेतं होती. त्यापैकी एकाला मी सौमेन समजून ते प्रेत ताब्यात घेतलं. तेवढ्यात दुसरा एक माणूस येऊन म्हणाला की, 'हा तर आमचा मृगांक आहे.' खूप गोंधळ माजला. विचारपूस, तर्क वितर्क - अखेर हात हलवीत परत आलो. हो, तो मृगांकच असावा, सौमेन नव्हे.

म्हणूनच वाटतं की तो पोलिसांच्या भीतीने नाहीतर दुसऱ्याच कुठल्या कारणाने लपला असावा. आपल्या वडलांना व बायकोला भेटायला तो लवकरच परत येईल. नक्कीच येईल. कारण त्याच्यासारख्या मुलाने स्वतःची बाजू मांडून जाणं जरुरी आहे. पत्र लिहिण्यात काही अडचण असेल किंवा पत्रात सारं काही लिहिण्यासारखं नसेल, त्यात क़दाचित धोकाही असेल, म्हणूनच तो आपली बाजू समोरासमोर मांडायला येईल. एखादे वेळी गुपचूप येऊन कडी वाजवील. अचानक अशीच वीज गेलेली असेल, अंधार पसरलेला असेल, मध्यरात्रीची वेळ असेल, घाट आणि रस्ते निर्जन असतील, वादळवारा, पाऊस थैमान घालीत असेल, अशावेळी तो ओल्या कपड्यांनी तीन जिने चढून वर येईल. या इमारतीतल्या सगळ्या फ्लॅटना कुलपं लागल्याचं त्याच्या लक्षात येईल. सगळेजण मोहल्ला सोडून पळून गेले आहेत, किती विलक्षण स्तब्धता दिसेल त्याला ---

हो, म्हणूनच तर मी पहारेकऱ्याला सांगून ठेवलं आहे की जिन्याचं दार रात्रंदिवस उघडं राहू देत जा. तसा तो भित्रा आहे, पण मनाने चांगला आहे. त्याच्या सहृदयपणामुळेच तो जिन्याचं दार उघडं ठेवतो. मात्र भित्रेपणामुळे फाटकाचं दार तेवढं तो लावून ठेवतो. आणि मी एक खिडकी उघडून रस्त्याकडे पहात रहातो - रात्रभर - रात्र रात्रभर. मला झोप येत नाही. कारण मी झोपलो आणि तो आला तर - माझ्यासमोर येऊ उभं रहायला त्याला लाज वाटेल (लहानपणी उगाचच मला भ्यायचा!) राणू दार उघडील - तो राणूच्या खोलीत निघून जाईल - आणि --

राणू कधी निघून गेली? मघाशी काय बरं सांगत होती? काय चाललंय? अरे हो! या विभागातल्या मुख्य वीजपुरवठा केंद्रात काही गडबड करून ते काय करताहेत कुणास ठाऊक? पुन्हा पुन्हा विस्फोट होत आहेत. कुणाशी कुणाची जुंपली आहे कुणास ठाऊक? मला तर काहीच ठाऊक नसतं. ते ठाऊक नसणं हेच माझं दुर्दैव झालंय. माझ्या मुलाविषयीदेखील मला ठाऊक नसायचं. म्हणूनच तर हे भोग भोगावे लागत आहेत.

पुन्हा खिडकीशी जायला हवं. राणूने येऊन मला तिथून बाजूला केलं होतं. अरे वा! दिवे आले की! या दरम्यान जर सौमेन रस्त्यावरून गेला असेल तर मी त्याला मिस केलं की! तर मग आता यावेळी तो चुपचाप जिन्याच्या पायऱ्या चढत असेल - हळूच कडी वाजवील, कदाचित हलक्या आवाजात हाक मारील - राणूच्या नावानेच हाक मारील. मारू देत, मला पत्ता लागेलच म्हणा ---

## ३

## राणू दत्तराय

एक रात्र काही निवांत जाऊ देत नाहीत. घ्या, झालं पुन्हा सुरू. आज रात्रभर हा गोंधळ चालेलसं वाटतं. वारंवार झोपमोड होत रहाणार. रागावून रागावून दमेन आणि दमून दमून दुर्बल होईन. रडू येईल. पण आज रडणं किती लाजिरवाणं आहे. आत्मधिक्कार आणि आत्मग्लानीची बाब आहे. आपली असहायता पूर्णपणे व्यक्त झाली की माणूस नक्कीच शांत होतो. मीदेखील शांत व्हायला हवं. पण कुठे जमतं ते? ते कोण आहेत हे मला पुरतं समजलंच नाही. इतकंच कळलं की त्यांच्यात कुठल्यातरी भयंकर ज्वाळेची आग आहे आणि तो अग्नीच अचानक आपल्या रौद्र स्वरूपात कुणाकुणापाशी प्रगट होऊन त्याला ग्रासून टाकतो. माझ्या पतीलादेखील ग्रासून टाकलं. आणि या गोष्टीने माझं जितकं समाधान होतं. तितकाच रागही येतो. समाधान, सांत्वन - माझ्यासारख्याच आणखी किती स्त्रियांचे पती, पिता, वा पुत्र त्यांच्या तावडीत सापडले असतील कुणास ठाऊक? चीड येते ती याचीच की आम्हाला काहीसुद्धा करता येत नाही, आमच्या हातात काहीच नाही. कित्येक महिन्यांपूर्वी तो मोठा कारखाना बंद पडल्याने माझ्या पतीची नोकरी गेली. घरभाडं थकू लागलं. घरखर्चाची ओढाताण होऊ लागली. विलासी वृत्तीचे माझे सासरे बचत करण्यात हुशार नव्हते. त्यांच्या पेन्शनच्या पैशांत कसबसं भागतंय. पण याला काय आयुष्य म्हणायचं? मला त्रास होतो. आतल्या आत मी तळमळते. बाहेर पडून काहीतरी करावं असं मनात येतं. पण मामंजी अगदी जुनाट विचारांचे, कोत्या वृत्तीचे आहेत. कदाचित अतिशय भित्रेदेखील आहेत. पतीसाठी धावपळ करावी, असं मला वाटे. कदाचित त्यांचा पत्ता लागलाही असता. पण मामंजी मला कुठे एकटे जाऊच देत नाहीत. कधी कधी वाटतं हा एकप्रकारचा तुरुंगवासच आहे. नकळत मी एका पिंजऱ्यात अडकले आहे. आणि या स्वार्थी म्हाताऱ्याने मला आपल्या रिकाम्या पेटीवर यक्षासारखं बसवून ठेवलं आहे.

नाही, आता आणखी राहवत नाही. असह्य झालं आहे. यावेळी मी नक्कीच पळून जाईन. इथे आणखी कशाकरता थांबू, सांगा बघू? ही निस्तब्धता आणि खोटी प्रतीक्षा, हे एकसुरी रात्र आणि दिवस --- देवा रे! एकेक करून सगळे भाडेकरूदेखील हे घर सोडून निघून गेले आहेत. मोहल्लादेखील रिकामा होत चालला आहे वाटतं! बस्, काही म्हातारे म्हाताऱ्या आणि पोरंसोरं काय ती राहिली आहेत. मधून मधून बॉंब पडल्याचे आवाज, गोळीबाराचे आवाज यांचीच काय ती सोबत राहिली आहे. दोनचार वेळा अस्पष्ट गर्जना वा आर्तनाद यांच्याखेरीज इथे सतत निस्तब्धता पसरलेली असते. कधी कधी कुणी रस्त्यावरून सरपटत जाते. याशिवाय दुसरे कुणी लोक इथे नाहीतच मुळी. या पेंगत पडलेल्या यक्षपुरीत माझा बावीस वर्षांचा तरुण जीव गुदमरतो आहे. मी नाही आता रहाणार - नक्कीच पळून जाईन.

पण कुठे जाऊ? आईवडील मनातल्या मनात माझ्यावर नाराज आहेत. त्यांनी निवडलेल्या स्थळाला नाकारून मी अपमान केला होता. त्यांच्या मर्जीविरुद्ध दुसऱ्या एका माणसाशी मी गुपचूप लग्न लावलं होतं. रजिस्टर्ड झाल्यानंतर दोन्ही पक्षांच्या लोकांना आम्ही सगळं काही सांगून टाकलं होतं. माझ्या घरात बरेच दिवस भूकंप आणि अग्निप्रलय होत राहिला. माझ्या पतीच्या घरी असलं काही घडलं नाही हे खरं. माझ्या सासूबाई हयात असत्या तर कदाचित घडलं असतं. कारण या अशा बाबतीत बायकाच बायकांच्या सर्वांत जास्त वैरी असतात. माझी आईच माझी सगळ्यात मोठी वैरीण आहे, हे मी ओळखून आहे. म्हणूनच तर तिथे परत जायचा प्रश्नच नाही. शत्रू हसतील. तर मग कुठे जावं? मनातल्या मनात मी शोध घेत असते, विचार करीत असते. विचार करण्यातच रात्रंदिवस निघून जातात. तरीदेखील मी पळून जाणार हे निश्चित! दिवसेंदिवस माझ्यातला जीवनरस सुकत चालला आहे. आणखी काही दिवस राहिले तर मरून जाईन. नाही, नाही - मला मरायचं नाही, मला जगायचं आहे.

जाण्यापूर्वी ते काहीच सांगून गेले नाहीत. एक दिवस संध्याकाळी चहा घेतल्यावर अचानक बाहेर निघून गेले. दिवसभर अतिशय विमनस्क होते. ते फार लवकर अस्वस्थ व्हायचे म्हणून मी त्यांना काही विचारीत नसे. का कुणास ठाऊक, पण ते फार तापट झाले होते. नोकरीमुळे ते अस्वस्थ असावेत असं मला वाटायचं. ते खूप काम करायचे. चुपचाप घरातून बाहेर पडायचे. कधी परत येतील त्याचा काही नेम नसे. मामंजींचा जीव वरखाली व्हायचा. परत आल्यावर त्यांना काहीतरी सांगत, पण मला नाही. त्याची गरजच नसायची. रात्री मी त्यांच्या कुशीत शिरायची. त्यांचा स्पर्श मला हवासा वाटायचा. सवयीमुळे शरीराची भूक जागी व्हायची. पण ते कूस बदलून मला हलकेच बाजूला करून म्हणायचे, ''खूप उकडतंय. जरा पलीकडे सरकून नीज राणू!'

मला रडू यायचं. ते माझ्यावर रागावलेत की काय असं वाटायचं. उगाच संशय? काही अविश्वास? की कुणी तरी माझ्याविरुद्ध त्यांचे कान फुंकलेत? पण मनाने नसेना, शरीराने मी निष्पाप असल्याचं त्या ईश्वराला ठाऊक! मी चुपचाप अश्रू गाळायची.

विचित्र गोष्ट होती, त्यांना ते लगेच समजायचं. अचानक मला मिठीत घेऊन माझ्यावर चुंबनांचा वर्षाव करीत म्हणायचे, 'तुझ्यावर माझा राग नाही, कुणाचाही राग नाही. माझा सगळा राग, सगळं दुःख स्वतःवर आहे. मी आता मला स्वतःलाच सहन करू शकत नाही. माझ्यावर विश्वास ठेव राणू - मी अतिशय जळतोय, विलक्षण जळतोय!'

स्त्रीची नैसर्गिक प्रेरक भूमिका घेऊन मी म्हणायची, 'तुमचा सगळा दाह मला देऊन टाका.'

'वेडी!' --- असं म्हणून ते गप्प व्हायचे त्यांच्या हातांची मिठी सैल व्हायची. त्यानंतर ते स्वस्थपणे निजून रहात.

ते बघत आहेत, कसला तरी विचार करीत आहेत हे मला ठाऊक असे. मी म्हणायची, ''काय आहे ते मला नाही का सांगणार? तुमच्या पाया पडते, मला सांगा.''

ते काही उत्तर देत नसत. कधी कधी म्हणायचे, ''काही नाही.''

वाटायचं, त्यांना जो काही त्रास आहे तो फक्त पैशांचाच आहे. माणूस बेकार असला की असं होत असावं. म्हणायची, ''फार विचार नका करू. काही ना काही मिळेलच ---''

निघून जायची आदली रात्र - जणू निद्रेच्या खुमारीत बराच वेळ काहीतरी सांगत राहिले. मी तोवर झोपले नव्हते. त्यांचा आवाज ऐकून दचकले. छाती धडधडू लागली. काय म्हणताहेत हे?----

ट्रेटर --- मी ट्रेटर --- अरेरे, मी ट्रेटर आहे ---

काय समजलं – काय नाही कुणास ठाऊक? रहस्यमय काळा पडदा जणू अचानक जरासा बाजूला सरकला. कदाचित मी सगळं चुकीचं ऐकलं असेल, चुकीचं समजलं असेल. तरीदेखील माझं रक्त गोठून गेलं. पाय जड झाले. हळूहळू डोकं बधिर होऊ लागलं. निमूटपणे पडून राहिले.

ही गोष्ट मी आजवर मामंजींना सांगितलेली नाही. सांगणं योग्य वाटलं नाही. काय झालं ते मला ठाऊक आहे. माझ्या या बांगड्या आणि हा सुवासिनीचा वेष खोटा आहे. दुसऱ्यांच्या घरात मी सून म्हणून रहाणं योग्य नाही - ते आता कधीच परत येणार नाहीत.

तरीदेखील प्रतीक्षेचा काटा रक्तात बोचत राहतो. जिन्याच्या विशाल पोकळीत वारा वाहात असतो, आवाज होत राहातो. वाटतं, कुणीतरी कडी वाजवतंय. मी गडबडीने उठून बसते. दाराकडे धाव घेते. दार उघडतानाच, काय बोलायचं ते मनात ठरवून टाकते. दार उघडते. अंधुकशा छायेची पिवळट रेखा थरथरत नाहीशी होते. अथांग शून्यतेच्या थरकापाने एक आभास विरघळून जातो. पाठोपाठ मामंजी धावत येतात. श्वास रोखून अस्फुट आवाजात विचारतात, ''आला? सौमू आला? सौमू आहे ना? कोण? सूनबाई, अग सूनबाई, बोलत का नाहीस?''

काय बोलू? सांगते, ''वारा होता'', आणि आत परत येते. येताच बैठकीतला हा फोटो दिसतो. राग, क्षोभ आणि दुःखाने तो फोडून टाकावंसं वाटतं. जो समोर नाही त्याच्या निश्चल प्रतिबिंबाकडे बघून ओरडावंसं वाटतं, 'ट्रेटर! विश्वासघातकी!---''

## ४
## दीपक मित्र

जिने दार उघडलं तिला मी ओळखत नाही. पण तिच्या बाजूला खोलीत आत उंचावर टांगलेलं ते मोठं छायाचित्र कुणाचं आहे ते मला ठाऊक आहे. त्याच्याशी माझी चांगली ओळख आहे. क्षणभर माझ्या मस्तकात आगीचा लोळ भडकला. कानातून उष्ण वाफा निघू लागल्या. डोळे लाल झाले. सौमेन! हे सौमेनचं घर आहे! आणि अखेरीस मी इथे येऊन ठेपलो!

माझ्या चपापण्याकडे त्या स्त्रीचं लक्ष गेलं की नाही ते काही माझ्या लक्षात आलं नाही. पण तीदेखील मला बघून दचकली. एक पाऊल मागे सरत कापऱ्या आवाजात तिने विचारलं, ''कुणाला? कुणाला भेटायचं आहे?''

मी सावरलो. थंड स्वरात म्हणालो, ''आज रात्री मी इथंच रहाणार आहे. आरडाओरडा करू नका. त्याचा काही उपयोग होणार नाही. मी तुम्हाला कसलाही त्रास देणार नाही. फक्त आजची रात्र ---''

किती आश्चर्य! ती स्त्री मागे सरकली. मी चटकन् दार लावून घेतलं. पुढे झालो आणि धपदिशी खाली बसलो. म्हणालो, ''एक ग्लास पाणी द्या. फक्त पाणी पुरे. इतक्या रात्री आता खाण्यासाठी तसदी देणार नाही. एखादी चटई असेल तर द्या. इथेच झोपेन.''

ती काही बोलली नाही. सौमेनची बायको? तर मग अजून सुवासिनीचा वेष कशासाठी? या लोकांना अजून बातमी कळलेली नाही?

हात खिशात घालून ठेवले होते. उगाच गडबड केली तर बाहेर काढून भीती दाखवायला बरं. पण जरूर लागेलसं वाटत नाही. हात बाहेर काढला. खोलीत नजर फिरवली. दोन खोल्या आहेत. दारावर मळका व फाटका पडदा आहे. खोलीत सामान फारसं नाही. एका रॅकवर काही पुस्तकं आहेत. एक टेबल, दोन खुर्च्या. भिंतीवर कॅलेंडर. आणि स्टुलावर सौमेनचा फोटो. फोटोकडे बघायची भीती वाटते. सौमेन जणू अजूनही म्हणत असावंसं वाटतं, ''तुझ्या चेहऱ्यावरून तू खुनी वाटत नाहीस. मी तुला भीत नाही, दीपू!''

लवकरच पाणी आलं. तिच्याकडे न बघताच एका दमात पिऊन टाकलं. त्यानंतर ग्लास खाली ठेवणारच होतो तेवढ्यात तिने हात पुढे करून तो घेतला. ती आत जाऊ लागली. मी हाक मारली, ''अहो -''

सावकाश वळून उभी राहिली.

''घरी कोण कोण आहे?''

''मी आणि बाबा.''

''हा ज्यांचा फोटो आहे ते कुठे आहेत?''

''ठाऊक नाही.''

"तुम्ही कोण आहात?"

"या घरची सून."

"हा फोटो तुमच्या पतीचा वाटतं?"

"हो."

थोडा वेळ गप्प राहिलो.

सौमेनच्या बायकोने विचारलं, "आणखी काही विचारायचं आहे?"

"हो, ज्यांना तुम्ही बाबा म्हणालात ते तुमचे सासरे आहेत ना?"

"हो."

"तुमचे पती का नाहीत घरी?"

"ठाऊक नाही --- तुमच्यासाठी अंथरूण आणून देऊ?"

सौमेनची बायको जाऊ लागली. नेमक्या त्याच वेळी शेजारच्या खोलीचा पडदा बाजूला करून मघाशी खिडकीत पाहिलेला तो म्हातारा गोरीला अचानक आत आला. "कोण? कोण आलं आहे? सौमू?--- कोण, कोण आहेस तू? कोण आहात तुम्ही? बोलत का नाही? सूनबाई, कोण आहेत हे?"

सौनेची बायको म्हणाली, "आता जरा गप्प बसा ना बाबा. हे तुमच्या चिरंजीवांचे मित्र आहेत. त्यांची बातमी घेऊन आलेत."

मी चमकलो. छाती धडधडू लागली. हे सगळं समजून उमजून बोलतेय ती-की म्हाताऱ्या सासऱ्याला त्रास होऊ नये म्हणून बोलतेय? मी तिच्याकडे पाहिलं. किती मोहक कटाक्ष, किती उजळ! आणि ओठांच्या कोपऱ्याशी त्या खट्याळ स्मितरेखा का म्हणून आहेत? माझं पिस्तूल जणू खिशातच गंज लागून जाम होऊन गेलं. त्याचा ट्रिगर बिघडला. अखेरची गोळी ओली होऊन गेली.

तो म्हातारा हळूच माझ्यावर वाकला, "सौमू कसा आहे बाळ? कुठे आहे तो? काय करतो? अगदी लहान पोरासारखा आहे - इतकं घाबरण्यासारखं काय होतं? मी पोलिसांच्या मोठ्या वरिष्ठ अधिकाऱ्यापाशी गेलो असतो - रिटायर्ड गव्हर्नमेंट ऑफिसर आहे ना मी -"

त्यांना मध्येच अडवीत म्हणालो, "त्याला पोलिसांची भीती नव्हती. तो ट्रेटर होता, विश्वासघातकी होता, म्हणूनच ---"

"चूप -" म्हातारा गोरीला गरजला.

मी हसलो. "तुमच्या सुनेलाच विचारा."

सौमेनच्या बायकोनं मला थक्क करून टाकलं. म्हणाली, "हो बाबा, हे खरं सांगताहेत."

"अशक्य, हा माणूस खोटारडा आहे ---" म्हातारा ओरडू लागला. "खोटे, बदमाष, कपटी, – सगळे एकजात! माझा कुणावरही विश्वास नाही. सगळे ट्रेटर आहेत! सगळे विश्वासघातकी आहेत!"

सौमेनची बायको पुढे होऊन म्हणाली, ''अरे देवा, हे काय चाललं आहे बाबा? जरा गप्प बसा ना.''

म्हातारा दाराची वाट दाखवत म्हणाला, ''चालते व्हा इथून - आताच्या आता जा. कुणी सांगितलं होतं ही खोटी बातमी द्यायला? जा, जा म्हणतो ना! माझा सौमू विश्वासघातकी?''

आता मी हत्यार बाहेर काढून उभा राहिलो. -- जास्त ओरडू नका. मुकाट्याने आपल्या खोलीत जा. मी आजची रात्र इथेच रहाणार. गडबड केली तर प्राण गमवावा लागेल. सांगून ठेवतो --- हे बघा, तुम्ही तुमच्या सासऱ्यांना त्या खोलीत घेऊन जा. माझा स्वतःवर ताबा नाही. ए ओल्ड फूल! चूप! डोन्ट शाउट!''

म्हातारा थोडा वेळ माझ्या हातातल्या हत्याराकडे बघत राहिला. मग त्याने दोन्ही हातांनी तोंड झाकून घेतलं. रडू लागला. बसला. भिजल्या आवाजात म्हणाला, ''मारा-मारून टाका मला. सौमूला काय झालं ते आता चांगलं लक्षात आलं माझ्या. आता जगून काय उपयोग?''

सौमेनची बायको सासऱ्याला आवरीत होती, आता ती विक्षिप्तपणे हसली ---''का? काय झालं? धीर नाही होत? का गोळी संपली? हे नुसतं खेळणं तर नाही? खरं म्हणजे आता माझ्या लक्षात आलं. तुम्हा लोकांना कवच फोडून बाहेर पडता येत नाहीय. दटावणी मिळाल्याने दमलात, हो ना?''

मी भडकलो. म्हणालो, ''सौमेनसारख्या मुलाला जन्म देणाऱ्याची मला भयंकर चीड आहे. पण आज मी दमलो आहे - जरासा आश्रय आणि थोडीशी झोप यांच्या बदल्यात काय वाटेल ते द्यायला तयार आहे.''

ती म्हाताऱ्याला ओढतच शेजारच्या खोलीत घेऊन गेली. त्यानंतर परत आली. आपल्या खोलीत गेली, अंथरूण घेऊन आली. जमिनीवर नीट अंथरून म्हणाली, ''झोपा. आज मलाही खूप झोप येतेय. आणि---''

अंथरुणावर आडवा होऊन म्हणालो, ''आणि?''

''आभारी आहे तुमची!'' बोलून ती घाईने खोलीबाहेर निघून गेली - सौमेनची बायको.

मला झोप आली नाही, आली नाहीच. ते छायाचित्र! सौमेन! कालव्याकाठी मीच तर त्याच्या श्वासाचा दोर कापला होता. प्रेत जाळून टाकलं होतं.

त्या खोलीत काय चाललं असावं याचा मला अंदाज लागला! जे काही काम शिल्लक राहिलं होतं ते पुरं केलं जात आहे. सौमेनची बायको चूडे फोडत आहे. सिंदूर पुसून टाकत आहे. सौमेनचं पांढरं धोतर पेटीतून काढून नेसत आहे. त्यानंतर ओक्साबोक्शी रडत आहे. तिच्या रडण्याचा आवाज मोठा होत चालला आहे. उन्हाच्या धुरासारखा, धुक्यासारखा तो सर्वभक्षक संचारशाली विलाप दाराच्या फटी ओलांडून वाढत चालला आहे, पुढे येत आहे.

बराच वेळ मी कान बंद करून पडून राहिलो. तरीसुद्धा असं वाटलं की या शोकाकुल विश्वापासून काही केल्या मला दूर जाताच येत नाही आहे. आणि तो महाकाय अजगर - शोकाचा अजगर मला आपल्या मिठीत घट्ट आवळत माझा जीव गुदमरून टाकत आहे, माझा श्वास बंद पडू लागला आहे. मला थोडासा वारा पाहिजे, थोडासा वारा.

त्यानंतर अगदी भल्या पहाटे जरा डोळ्याला डोळा लागला. स्वप्नात दिसलं की चहूबाजूंनी सौमेनची हजारो छायाचित्रे झेप घेत आहेत, सगळी पृथ्वी आच्छादून टाकीत आहेत.

पत्त्याच्या घरासारख्या कोसळणाऱ्या या स्तूपाकार विश्रृंखल सौमेनांच्यामधून वाट काढण्याची आता काहीच शक्यता दिसत नाही.

# उतरत्या सायंकाळचे दोन चेहरे

**मति नन्दी**

हावडा स्टेशनवर पत्र्याच्या विशाल शेडखाली उभं राहून दोघी बहिणींनी पुन्हा पुन्हा चहूकडे पाहिलं. प्रत्येक माणसाचा चेहरा न्याहाळून पहायचा प्रयत्न केला. पण कुणी सुद्धा त्यांच्याकडे त्या नजरेनं पाहत नव्हतं. सगळे दंग होते. प्रत्येकाला काही ना काही काम आहे. त्यांनासुद्धा आहे.

स्टेशनच्या विशाल शेडखाली गडबड गोंधळ, धावपळ यांच्यात त्या थक्क होऊन उभ्या आहेत. हे सगळ्या स्टेशनला उद्देशून कोण बोलतंय? दोघी बहिणींनी परस्परांच्या चेहऱ्याकडे पाहिलं. अचानक बोलणं थांबलं. धाकट्या बहिणीने बोटाने दाखवीत म्हटलं, 'ते बघ.' सॉस पॅनसारख्या लाऊडस्पीकरकडे दोघी बघू लागल्या.

धाकट्या बहिणीने खाकरून घसा मोकळा करीत विचारलं, ''आता काय करायचं?''

इकडे तिकडे बघायच्या निमित्ताने थोरल्या बहिणीने एक नजर फिरवली. भिंतीशी टेकून बसलेले दादा केसांमधून हात फिरवीत होते. आता फुंकर मारून हातावरचे केस उडवीत होते.

थोरली बहीण म्हणाली, 'चल, तिकडे जाऊ या.'

गर्दी, गोंगाटातून वाट काढीत दोघी त्या दिशेला चालू लागल्या. तिकिटाच्या खिडकीसमोर लोकांची रांग लागली होती. त्यांच्यापासून स्वत:ला वाचवीत जमिनीवर इकडे तिकडे निजलेल्या व बसलेल्या लोकांना टाळीत टाळीत, धापा टाकत धावत पळत असलेल्या लोकांमधून दोघी बहिणी तिसऱ्या वर्गाच्या विश्रामगृहात जाऊन पोचल्या. विश्रामगृहात फिकट प्रकाश होता. कोंदटलेला वास. पाण्याचा नळ. तिकिटासाठी बायकांची रांग आणि गाडीची वाट बघणारे दूरचे प्रवासी.

'ताई पाणी हवंय.'

'जा, पिऊन ये'.

धाकट्या बहिणीवर लक्ष ठेवत राहिली. नळ दाबून वाकून पाणी पीत आहे. थोरली बहीण अस्वस्थ होऊ लागली. धाकट्या बहिणीचा कुडता छातीशी घट्ट चिकटला आहे. हातात तांब्या घेतलेला तो माणूस एकटक काय बघतोय?

'आज तुफान एक्स्प्रेस लेट आहे.'

थोरल्या बहिणीने वळून पाहिलं. तिच्या जवळची बाई सांगत होती.

'किती वाट बघायला लागेल कुणास ठाऊक!'

'कुणी येणार आहे का?'

ती हसली. हसून सगळ्या खोलीवर नजर टाकत म्हणाली, 'पत्र आलं होतं. उद्या पोचेन म्हणून लिहिलं होतं. येऊन चक्कर मारून गेले. आलेच नाहीत.'

थोरली बहीण उठून उभी राहिली. धाकटी दिसत नाही?

'कुठे जायचं आहे की कुणासाठी आला आहात?'

'छे. छे आम्हाला जायचंय. म्हणून आलो आहोत.'

थोरली बहीण फार बोलली नाही. स्टेशनच्या विशाल शेडखाली लोकांच्या गर्दीत व गडबड गोंधळात येऊन उभी राहिली. धाकट्या बहिणीला उभ्या उभ्या शोधत राहिली. एकेक पाऊल टाकीत स्टेशनच्या अनेक मुख्य दारांपैकी एकाशी जाऊन उभी राहिली. इथून हावडा ब्रिज दिसतो. त्या पुलापलीकडे आहे कलकत्ता! कलकत्त्याच्या एका गल्लीत त्यांचं घर आहे. त्या घराच्या एका मजल्यावरच्या खोलीत आई, आजोबा, भाऊ आणि बहीण यांच्याबरोबर ती रहाते. हिवाळ्यात थंडीचं आणि उन्हाळ्यात उकाड्याचं त्या खोलीत सामाज्य असतं. दक्षिणेकडचा वारा छतावरून वाहत असतो. वारा जातो, ढग जातात, ऊन जातं आणि सायंकाळ जाते. आता स्नान वगैरे उरकून छतावर जाणं व्हायचं नाही.

नाकपुड्या आकुंचित करून वास घेतला. कसला वास आहे इथं कुणास ठाऊक! बाबांना स्मशानात नेताना आजोबा एक बाटली घेऊन आले होते. तसलाच काहीसा वास आहे. धाकट्या बहिणीने ती रिकामी बाटली ठेवली होती.

गेली कुठं ही धाकटी बहीण?

* * *

'दिल्ली देखो, आगरा देखो' ओरडायचा आणि हँडल फिरवायचा. कुतुबमीनार, ताजमहालची चित्रं गोल फिरत निघून जायची. ठराविक आवाजात तो हाक द्यायचा आणि जरा सावकाश फिरव म्हटलं तर तोंड वेडावून हसायचा. स्टेशनच्या खांबावर लटकावलेली चित्रं बघता बघता धाकट्या बहिणीला तो माणूस आठवला. एक दिवस तिने त्याला विचारलं होतं, 'कधी दिल्ली आणि आगरा पाहिलं आहे?' त्याने उत्तर दिलं नव्हतं. डब्याच्या भोकांना डोळे लावून बसलेल्या उतावीळ डोक्यांना तो माश्यांप्रमाणे हाताने वारत होता. धाकट्या बहिणीला त्याच माणसाची यावेळी आठ्वण झाली. बऱ्याच दिवसांनी आळीत एक बायस्कोपवाला आला. पण तो पूर्वीचा माणूस आता का नाही येत? धाकट्या बहिणीने कितीतरी रात्री, कितीतरी दिवस विचार केला. विचार करू लागताच कुतुबमीनार, ताजमहाल, विमान आणि जटायू युद्ध डोळ्यांसमोरून ओळीने जाऊ लागतं. जाहिरातीची चित्रं बघता बघता ती त्या बाईला खेटून उभी राहिली होती. बघताच लक्षात आलं की ती तिच्याकडे

बघतेय. डोळ्याच्या कोपऱ्यातून तिच्याकडे बघितलं. तिच्याच साडीला हा गोड वास येतोय. धाकट्या बहिणीने सावकाश दीर्घ श्वास घेतला. चॉकलेटवर लावलेल्या कागदाला असा वास येतो.

'फार काही सुंदर नाही.'

धाकट्या बहिणीने मान वळवली. ती बाई चित्राकडे बघतेय.

'गेल्या दुर्गापूजेच्या सुट्टीत आम्ही गेलो होतो. बापरे, येण्या-जाण्यात कोण त्रास आणि हॉटेलचे दर तरी किती महाग?'

हा गोड सुवास खूप वेळ हुंगत रहावा, छातीत भरून घ्यावा असं धाकट्या बहिणीला वाटत होतं. म्हणाली, 'तुम्ही म्हणताय सुंदर नाही. तर मग तिकडे........'

'मुळीच नाही सुंदर. ही सर्व दाट रानांची चित्रं आहेत. तिकडे कोण जायला बसलंय? त्यापेक्षा तर हेच चित्र जास्त चांगलं आहे. कोणार्कचं. तिथे खरंच काही बघण्यासारखं आहे.'

'तुम्ही गेला होता?'

'माझ्या नणंदेचे यजमान गेले होते.'

'यावेळी कुठे निघालात?'

'राणीगंज.'

'कुणाकडे?'

चित्रातल्या बायका छानदार हसतात तशी ती बाई हसली. त्यानंतर काही सांगणार होती. पण पुन्हा तिला हसू आलं. ते बघून धाकटी बहीणही हसली.

'पुढच्या वर्षी ह्यांना सुट्टी मिळाली तर आम्ही काश्मीरला जाणार आहोत.'

'ताई, ट्रेन सात नंबरच्या प्लॅटफॉर्मवरून सुटणार आहे. चल लवकर.'

अर्धी विजार घातलेल्या मुलाने धावत येऊन सूटकेस उचलली. वेताची टोपली हातात उचलत ती बाई म्हणाली, 'बरंय, निघते.'

ते जाऊ लागले. धाकटी बहीण एकेक पाऊल टाकीत कोलॅप्सिबल रेलिंगपाशी गेली आणि हात टेकून सात नंबरच्या प्लॅटफॉर्मवर उभ्या असलेल्या ट्रेनकडे टक लावून पाहात राहिली.

* * *

इतका गोंगाट असूनही काही ऐकू येत नाहीये. ती खांबाला टेकून लोखंडासारखी उभी आहे. लाल टोपी आणि खाकी पोषाख घातलेला माणूस इकडे तिकडे पाहात तिच्याचकडे येतोय. थोरल्या बहिणीला आता काहीच ऐकू येईनासं झालं आहे. तो माणूस अंगावरून पुढे निघून गेला. जाता जाता एकदा त्याने रोखून पाहिलं होतं. थोरल्या बहिणीने विचार केला, 'वेटिंगरूममध्ये जाऊन वाट बघणंच चांगलं. धाकटी एव्हाना तिथे येऊन बसली असेल.'

बाक भरलं आहे. थोरली बहीण भिंतीला टेकून उभी राहिली. तीच कुठेतरी

फिरून पुन्हा येऊन थबकली. बसायला जागा नव्हती म्हणून तिच्यापाशी येऊन म्हणाली, 'बाई, बाई! अजून आले नाहीत.'

'कोण येणार आहे?'

काहीतरी विचारायला हवं म्हणून विचारलं झालं. मग नुसतीच तिच्याकडे बघत राहिली. बघता बघता लक्षात आलं की तिचे डोळे खूप मोठे आहेत. त्या डोळ्यांमुळे ती किती सुरेख दिसतेय. लांबट चेहऱ्याखाली वयाच्या सुरकुत्या थरारल्या.

'माझा कोण लागतोय? कुणी नाही.'

दुसऱ्या शब्दांत पण अगदी तीच गोष्ट ! मस्तकात ठिणग्या उडू लागल्या. नव्या मावशीने दोन रुपये देत म्हटलं होत , 'अशी रोज रोज आलीस तर काम कसं चालेल?' खोलीत त्यावेळी शेजारचं कुणास ठाऊक कोण बसलं होतं. परत जाताना थोरल्या बहिणीच्या कानावर नव्या मावशीचे शब्द आले होते, 'माझी कोण लागतेय कुणी नाही.'

'तीस रुपये जास्त मिळतील म्हणून गेले धावत दीडशे मैलांवर नोकरी करायला. इतकं काय अडलं होतं कुणास ठाऊक? शाळेत मला जे काही मिळतंय त्यातच आणखी थोडी भर त्यांनी घातली असती तर सात जणांचा संसार मजेत चालला असता.'

थोरल्या बहिणीने मान हलविली.

'माझं कधी ऐकतच नाहीत. बघता बघता आठ वर्षे होऊन गेली. लग्नाअगोदर माझ्या पैशांना हातसुद्धा लावणार नाहीत.'

'कुठं काम करतात ते?'

'डी. व्ही. सी. मध्ये'

'माझ्या आजोबांनी तिथे नोकरीसाठी प्रयत्न केला होता. पण नाही मिळाली.'

'अरे, ह्यांनी प्रयत्न करून कितीतरी लोकांना काम मिळवून दिलं आहे. बरं, मी विचारीन. इथंच आहात ना की ट्रेनची वेळ झाली?'

'छे, छे माझ्या ट्रेनची अजून वेळ झालेली नाही. इथंच थांबणार आहे मी.'

थोरल्या बहिणीला यावेळी काही ऐकू येत नाहीये. फक्त आपल्या अंतःकरणातला आवाज ऐकू येतोय, 'मी थांबणार आहे. मी नाही जाणार.'

'आणखी एकदा जाऊन जरा बघून येते.'

ती बाई निघून गेली. सावकाश चालत पुढे गेली. लोकांच्या गर्दीत दिसेनाशी झाली. थोरली बहीण परत आली. स्टेशनच्या फाटकाशी येऊन उभी राहिली. सायंकाळ मावळत चालली आहे. ऑफिसमधून परतणारे लोक स्टँडवरच्या बसच्या खिडक्यांमधून डोकावत आहेत. गंजलेल्या डब्यांसारखे त्यांचे चेहरे आहेत. हावडा ब्रिजवर अजून उन्हाच्या झळा लागताहेत. स्टीमरनी भोंगे वाजवले. कुबडा फेरीवाला कसाबसा पुलाची चढण चढतोय. बसचा ड्रायव्हर बसमधून उतरून सावकाश

आसमंतात धूर सोडू लागला आहे. सायंकाळ मावळत चालली आहे. लिलुआमध्ये बायकांचा सरकारी आश्रम आहे. ज्या बायका पळून जायचा प्रयत्न करतात आणि पकडल्या जातात, पोलीस त्यांना अगोदर इथेच आणून ठेवतात. 'म्हणावं आम्ही इथंच रहाणार, आम्हाला घर नाही. आमचं कुणी नाही. सांगता येईल ना?' बोलता बोलता आजोबांचा चेहरा या सायंकाळसारखाच होऊन गेला होता.

थोरली बहीण पुन्हा स्टेशनच्या शेडखाली परत आली.

* * *

कोलॅप्सिबल रेलिंगला रेलून धाकटी बहीण जाणाऱ्या ट्रेनकडे पहात आहे. ट्रेनच्या खिडक्यांमधले चेहरे प्लॅटफॉर्मकडे बघून हसत आहेत. हसत हसत निघून जात आहेत. म्हणून तिलाही निघून जावंसं वाटतंय. लाइनच्या वर आडवा एक पूल आहे. प्लॅटफॉर्मच्या जवळून एक रस्ता वर पुलापर्यंत गेला आहे. तिघे जण हातात पिशव्या घेऊन रस्त्यावरून जात आहेत. ते जणू एखादा डोंगरच चढत आहेत. अचानक तिला आठवलं की थोरली बहीण वाट बघत असेल.

थोरली बहीण वेटिंगरूममध्ये दिसली नाही म्हणून ती शेडखाली परत आली. वजन करायच्या मशीनवर एका म्हाताऱ्याने स्वतःचं वजन केलं. ती बघत राहिली. म्हाताऱ्याने कार्ड पाहिलं आणि तो पटदिशी निघून गेला. त्यानंतर जाहिरात पाहिली. पाहता पाहता तो पुस्तकांच्या स्टॉलवर जाऊन पोचला. 'फक्त तीन मिनिटं उरली आहेत आणि अजून आली नाही. किती बेजबाबदार आहे!'

धाकट्या बहिणीने मान वळवून पाहिलं. सहासात मुलामुलींचं एक टोळकं होतं.

'तिची वाट बघत राहिलो तर आपली गाडीही चुकेल.'

'तर मग?'

आपसात विचारविनिमय करता करता ते अस्वस्थ होऊ लागले. थोड्याच वेळात चष्मा लावलेली एक मुलगी जवळ जवळ धावत आली. अगदीच काटकुळी. सातवीत शिकत असावी असं वाटण्याइतकी किरकोळ अंगाची. तिला बघताच धाकट्या बहिणीने ओळखलं की ते टोळकं हिच्याचविषयी बोलत असावं.

'ते लोक आताच गेले.'

'गेले?'

मुलीने हातातली बॅग जोरात घट्ट धरली. नाकावरचा चष्मा नीट केला. मग 'आता मी काय करू?' या नजरेनं बघू लागली.

'एकटं नाही का जाता येणार?'

'न यायला काय झालं? पण त्यांच्याबरोबर राहिल्याने घर शोधायचा त्रास नसता झाला. इतकं बोलून होताच मुलगी उद्गारली, 'अरे!'

मुलगा बेचैन झाला होता. मुलामुलींच्या त्या टोळक्यात धाकट्या बहिणीने या मुलालाही पाहिलं होतं.

'तुम्ही काय आता आलात?' मुलाने विचारलं.

'हो, आणि तुम्ही?'

'मी सुद्धा,'

'तर मग आता? गाडी चुकली आपली! वाटेत एक मिरवणूक आड आल्याने ट्राम अडकली. म्हणून हे सगळं त्रांगडं!'

'या मिरवणुका कधी बंद होतील कुणास ठाऊक? आता आता काय करायचं? जाणं काही झालं नाही आपलं.'

'घरी सांगून आलो आहे की लग्नकार्य आहे, तेव्हा परत यायला रात्रीचे दहा अकरासुद्धा वाजायची शक्यता आहे. आता लगेच यावेळी घरी गेलो म्हणजे सगळ्यांना चेष्टेला एक छान विषय मिळेल.'

'चला, ट्रेनमधून बॅण्डेलपर्यंत फिरून येऊ या.'

'पण अगोदर काही खाऊन घेऊ या.'

दोघे निघून गेले. त्याचवेळी त्या मोठ्या स्टेशनचे सगळे दिवे लागले. एक आगगाडी येत आहे. लोक मुंग्यांसारखे स्टेशनात शिरत आहेत. लोकांची इतकी गर्दी धाकट्या बहिणीला आवडली नाही, तिला ती बघाविशी वाटेना. ती परत वेटिंगरूममध्ये आली.

* * *

आईने धाकट्या भावाला रट्टा देऊन म्हटलं होतं, 'मेल्या, जरा लवकर जायला काय झालं हातं?' कुणाच्या तरी घरी 'बहूभात' च्या समारंभाचं जेवायला गेला होता, बोलावणं नव्हतं तरी कडमडला होता आणि मार खाऊन परत आला होता. अक्काच्या तोंडाकडे बघून तो अचानक रडू लागला होता. त्यावेळीदेखील धाकट्या भावाचा चेहरा असाच चपटा दिसत होता.

थोरली बहीण चित्रांच्या आणखी जवळ सरकली. जे लोक आगगाडीखाली सापडून मरण पावले त्यांची चित्रं. काचेवर तिच्या स्वतःच्या चेहऱ्याचं प्रतिबिंब दिसतंय. आपला चेहरा बघण्यासाठी जरा मागं सरकून तिरकं होऊन पाहताच तिला जाणवलं की किती कुरूप नि भयंकर चेहरा आहे आपला! आजोबांनी एक दिवस किंचाळून म्हटलं होतं, 'मी काय करू, काय करू? प्रयत्न करतोय की!' थोरल्या बहिणीला सगळ्या काचभर आजोबांचा चेहरा दिसला. माया आणि दुःख यांनी तिचं मन ढवळून निघालं. आगगाडीखाली मेलेल्यांविषयी तिला वाईट वाटू लागलं.

थोरली बहिणीला तीच बाई पुन्हा दिसली. पुरुषाच्या हातात बॅग आणि वळकटी होती. ते आपसात बोलत नव्हते. थोरल्या बहिणीने धावत पुढे होऊन बाईचा हात धरला.

'हेच आहेत?'

बाईने होकारार्थी मान हलवली.

'यांचा पत्ता द्या. आजोबांना पाठवीन.'

इतकं बोलून थोरली बहीण आशाळभूतपणे पाहू लागली. बघता बघता तिला दिसलं की दोन चेहऱ्यांच्या आकारात शोभतील असे डोळे, खाली लोंबणारी हनुवटी आणि चुलीतल्या मातीसारखे ओठ.

'तिथे लोकांना कमी करायची नोटीस लागली आहे.'

ती बाई निघून गेली. थोरली बहीण तिच्याकडे पहात राहिली. खांद्यावर जणू कुणीतरी बॅग आणि वळकटी ठेवून दिली असता. बघता बघता थोरल्या बहिणीला चक्कर येऊ लागली. पापण्या जड होऊ लागल्या. कशीबशी आपल्या चहू बाजूंना नजर टाकून तिने विचार केला. धाकटी बहीण वाट बघत असेल.

वेटिंगरूममध्ये परत आल्यावर थोरल्या बहिणीला धाकटी बहीण दिसली.

दोघी एकमेकींच्या जवळ गुपचुप बसून राहिल्या. मग थोरली बहीण म्हणाली, 'इथे बसून काय फायदा? चल, तिकडे जाऊ या.'

सावकाश चालत त्या दोघी स्टेशनच्या दुसऱ्या विभागात आल्या. धाकट्या बहिणीने विचारलं, 'आता काय करायचं?'

थोरली बहीण उभी राहून विचार करू लागली. विचार करून म्हणाली, 'थोडा वेळ इथंच थांबू या.'

उपाहारगृहाचं दार उघडून एक जोडपं बाहेर आलं. बघून धाकट्या बहिणीच्या मनात आलं, आता हे फिरायला जाणार.

ती थुंकली आणि खोकू लागली. खाली वाकून ओकारी करू लागली. थोरल्या बहिणीने पाठीवर हात फिरवला. जवळ घेतलं. विचारलं, 'काही सांगत होतीस?'

'नाही.'

'तुला भूक लागली आहे?'

'नाही.'

उपाहारगृहाचं दार पुन्हा उघडलं. त्याचा आवाज ऐकू आला. ऐकताच डोकं गरगरू लागलं. आगगाडीची शिटी वाजली. धाकटी बहीण म्हणाली, 'कसा शंखासारखा आवाज आहे नाही?'

'हो.'

'अक्का, तुला आठवतं, आपण बाबांबरोबर गंगेच्या काठी फिरायला गेलो होतो, तेव्हा एका एंजिनवर चढलो होतो?'

'हो.'

'ड्रायव्हरचा एक दात सोन्याचा होता. त्याने मला कडेवर घेतलं होतं.'

'त्याने जेव्हा इंजिनची शिट्टी वाजवली तेव्हा तू घाबरून त्याच्या छातीत तोंड लपवलं होतंस.'

धाकटी बहीण हसली.

थोरली बहीण म्हणाली, 'ते बघ.'

नुकतंच लग्न झालेला एक नवरामुलगा नवरीला घेऊन घरी चालला होता. नवीन पेटी, नवा पलंग, नवे दागिने, नवी साडी. नवरी लाजेने अंग चोरून चालली आहे. नवरा सिगारेटचे झुरके घेत आहे.

'अक्का, केस पाहिलेत? पुढच्या बाजूला विरळ आहेत.'

'हो.'

'नवऱ्याचं वय जास्त आहे.'

'हो.'

'आजोबांचे ते मित्र पुन्हा का नाही आले?'

'कुणास ठाऊक?'

'बोलायचे किती छान, नाही?'

थोरल्या बहिणीने काही उत्तर दिलं नाही.

'एक दिवस चॉकलेट आणून दिलं होतं. आठवतं ना?'

उत्तर मिळालं तरी धाकटी बहीण बोलतच राहिली, 'आई म्हणाली होती की त्यांनी बहुतेक तुला पसंत केलेलं दिसतंय.'

'बरं, आता गप्प बस बघू.'

धाकट्या बहिणीचे डोळे भरून आले. खोकल्याची उबळ रोखण्यासाठी ती खाली वाकली. हलक्या आवाजात म्हणाली, 'पाणी हवंय.'

'जा, पिऊन ये.'

धाकटी बहीण गेली नाही. थोरल्या बहिणीला चक्कर येतेय. टक लावून समोर बघतेय. ते बघून धाकट्या बहिणीने विचारलं, 'आता आपण काय करायला हवं?'

'कुणास ठाऊक?'

'आजोबांनी काय सांगितलं होतं?'

थोरल्या बहिणीने विचार करायचा प्रयत्न केला.

'ते आता येणार आहेत का?'

'का?'

'नसतील तर मग आपण कशासाठी आलो आहोत?'

थोरल्या बहिणीने डोळे विस्फारून चहूकडे बघितलं. लोक, प्रकाश, आवाज-सगळं बघून, ऐकून पुन्हा नुसती टक लावून बघू लागली. मग अडखळत्या आवाजात म्हणाली, 'आपण वाट बघू या. ते येतील. विचारतील, बरोबर कोण आहे, कुठं जाणार आहात, कशाकरता जाणार आहात? आपण सांगू, आम्ही दोघी बहिणी मुंबईला निघालो आहोत. बरोबर कुणी नाही. तिथे आम्ही सिनेमात काम करू. पत्ता विचारतील. आपण सांगणार नाही. तेव्हा मग ते आपल्याला आश्रमात पाठवून देतील.'

'तिथे काय करणार?'

'ठाऊक नाही.'

'अक्का, चल पळून जाऊ या.'

हळू हळू थोरल्या बहिणीचं डोकं गरगरायचं थांबलं. थंड स्वरात म्हणाली, 'कुठं जायचं पळून?'

'वाटेल तिथे.'

'मग?'

धाकटी बहीण नुसती बघत राहिली. थोरल्या बहिणीने तिला जवळ ओढून घेतलं. छातीशी धरलं. मग चेहरा खाली करून तिला विचारलं, 'भीती वाटते?' धाकटी बहीण तिच्या छातीत तोंड लपवून थरथर कापू लागली. तिच्या पाठीवर हात फिरवीत थोरली बहीण ताठ उभी राहिली.

त्यावेळी एकीच्या मनात आलं, लोकांचे चेहरे गंज लागलेल्या पत्र्याच्या डब्यांसारखे आहेत.

आणि दुसरीने पाहिलं, ट्रेनचा चेहरा हसत हसत निघून जात आहे.

# दुष्काळ
## सुनील गंगोपाध्याय

छिपदहहून डालटन गंज जायच्या रस्त्यावर गाडी बिघडली. चकाकणारी नवी स्टेशन वॅगन अशी अचानक बिघडेल असं कुणाला स्वप्नातही वाटलं नव्हतं. पूल ओलांडल्यावर चढण चढताना दोनतीनदा जरा बारीकसा आवाज करून गाडी थांबली, तेव्हा तिकडे कुणी फारसं लक्षही दिलं नाही. थांबली आहे तर पुन्हा चालू लागेल, असा विचार करून प्रत्येकजण खिडकीबाहेर बघू लागला आणि आपापल्या परीनं सृष्टीसौंदर्य न्याहाळू लागला. मि. खेमकानी सिगारेट केस उघडून सर्वांपुढे धरली. त्यांनी एकेक करून सगळ्यांना इंग्रजी, हिंदी, फार काय बंगालीतसुद्धा विनंती केली. केसमध्ये आठ सिगारेटी होत्या. एकाच खेपेत संपल्या. दहा मिनिटं होऊन गेली तरी गाडी हलेना. एक ट्रक मागून येऊन हॉर्न वाजवू लागला तेव्हा मि. खेमका स्वतः गाडीतून खाली उतरले.

अरुंद पुलाच्या पलीकडचा रस्ता, नदीच्या काठापासूनच चढत गेलेला. नदी कसली, नदीचा सापळा नुसता, जरा सुद्धा रक्त नाही की मांस नाही अंगावर ! अरुणदेखील खाली उतरून उभा राहिला. गाडीत खूप उकडतंय. दोन्ही हात मागे करून छाती फुगवून आळोखेपिळोखे दिले. अंग कसं आंबून गेलं आहे. आंघोळ केल्याखेरीज बेचैनी जायची नाही. नदीत पाणी असतं तर इथेच एक बुडी मारली असती. जबरदस्ती येऊन कोसळलेल्या विनोदासारखं अकरा वाजताच कडक ऊन पडलंय. इथं बऱ्याच जणांच्या गाड्या बिघडत असाव्यात असं दिसतंय. नाहीतर मग लोकच मुद्दाम थांबत असावेत. कारण डोंगराच्या उतरणीवर कोळशाने किंवा खडूने चितारलेली बरीच अक्षरं दिसताहेत. पण त्यांना खडू मिळतो कुठून? का फिरायला निघताना ते खिशात खडू घेऊनच निघतात? सर्वांत जास्त स्पष्ट अक्षरं हीच आहेत–मन्दिरा, बेरजेची खूण, लाल कमळ, बरोबरची खूण, हेवन. अरुण पुटपुटला. गुड हेवन्स.हसला.

ड्रायव्हरने बॉनेट उचललं आहे. खेमका मान खाली घालून आत डोकावून बघताहेत. गाडीच्या आतून 'हेराल्ड ट्रिब्यून'चे लाहिडी अस्वस्थ होऊन किंचाळले, 'ए खेमका, व्हॉट द हेल...'

खेमका अतिशय गंभीर व्यक्ती आहेत. सहसा विचलित होत नाहीत. लगेच मान वर करून म्हणाले, 'लेट अस डू वन थिंग. गाडी ट्रबल देतेय, तर आपण खाली

उतरू या. जवळच रूपा टूरींग डाकबंगला आहे. आपण तिथेच लंच उरकून घेऊ या.'

दरम्यान आणखी तिघेचौघे खाली उतरले. सकाळच्या वेळेला कधीही लाहिडीचं डोकं ताळ्यावर नसतं. बहुतेक सकाळच्या वेळीच तो प्रत्येक वाक्यागणिक 'हेल' शब्द उच्चारीत असतो. अरुणच्या ते लक्षात आलं आहे. लाहिडीने तोंड वाकडं करीत घड्याळ बघितलं. वेळ जाणून घेण्यासाठी नव्हे, तारीख जाणून घेण्यासाठी. म्हणाला, 'आज आठ आहे, माय गुडनेस. आजच मला पाटण्याला पोचायला हवं. तुमच्या टाटा कंपनीने इतकी रद्दी खटारां गाडी दिली आहे की—'

खेमका खो खो करून हसले. म्हणाले, 'एकदम ब्रँड न्यू गाडी आहे. म्हणूनच ट्रबल देत्येय. चला, चला, इटस ए नाइस लिटल बंगलो, आवडेल तुम्हाला. मि. रंगाचारी, व्हॉट डू यू सजेस्ट?'

रंगाचारीची काहीच हरकत नाही. इतरही कुणाला काही हरकत नाही. पण लाहिडी पडला सर्वात मोठ्या इंग्रजी दैनिकाचा माणूस. त्याचा तोरा सगळ्याहून जास्त. तो बडबडू लागला, 'डालटन गंजच्या डी. एम. शी माझी तीन वाजता अपॉइंटमेंट होती – काय वैताग आहे– बंगलो किती दूर आहे? उन्हात चालावं लागेल?'

'जवळच आहे. तो बघा दिसतोय.'

तिथं खाण्यापिण्याच्या सगळ्या वस्तू मिळतील? इथे जवळपास तर कुठे काही दिसत नाही.'

'लिव्ह इट टू मी. माझ्याबरोबरही थोडं प्रोव्हिजन आहे. काही त्रास व्हायचा नाही.'

खेमका कुठल्याही अडचणीने गडबडून जात नाहीत. लाहिडीशी हसून गप्पा मारत राहिले. आता ड्रायव्हरकडे वळून चेहरा पार बदलून कठोर रूप धारणं केलं, रागीट आवाजात ड्रायव्हरला काहीतरी दटावलं, मग पुढच्याच क्षणी ते रूप नाहीसं करून लाहिडीकडे वळून हसत म्हणाले, 'पण मला तरी अधून मधून असले अनरूटिन्ड इंसिडेंट खूप आवडतात. चला.'

गाडीच्या क्लीनरने सामान काढलं आणि ते ओझं उचलून तो पाठोपाठ चालू लागला. एक केस बिअर आणि तीन बाटल्या स्कॉच अजून शिल्लक होती. सॉसेज देखील सगळे संपले नव्हते. त्याकडे ओझरत्या नजरेनं बघितल्यावर लाहिडीच्या चेहऱ्यावरच्या रेषा काहीशा बदलल्या.

बंगल्यात दोन खोल्या होत्या. स्वच्छ बाथरूम. तीन ऑर्डर्ली. थोड्याच वेळापूर्वी एक मंत्रीमहाशय आपल्या लवाजम्यासह इथे राहून गेलेत. म्हणून ऑर्डर्लींनी अजून आपले पोषाख बदललेले नाहीत. खेमकाने क्रिकेटच्या खेळाडूच्या उत्साहात हां हां म्हणता सगळी व्यवस्था करून टाकली. प्रयत्न करूनही तीनपेक्षा जास्त कोंबड्या

मिळू शकल्या नाहीत याविषयी हळहळ व्यक्त करीत ते बिअरच्या बाटल्या उघडू लागले. लाहिडीच्या वक्र भुवया थोड्या सरळ झाल्या. टेबलावर एकावर एक पाय ठेवीत तो म्हणाला, 'ए खेमका, इथे जवळपास तुझ्या टाटा कंपनीचं एखादं अन्नछत्रबित्र आहे का?'

'नाही, या बाजूला नाहीये. आम्ही चार जागी मदत करतोय. काल पाहिलं होतं ते–'

'चला, सुटलो बुवा! या तीन दिवसात किती छळलंय तुम्ही!'

टॉर्चर? मि. लाहिडी, यू मस्ट फेस लाइफ –(छापण्यासारखं नाही.) – घ्या, ओता.'

'देशाची काय परिस्थिती आहे ते तुम्हाला स्वतःच्या डोळ्यांनी बघावंसं नाही वाटत? परदेशी रिपोर्टरसुद्धा –

'देशाची स्थिती बघायची तुम्हाला का गरज वाटतेय? उगाच बडबडू नका. व्हल्गर! ए अरुण, तुझ्यापाशी चारमिनार असेल तर एक दे.'

खेमकाने सिगारेट केस पुन्हा भरून घेतली होती. त्याने ती फट्दिशी उघडून पुढे करताच लाहिडी म्हणाले, 'तुझी ती गोल्ड फ्लेक ओढून ओढून तोंडाची चवच गेली बघ. नुसता भुसा! आण रे अरुण, चारमिनार दे.'

अरुणने दुरून पाकिट फेकून म्हटलं, 'लाहिडी दा, आज इथेच राहिलो तर कसं काय? कशी शांत निस्तब्ध जागा आहे'.

'तुला काय? सात दिवस – दहा दिवस वाटेल तितकी सुट्टी घेशील. मला तर परवाच कलकत्त्याला पोचून प्लेन पकडायचं आहे. एखाद दिवशी – मन एकदम उखडलंय, काहीसुद्धा आवडत नाही.–'

खेमका म्हणाले, 'खरंच, बघवत नाही. किती करुण दृश्य–'

'कोणतं दृश्य? कोणतं? ऑ?'

लाहिडी पाय खाली सोडून ताठ होऊन बसला. लाहिडीचा चेहरा रुंद आहे, डोळ्यांवर भारी पॉवरचा जाड चष्मा. मुलांप्रमाणेच एकप्रकारे त्याच्या चेहऱ्यावरही क्रोध, विस्मय, विरक्ती, हताशा – सगळ्यांची अभिव्यक्ती स्पष्टपणे दिसून येते. आता सहज आश्चर्याने विचारू लागला, कोणतं कारण? आँ?

'बाम्बे ट्रिब्यून' चा देशपांडे म्हणाला, मि. लाहिडी डिड यू नोटिस? मी एक स्नॅप घेतला आहे. बेतला रिलीफ सेंटर....रांगेत बसल्या बसल्याच एका म्हाताऱ्याने एका म्हातारीच्या मांडीवर डोकं ठेवून प्राण सोडला.........माणूस हे सगळं आपल्या डोळ्यांनी पाहू शकतो? जयप्रकाशजीना पाहिलं, सारखा घाम पुसत होते. मी देखील डोळे मिटून घेतले.'

रंगाचारी हसत हसत म्हणाला, 'डोळे बंद करायच्या अगोदर कॅमेऱ्याने फोटो तरी नीट घेतला होतास ना? आता तो फोटो 'टाइम्स' नाहीतर 'गार्डियन' ला वीक–'

देशपांडे तीव्र स्वरात म्हणाला, 'मुळीच नाही. मी आपल्या देशाचे असले लाजिरवाणे फोटो कधी कुठल्या परदेशी माणसाला विकत नसतो.'

लाहिडी कान देऊन लक्षपूर्वक ऐकत होता. आता म्हणाला, 'हे काय करुण दृश्य झालं लेको? त्याहून जास्त करूण स्थिती आमची आहे. ए साल्या खेमका-'

ओठांवर स्मित झळकावीत नकली भीतीने ओरडत खेमकाने विचारलं, 'अरे, अरे, मी काय केलं?'

'साल्या तूच या सगळ्या आपत्तीच्या बुडाशी आहेस.'

'ते कसं काय? देशात काय चाललंय ते तुम्ही सर्वांनी-'

'देशात काय चाललंय? गरज असती तर आमचं आम्ही पाहिलं असतं. नाहीतर आमच्या दैनिकाने आम्हाला बघायसाठी पाठवलं असतं. तू आम्हांला मेजवानी देऊन दाखवायला का आणलंस? स्वतः दानधर्म करतो आहेस ना- ते गाजावाजा करून जगजाहीर करायचं आहे ना तुला? मेजवानी देऊन का कुणी प्रेतं पहायला बोलावतं? रात्रंदिवस स्कॉच पाजतो आहेस, आरामात ठेवतो आहेस – आणि मधून मधून एखाद वेळी जाऊन मेलेली माणसं बघून येणं- देवा, देवा , व्हल्गर – साल्या, तुझा माल खातोय म्हणून तू आम्हाला आवडतो आहेस असं समजू नकोस. आम्ही आहोत व्यसनी माणसं. चांगला माल दिसला की सोडवत नाही, पण म्हणून काय ही इतकी आगाऊगिरी?'

खेमका आपलं संपूर्ण रूप पालटून टाळ्या वाजवत म्हणाला, 'अगदी बरोबर बोललात तुम्ही. मला तुमचं म्हणणं मान्य आहे, शंभर टक्के मान्य.पण माझीदेखील नोकरीच आहे-'

लाहिडी खुर्चीवरून उठून बाहेर व्हरांड्यात जाऊन थुंकला. खिशातून रुमाल काढून नाक स्वच्छ केलं. चष्मा काढताच त्याचा चेहरा पार बदलला. त्याच असहाय्य दिसणाऱ्या चेहऱ्याने म्हणाला, 'खरंच माझं कशातच मन लागत नाही, काहीच आवडत नाही. जा, जरा जाऊन बघ. जेवण तयार झालं आहे की नाही? भूक लागली आहे. नशा आणखी चढली तर जेवावंसं वाटणार नाही.'

डाकबंगल्याच्या आवारात एक मोठी विहीर होती. पाणी भरण्यासाठी तिथे लोकांची ही गर्दी लोटायची. एक ऑर्डर्ली तिथे उभा राहून पहारा करत होता, कुणी एक कळशीपेक्षा जास्त पाणी भरू नये म्हणून. अरुण तिकडेच बघत होता. लाहिडी त्याच्यापाशी येऊन म्हणाला, 'काय बघतो आहेस? पोरी? सात वर्षांपूर्वी एकदा इथे पालामऊला आलो होतो. त्यावेळी तुझ्याच वयाचा होतो मी. या ओरॉंव बायकांचं सौष्ठव त्यावेळीच बघितलं होतं. आता बघा, एकाही बाईला छाती दिसत नाही की नितंब-'

अरुण काही बोलला नाही. लाहिडीच्या चेहऱ्याकडे बघून नुसता हसला. लाहिडी पुन्हा

म्हणाला, 'तर मग काय शब्दयोजनेचा विचार चाललाय? तुमच्या बंगाली दैनिकांत तर भरपूर काव्य पाडावं लागतं. घे, मी सांगतो, लिही – प्रत्येक माणसाच्या चेहऱ्यावर विषादाची सावली होती – छे, सावली नको, सावली शब्द आता जुना झालाय, घाम – विषादाचा घाम – हेच जास्त बरं राहील, स्वेद, फर्स्ट क्लास, ऊन, बधिर ऊन, घे चांगल्या एंडिंगपर्यंत सांगून टाकतो - आकाशात बधिर ऊन, खाली विषादाचा स्वेद – पोएट्री!'

काही न बोलता अरुण पुन्हा हसला. हे हास्य काही वेगळंच होत. लाहिडीने ते ओळखलं. म्हणाला, 'मी जरा जास्तच बोलतोय, हो ना? सिली अँड स्टुपिड! जरा या ट्रॅजेडीचा विचार करून पहा, हजारो लोक उपासमारीने बेजार आहेत - आणि आपलं काम काय आहे? तर त्याचं वर्णन करण्यासाठी कोणती भाषा ठीक राहील याचा विचार करणं, खरं ना? काही सुद्धा आवडत नाही.'

'लाडिही दा, इथं जवळपास एक साधू खूप कार्य करीत असतो म्हणतात.'

'साधू? कोण साधू?'

मुंबईहून कुणीतरी साधू आला असून तो रोज हजार माणसांना खाऊ घालतो. साधूचे श्रीमंत भक्त पैसा आणि तांदूळ पुरवत आहेत. किती इंटरेस्टिंग आहे. आता एवीतेवी इथे थांबलोच आहे, तर चला, हे देखील पाहून घेऊ या.'

'साधू लोकांना जेवू घालतोय तर साल्या तुला काय त्याचं?'

'काहीतरी दैवी प्रकरण असावं. पण तुमच्या इंग्रजी वर्तमानपत्रासाठी छान स्टोरी आहे.' 'गप्प बैस बघू आता. बीअर इतकी स्ट्राँग आहे, अबब! पोटाची आतडी जळायला लागलीय...... नकली दिली वाटतं-'

'बिअर नाहीतरी थोडी स्टाँग असतेच-'

'उगाच भकू नकोस. तू कालचा पोर आणि मला शिकवायला निघाला आहेस की बिअर किती स्ट्राँग असते!'

लहिडी खिन्नपणे बसून राहिला. चष्मा नसल्याने त्याचा चेहरा असहाय्य वाटत आहे.

कधी याच्यापाशी जातो, कधी त्याच्यापाशी. सारखा तोंडाला येईल ते बोलत सुटलाय.

कुणी काही बोलू लागताच तो किंचाळतो, 'आता गप्प बसा बघू. स्टॉप हॉलरिंग, विल यू?' अचानक खेमकावर घसरत तो मोठ्यांदा गरजला, 'ए साल्या खेमका, मी रुस्तमजीपाशी तुझी तक्रार करीन. तुझी राचीहून बदली करायला लावीन.'

खेमका व्हारांड्याच्या टोकाशी बसला होता. त्याच्या डोळ्यांवर आणि चेहऱ्यावर ऊन पडत होतं, त्यामुळे त्याचा चेहरा लकाकत होता. गोड आवाजात म्हणाला, 'तुम्ही खरंच तसं केलं तर माझ्यावर फार उपकार होतील. यू आर ऑल्वेज माय फ्रेंड.'

फ्रेंड?'

'येस, ऑल्वेज! पण यावेळी माझं काय बरं चुकलं?'

लाहिडी कमरेवर हात ठेवून उभा होता. तीक्ष्ण दृष्टीने पहात खेमकाची चूक शोधत होता. इकडे तिकडे नजर टाकली. स्वतःच्या हातातलाच ग्लास रिकामा दिसला. म्हणाला,

'मघापासून देशी बिअर पाजतो आहेस, ती स्कॉच काय तुझ्या बाईला पाजणार आहेस?'

खेमकाने पटदिशी उठून टेबलाखालून स्कॉच काढीत म्हटलं, 'तुम्ही अस्वस्थ असता तेव्हा व्हिस्कीऐवजी बिअर प्यायला तुम्हाला आवडत असल्यास माझ्या लक्षात आलं आहे म्हणूनच-'

'मी अस्वस्थ आहे हे तुला कुणी सांगितलं? गांडू! मला भूक लागली आहे. केव्हाचा सांगतोय की जेवायची सोय करा-'

त्याचवेळी जेवण हजर झालं. बारीक तांदळाचा शुभ्र भात, डब्यातलं लोणी, भाजलेले बटाटे आणि कोंबडीचा रस्सा. रंगाचारीने कुजबुजत अरुणला म्हटलं, 'आजच्यासारखा भात गेल्या कित्येक दिवसात मिळाला नव्हता. सगळ्यात वाईट जागी आपल्याला सगळ्यात चांगला भात मिळाला आहे. खरं ना?'

अरुण बोलला, 'कोंबडीदेखील छान चवदार आहे.'

'तिखट जरा जास्त झालंय.'

अजून एकच वाजला होता. पण लाहिडी नशेनं धुंद झाला होता. बोटाने अन्न नुसतं चिवडतोय. खायची वासनाच उरली नाहीय. डोळे अर्धवट मिटले आहेत. आता दिवसभर तो असाच रहाणार. पण अरुणने पाहिलं आहे की हाच माणूस जेव्हा रिपोर्ट टाईप करायला बसतो तेव्हा त्याचा चेहरा काही वेगळाच दिसू लागतो. असामान्य स्मरणशक्ती आणि भाषाप्रभुत्व. किती एकाग्र होतो त्यावेळी त्याचा चेहरा. अरुण म्हणाला, 'लाहिडी दा, तुम्ही काहीच खात नाही'.

'छे, छे तसं नाही - पण खाऊ तरी काय? काहीच रुचत नाहीये. सगळं सडलेलं आहे. -कोंबडीचं मांस देखील सडलेलं आहे'.

खेमका विचित्र चेहरा करून म्हणाला, 'जिवंत कोंबडी सडलेली? हा-हा-हा-हा-' सगळे हसू लागले. लाहिडी चिडून म्हणाला, 'व्हॉट्स फनी? ऑं? पार सडलेली - शी-'

लाहिडी बोटांनी भात आणि मांस खाली जमिनीवर उडवू लागला. ते बघून देशपांडे म्हणाला, 'दादा, खायचं नसेल तर नका खाऊ; पण अन्न वाया घालवू नका.'

'घालवीन, अन्न वाया घालवीन. तुला काय त्याचं?'

'हें खूपच झालं. इतके लोक अन्नावाचून मरताहेत आणि आपण असं पोटभर

जेवतोय हेच अगोदर खूप झालं. त्यातून पुन्हा अन्नाची नासाडी---'

'ए, गप्प बैस बघू. मला वाटलं तर मी करीन अन्नाची नासाडी--'

'त्यात काय अर्थ आहे? बंगल्याचे बेयरे खातील - नाहीतर भिकाऱ्यांना देऊन टाकतील. पण हे असं उगाच-'

'शट अप. मला काही ऐकायचं नाही. खाता येत नाही. भिकारी - काहीच रुचत नाही. मला हे आता आणखी सहन होत नाही. हे काय बोलणं झालं? पूर्वी काय कुणी न खाता --- मग बोलावून दाखव. ए खेमका, मी तुला वॉर्निंग देतो - आज दिवसभर कुणी खाण्याचा विषय काढायचा नाही, बोलायचं नाही, इनफ? आज दिवसभर सुट्टी, समजलं? आज दुष्काळापासून सुट्टी, समजलं सगळ्यांना? आज फक्त बाई आणि बाटलीविषयी बोलायचं - खबरदार जर कुणी असं काही बोललं ---'

'त्याची काही गरज नाही मि. लाहिडी. गाडी दुरुस्त झाली आहे. खाणंपिणं आटोपताच आपण स्टार्ट करू शकतो.'

'वा, वा, - खाणं झाल्यावर लगेच मी तुझ्या त्या खटारागाडीत बसेन होय? आज आपण इथेच थांबू या.'

'पण तुम्ही तर म्हणत होता की परवा तुम्हाला कलकत्त्याहून प्लेन पकडायचं आहे!'

'मला प्लेन पकडायचं आहे त्याची तुला का इतकी काळजी? सांगितलं ना आज सुट्टी!'

दिल्लीच्या दोघा वार्ताहरांची लगेच निघायची इच्छा होती. देशपांडेची देखील थांबायची इच्छा नव्हती. घेतलेले फोटो त्याने लगेच रिलीज केले नाही तर त्यांना काही किंमत उरणार नव्हती. अखेर चार जण निघून गेले. बाकीचे चार जण तिथेच राहिले. त्यांच्यासाठी गाडी दुसऱ्यांदा माघारी येईल.

ते लोक व्हरांड्यात आरामखुर्च्यांवर बसले. लाहिडीने पुन्हा ग्लासात व्हिस्की ओतली. दुसऱ्यांच्या ग्लासातही जबरदस्तीने ओतली. अल्कोहोल आता रक्तात भिनलं आहे. अंगातल्या साऱ्या नसांमधून रक्ताबरोबरच अल्कोहोलही फिरत आहे. लाहिडी विलक्षण बेचैन झालाय, तळमळतोय. कधी खुर्ची सोडून उठून बसतो, कधी येरझाऱ्या घालू लागतो, पुन्हा खाली बसतो. ऊन रणरणतंय. या उन्हाच्या वेळी वारा वाहू लागला की अजब आवाज होतो. कोलाहल करणारा हा वारा थेट रानामधून येतोय.

विहिरीवर पाणी भरायला बायकापुरुषांची अजूनही रीघ लागलेली होती. रहाटची घरघर आणि न समजणाऱ्या त्यांच्या भाषेतील भांडणांचा कोलाहल, लाहिडी आपल्या मित्रांना म्हणाला, 'का, सगळे जण असे गप्प का? बोला, गप्पा मारा. ए रंगाचारी, नुकताच तू रशियाला जाऊन आलास. तिथल्या बायका बियका कशा

आहेत रे? मिळतात का?'

रंगाचारीने जांभई घेत उत्तर दिलं, 'चौकशी करायला मला वेळच नाही मिळाली. अगदी टाइट प्रोग्राम होता.'

'तू बायकांची चौकशी केली नाहीस हे खरं तरी वाटेल का? जर्मनीला गेला होतास तेव्हा तर- सांग, सांग, अरे तेव्हाचे किस्से सांग.'

'तुम्हीच सांगा'.

'मी काय सांगणार? सगळे केस पांढरे झाले याचंच अगोदर दुःख आहे - आता - ए अरुण, तू अजून पोरसवदा आहेत, लग्नही केलेलं नाहीस. प्रेमाबिमाच्या एकदोन गोष्टी सांग बघू.'

'लाहिडी दा, तुम्हीच तुमचं ते स्पेनमधलं प्रकरण सांगा'.

रामयशसिंह अत्यंत गंभीर स्वभावाचा माणूस आहे. कुणाचा इंटरव्ह्यू घ्यायचा असेल तरच तोंड उघडतो. एरवी सहजासहजी फारसं बोलत नाही. दारूदेखील मुकाट्यानेच पितो. रंगाचारीने त्याला कुजबुजत विचारलं, 'बिहारची किती टक्के जनता दुष्काळग्रस्त आहे?'

रामयशसिंहने संक्षिप्त उत्तर दिलं, 'अजूनपर्यंत फिफ्टी फोर पर्सेन्ट!'

'स्टार्व्हेशनची मृत्युसंख्या?'

'ऑफिशियल रेकॉर्ड काही नाही. अनऑफिशियली --'

एक हुंकार देऊन लाहिडी म्हणाला, 'पुन्हा तेच? तुम्ही मला वेड लावणारसं वाटतंय! सांगितलं ना, आज सुट्टी आहे. नोकरीचा काच एक दिवसही विसरता नाही का येत?'

'मि. लाहिडी हा फक्त नोकरीचा इंटरेस्ट नाही. ह्यूमन इंटरेस्ट आहे!'

'शट अप. मला काही एक ऐकायचं नाही.'

'नो यूज आर्ग्युइंग विथ ए ड्रंक --'.

'जरासुद्धा ड्रंक नाही. दुसऱ्याच्या पैशांवर दारू आणि कोंबडी पचवल्यावर आता म्हणे ह्यूमन इंटरेस्ट! बुलशिट! आता बायकांविषयी बोला. मद्य आणि मांस यांच्यानंतर बायकांच्याच गप्पा चांगल्या वाटतात.'

'तर मग तुम्हीच सांगा ना. आम्ही सगळे ऐकायला तयार आहोत.'

'लास्ट इयर जानेवारीत, मी जेव्हा माद्रिदला होतो, हॉटेलात रात्रीच्या वेळी - ती पोरगी बाथ टबमध्ये होती - मी दार वाजवताच टॉवेल गुंडाळून - मला त्यावेळी खूप चढलेली होती. ते बघा, झोपतोय तो, ए रंगाचारी, ए -'

रंगाचारीच्या घोरण्याचा आवाज ऐकू येत होता. लाहिडीने त्याला तीनचारदा मोठमोठ्याने हाका मारल्या. पण काही उत्तर नाही. लाहिडी अडखळत पुढे झाला आणि त्याचे केस ओढून म्हणाला, 'ए साल्या रंगाचारी' - रंगाचारी गडबडून म्हणाला, 'अरे, झोप लागली होती - ते बघा - खेमकादेखील झोपलाय -'

'या साल्या खेमकाची मी रुस्तमजीपाशी तक्रार करीन. ए - (इथे छापण्यासारखं नाही) खेमका -'

खेमकाने डोळे उघडीत म्हटलं, ' झोपलो नाहीये. नुसते डोळे मिटले आहेत. तुम्ही सांगा, मी ऐकतोय. हं, तर मग ती छोकरी टॉवेल गुंडाळून -'

'एका झटक्यात मी टॉवेल ओढला! त्याच वेळी मला जगज्जनीचं रूप दिसलं. मी अगदी पैजेवर सांगतो. कोट्यवधी बायकांमध्येही अशी बाई आढळणं कठीण आहे- सारं शरीर जणू तलवारीचं पातं होतं - वक्ष जणू दोन सर्च लाइट होते आणि मांड्या - ती सर्वांत अगोदर काय म्हणाली, सांगू? त्या पोरीने त्यावेळी मला काय म्हटलं?'

कोण उत्तर देणार? तिघेही पेंगुळले होते. नाकातून घोरण्याचा अस्पष्ट आवाज ऐकू येत होता. माना खाली घालून सगळे झोपले होते. फक्त अरुण तेवढा जागा होता, मंद मंद स्मित करीत!

लाहिडीच्या चेहऱ्यावर वेदनेची झाक होती. डोळे विस्फारून म्हणाला, 'सगळे झोपले? आँ? मर्द? हे मर्द आहेत होय? बाईच्या गप्पा ऐकता ऐकता झोपले? ह्यूमन इन्टरेस्ट! साले-'

अरुणने म्हटलं, 'लाहिडी दा, तुम्ही सांगा ना! ती पोरगी काय म्हणाली?'

'ऐकायचंय तुला? माझ्या हातात टॉवेल होता. ती खी खी करून हसत म्हणाली, 'माझी पाठ ओली आहे, पुसून दे.' मी त्यावेळी - छे, काहीसुद्धा आवडत नाही! तीनतीन मुडद्यांच्या नाकाचा हा कोलाहल - छे, अशाने का अशाप्रकारची गोष्ट सांगता येते? चल, ऊठ. जरा फिरून येऊ.'

'कुठं जाणार या उन्हात? बसा ना. लाहिडी दा तुमचा जन्म कुठला हो?'

'अलाहाबाद. माझे बाबा तिथे प्राध्यापक होते. पण तू का विचारतो आहे हे?'

'सहज.'

'ती व्हिस्कीची बाटली जरा इकडे आण बघू. बरं जाऊ दे. आता आणखी नाही पिणार. काहीसुद्धा आवडत नाही. आता काय करायचं तूच सांग.'

'तुम्ही जरा वेळ झोप घ्या.'

'दुपारी झोप घेऊ? अरे त्यापेक्षा आपण गेलो असतो तर बरं झालं असतं. या घोरणाऱ्या मुडद्यांबरोबर रहायचं - तू आता काय करणार आहेस?'

'काही नाही. इथेच मुकाट्याने बसून राहीन. इथे येऊन मला बऱ्याच गोष्टी आठवल्या-'

'कुठल्या गोष्टी? प्रेयसी-'

**'छे, छे पूर्व बंगालमध्ये माझा जन्म झाला होता. बांगला देशच्या त्या पन्नासच्या दुष्काळाच्या वर्षी! एकोणीसशे त्रेचाळीच साली मी पूर्व बंगालमध्येच होतो - अचानक ते दिवस आठवले.'**

'त्यावेळी तू पोर असशील.'

'हो, मला पोटाचा विकार होता. सारखी भूक लागायची. दिवसभर अधाशासारखा बखवखलेला असायचा आणि रडायचा. घरच्यांना खूप त्रास द्यायचा.'

'मेलो! हे सगळं अचानक इथे आल्यावर कसं काय आठवलं तुला?'

'बाबा त्यावेळी कलकत्त्याला शिक्षक होते. ते दरमहा वीस रुपये घरी पाठवायचे. तो काळ तुम्हाला ठाऊक आहेच. पूर्व बंगालमधल्या आमच्या गावी त्या काळी तांदूळ छप्पन रुपये मण होता. घरात पाच जण होतो. दिवसातून एकदा भात आणि पेज मिळून कसंबसं भागात होतं आमचं. आणि जोडीला उकडलेले बटाटे. खिशात नेहमी उकडलेले बटाटे ठेवायचा. त्यावेळी चौथीत शिकत होतो. शाळेतही मी खिशातून उकडलेले बटाटे काढून खायचा. वर्गातली सगळीच मुलं घरून उकडलेले बटाटे आणायची - बाकावर मीठ - मला काहीच सहन होत नसे. पोटाचा त्रास होता ना, म्हणून भात, उकडलेले बटाटे काहीच पचत नसे. तरीदेखील सारखी भूक लागायची, आईला छळायचा. आई जेवायला बसली की तिचं अन्न ओढून घ्यायचा.'

लाहिडी उगाचच मान हलवू लागला. म्हणाला, 'समजलं, समजलं!' लाहिडी तिथून उठून व्हरांड्याच्या कोपऱ्यात निघून गेला. दुसरीकडे पहात म्हणाला,' समजलं. आता तुझी आई हयात नाही. हो ना?'

'नाही, त्याच वर्षी माझी आई क्षयाने गेली. त्या दिवसात माझी भूक बकासुरासारखी होती. काही पचत नसे, तरी मी आईचं जेवण हिसकावून घेत असे. आई कुणाला काही न बोलता रोज उपाशी रहायची. म्हणूनच आईला क्षय रोग झाला. त्यावेळी काही समजत नसे. आता सगळं आठवतंय. काल अन्नछत्रापुढची रांग बघून कससंच वाटू लागलं. खरं म्हणजे, थोडी गंमतच वाटली. मला वाटलं, किती आश्चर्याची गोष्ट आहे की मी अजून जिवंत आहे.'

लाहिडीने पुन्हा हुंकार दिला. म्हणाला, 'गंमत वाटली म्हणजे? ही काय गमतीची बाब आहे?'

अरुण तसाच गूढ हसत म्हणाला, 'हो, त्या पन्नासच्या दुष्काळात मी देखील कदाचित मेलो असतो. पण नाही मेलो. आपल्या आईला मारून मी स्वतः जिवंत राहिलो. हे असं जिवंत राहणं ही काय गमतीची गोष्ट नाही?'

लाहिडीने सिगारेटचा उरलेला तुकडा बोटाच्या टोकात धरून झुरका घेतला आणि मग दूर फेकून दिला. पँटच्या खिशात हात घालून चिल्लर खुळखुळू लागला. दुसरा हात डोक्यावर ठेवला. अचानक उडी मारून व्हरांड्यातून खाली उतरला, एक फूल तोडून घेतलं. किंचाळून म्हणाला, 'अरुण, तू खोलीत जा, थोडा वेळ खोलीत अंधार करून पड जरा. बरं वाटेल तुला.'

अरुण डोळ्यांनीच लाहिडींचा मागोवा घेत होता. उत्तर दिलं, 'नको, ठीक आहे.

इथंच बरं वाटतंय'.

लाहिडी विहिरीपाशी गेला. एक बाई नुकतीच घागर भरून परत निघाली होती. तिला म्हणाला, 'बाई, तोंड धुवायला थोडं पाणी दे'.

बाई गोंधळून स्तब्ध उभी राहिली. लाहिडीच्या धुंद तारवटलेल्या डोळ्यांकडे पहात राहिली. त्यानंतर कडेवरूनच घागर वाकवून थोडंसं पाणी ओतलं. लाहिडीने ओंजळीत ते गार पाणी घेतलं आणि तोंडावर त्याचे हबके मारले. पुन्हा थोडं पाणी मागून घेतलं आणि पिऊन टाकलं. मग त्या बाईला म्हणाला, 'आण, तुझी घागर पुन्हा पाण्याने भरून देतो.'

ऑर्डर्लीला बाजूला करीत म्हणाला, तू जा. मीच या सगळ्यांना पाणी भरून देतो'.

वाकून पाहिलं, विहिरीत खोलवर पाणी आहे म्हणून काय झालं ते संपणार नाही!

# जगण्यासाठी

**प्रफुल्ल राय**

माघ महिना सरत आला होता. तरी थंडी कमी व्हायचं नाव नव्हतं. त्यातून आज तर आभाळाच्या या कोपरापासून पार त्या कोपरापर्यंत दगडी शिळांसारखे मेघ दाटून आलेले होते. अधूनमधून जरासं ऊन डोकावत होतं. पण तेवढ्यानेही मेघाच्छादित आभाळ जणू दचकायचं आणि दुसऱ्याच क्षणी तो प्रकाश अदृश्य व्हायचा.

विष्णुपद उत्तरेकडच्या मैदानात पोचला तेव्हा थंडीचा दिवस मावळायला आला होता. झाडाझुडपांच्या सावल्या लांब व्हायला लागल्या होत्या.

विष्णुपदच वय असेल चाळिशीच्या आसपास! टेकाडासारख्या उंच नाकाचा. दोन्ही बाजूंना दोन मिचमिचे डोळे. भुवया जवळजवळ नाहीच. काळा जाड ओठ खालच्या बाजूला लोंबणारा. पिचके गाल. फुटलेला आवाज. खरखरीत कातडी. सारं काही मिळून जणू एखादं कोळपलेलं ताडाचं झाडच! शरीराच्या नावाखाली हाडांचा सांगाडा फक्त! याच सांगाड्यावर थोडं जरी मासं चढलं असतं तर विष्णुपद पहाडासारखा जबरदस्त माणूस बनला असता.

कपड्यांच्या नावाखाली त्याच्या अंगावर एक कळकट मळकट चड्डी होती आणि शेकडो चिंध्या लावलेला एक रंगीबेरंगी कुडता होता. डोक्याला पंचा गुंडाळलेला. शिवाय खांद्यावर कुऱ्हाड आणि कमरेला कोयता.

तीन दिवसांपासून विष्णुपद बेकार आहे. काम नाही म्हणून कमाई पण नाही. नुसतं हातावर हात ठेवून बसून रहायला त्याच्यासारख्या मजुरापाशी काही सोन्याचा ढीग नाही लागलेला. जे काही चारदोन दाणे घरात होते त्याने कालपर्यंत भागलं होतं. आज काही काम मिळालं तर बायकापोरांना काही खायला घालता येईल. नाहीतर उपास ठरलेला.

झोपेतून उठताच विष्णुपद काम शोधायला बाहेर पडला होता. पण काम कुठेय? भटकून पायपीट करून तो हताश झाला, दमून गेला, तेव्हा त्या उत्तरेकडच्या मैदानाची आठवण झाली.

उत्तरेकडच्या या मैदानाने विष्णुपदला खूप वेळा वाचवलं आहे. इथून काही फळं, भाज्या, कधी चिमणी, कधी ससा तर कधी कासव नेऊन आपल्या बायकापोरांचा जीव वाचवला आहे. आजसुद्धा तो याच आशेने आला आहे.

मैदानात पोचून विष्णुपद काही वेळ तसाच उभा राहिला. मैदान ओस होतं. दृष्टीच्या टप्प्यापर्यंत नुसतं गवतच दिसत होतं. थंडीमुळे गवतावर तजेला नव्हता, मरगळल्यासारखं ते दिसत होतं. अधूनमधून झाडंझुडपं होती. मैदानातून एक कालवा पण वहात होता.

चहूकडे नजर टाकीत विष्णुपदने चालायला सुरूवात केली. मावळतीच्या या वेळेला डोक्यावरून पक्ष्यांचे थवेच्या थवे उडत जात होते. विष्णुपदच्या मनात आलं, आज गलोल आणली असती तर बरं झालं असतं. एकदोन पाखरं सहज टिपता आली असती. चुकलंच आपलं.

चालता चालता जे झाड वा झाडी समोर दिसायची तिच्याकडे विष्णुपद तीक्ष्ण नजरेने बघू लागायचा. खाली गवताकडेही त्याचं लक्ष होतं. पण त्याला जे हवं होतं ते काही कुठे दिसत नव्हतं.

बराच वेळ चालल्यावर मैदानाच्या मध्यभागी कालव्याकडे नजर जाताच विष्णुपद थबकला. कालव्याशेजारी एक बाई उभी होती. ती टक लावून त्याच्याकडे पहात होती.

विष्णुपद जिथे उभा होता तिथून दहा पावलं टाकताच त्या बाईला धरता येण्यासारखं होतं. इतक्या जवळ असल्याने ती स्पष्ट दिसत होती. बाईच्या डोळ्यात कारुण्य आणि संशय होता.

थंडीच्या वेळी या निर्जन मैदानात ही बाई कुठून आली? विष्णुपदला समजेनाच. तो तिला न्याहाळून बघू लागला. सावळा रंग. चेंडूसारखे गोल गोबरे गाल. बुच्चं नाक. टचटचीत वक्षस्थळं. रसरसलेलं तारुण्य अनावर होऊन आखुड अपुऱ्या साडीत मावत नव्हतं. तिच्या हातात एक मोठा कोयता होता.

बऱ्याच वेळाने विष्णुपदने विचारलं, ''कोण ग तू?''

तीव्र पण खालच्या आवाजात ती बाई म्हणाली, ''मी कुणी का असेना, तुला काय त्याच्याशी? तू तिथेच उभा रहा.''

''उभा रहा म्हटल्यानं का उभं रहाता येतं? मला काम आहे.''

''काय काम आहे?''

''आहे काहीतरी,'' बोलून विष्णुपद थबकला. मग पुन्हा म्हणाला, ''या ओस मैदानात तू एकटीच आली आहेस?''

बाई म्हणाली, ''मला पण काम आहे.''

नकळत विष्णुपद पुढे पाय उचलणार होता. तेवढ्यात ती बाई जोरात किंचाळली, ''खबरदार, एक पाऊल पुढे टाकू नकोस. कोयता मारीन.''

विष्णुपद दचकला. त्याला दिसलं की थोड्या वेळापूर्वी बाईला जी भीती वाटत होती ती आता नाहीशी झाली होती. तिचे डोळे पेटले होते.

भीत भीत विष्णुपद म्हणाला, ''ठीक आहे. तुझी मर्जी नसेल तर नाही पुढे पाय

टाकणार. पण तू कुठली आहेस, कुठून आली आहेस ते सांगायला काय हरकत आहे?''

त्या बाईला काय वाटले कुणास ठाऊक? ती जरा सौम्य झाली. ''मी तालडांगामध्ये रहाते. त्या तिकडे उत्तरेला-''

''ते तर खूप दूर आहे. कोसभर तरी लांब असेल!''

''हो -''

''इतक्या लांब एकटी आली आहेस?''

''गरज पडली तर यायला नको का?''

''कसली गरज सांग ना?''

बाई म्हणाली, ''सारं ऐकायचंय तर ऐक. मी फळंबिळं, भाज्याबिज्या गोळा करायला आलेय.''

विष्णुपद थक्क झाला. आश्चर्याने म्हणाला, ''कमाल झाली! मी पण त्याच कामासाठी आलोय.''

बाईचे डोळे पुन्हा लकाकले, ''खोटं!''

''खरंच सांगतो. खोटं नाही बोलत.'' विष्णुपद कातर होऊन म्हणाला, 'देवाशपथ. सकाळपासून पोरंबाळं उपाशी आहेत. तीन दिवस झाले. पैची मजुरी नाही मिळाली. आज हात हलवत इथून गेलो तर पोरंबाळं जगणार कशी?''

विष्णुपदच्या आवाजावरून, त्याची कातरता बघून बाईचा त्याच्यावर विश्वास बसला. म्हणाली, ''तुझा काही वाईट हेतू तर नाही?''

'देवाची शपथ घेऊन सांगितलं की! तू इकडे ये म्हणजे तुझ्या गळ्यावर हात ठेवून सांगतो.''

''माझ्या गळ्यावर हात ठेवायची काही गरज नाही. तुझं घर कुठंय?''

''पयारपूरला, तिकडे दक्षिणेकडे-'' विष्णुपदने बोटाने दक्षिणेकडे खुणावले.

''तुझं घरदेखील खूप लांब आहे.''

वेडेवाकडे पिळवट दात दाखवीत विष्णुपद हसला, ''तूच तर नुकतंच म्हटलं होतंस की गरज पडली तर लांबूनसुद्धा यावं लागतं.''

बाई उद्‌गारली, ''खरंय ते!''

विष्णुपद म्हणाला, ''इतकं बोललो आपण पण अजून आपली नावं एकमेकांना ठाऊक नाहीत. माझं नाव आहे विष्णुपद आणि तुझं?''

''निशी-निशिबाला.''

थोडा वेळ मौन. मग विष्णुपदने विचारलं, ''एक सांगू?''

''सांग.''

''तू ज्या कामासाठी आली आहेस त्याच कामाकरता मी आलो आहे. चल, दोघं मिळून भाज्या, फळंबिळं शोधू या. थंडीची वेळ आहे. आता दिवस मावळेल. तू

तरुण आहेस. मैदानात असं एकटंदुकटं हिंडणं बरं नाही.''

थोडा वेळ इकडे तिकडे केल्यावर निशी म्हणाली, 'हेच ठीक आहे. चल, तुझ्याबरोबर चलते.'' तीच स्वतःहून विष्णुपदपाशी आली.

त्यानंतर मैदानात भटकता भटकता त्या दोघांमध्ये जणू एक अलिखित समझोता झाला. जे काही मिळेल ते दोघांनी निम्मे निम्मे वाटून घ्यायचे.

विष्णुपद आणि निशी मैदानातील एकेका झाडाझुडपात, खाचखळग्यात शोधत राहिले. पण चार छोट्या छोट्या कासवांखेरीज दुसरं काही हाती लागलं नाही. त्यांची टणक पाठ सोलून कितीसं मांस मिळणार आहे?

चालताना त्यांची तोंड बंद नव्हती. अन्नाच्या शोधात चालता चालता कधी निशी विचारायची, ''तुझ्या घरी कोण कोण आहे?''

विष्णुपदविषयी तिला वाटणारा संशय आणि भीती थोड्याच वेळात मावळली. तिचा त्याच्यावर थोडाफार विश्वास बसला.

विष्णुपदने सांगितलं, ''बायको आहे, पोरं आहेत.''

''किती पोरं आहेत?''

''तीन. दोन मुलगे, एक मुलगी.''

''तर मग पाच माणसांचा संसार आहे तुझा?''

''हो.''

''तू काय काम करतोस?''

''मजुरी.''

''भागतं?''

''कसंबसं. बहुतेक अर्धपोटीच रहावं लागतं. नाहीतर मग उपाशी रहातो.''

काही विचार करून निशीने विचारलं, ''जमीनबिमिन काही?''

''कुठची आलीय?''

''तर मग काय नुसत्या मोलमजुरीवर रहातोस?''

''हो.''

''खूप त्रास होत असेल?''

''काय करणार! जातील तेवढे दिवस जातील.''

कधी विष्णुपद विचारायचा, ''माझ्याविषयी चौकशी करते· आहेस. तुझ्याविषयीदेखील काही सांग की-''

निशी म्हणायची, ''माझ्याविषयी नवं काय आहे? मी पण मजुरीवरच जगते.''

''अग तुला काय वाटलं मला एवढंदेखील समजत नाही? मला सारं ठाऊक आहे. मी ते थोडंच विचारतो आहे?''

विष्णुपदने मान वळवून एकदा तिच्याकडे बघितलं. मग म्हणाला, ''सौभाग्याच्या बांगड्या नाहीत की कुंकू नाही. अजून लग्न नाही झालं?''

विमनस्कपणे ती म्हणाली, ''झालं होतं.''

''मग?''

विष्णुपदला काय जाणून घ्यायची इच्छा आहे ते निशीने ओळखलं. लग्न झालंय तरी हातात सौभाग्यचूडा नाही, कपाळावर कुंकू नाही, म्हणून विष्णुपद गोंधळला आहे. खिन्न स्वरात निशी म्हणाली, ''माझा नवरा नाही.''

विष्णुपदने तोंडाने च् च् असा संवेदनादर्शक आवाज काढला. व्यथित स्वरात म्हणाला, ''अरेरे, या वयात नवरा गेला?''

निशीने उत्तर दिले नाही.

विष्णुपदने पुन्हा विचारले, ''काय झालं होतं? आजारी बिजारी?''

निशी म्हणाली, ''नाही. खंडकऱ्याशी भांडण झालं. त्यात मारला गेला. पोटात सुरा खुपसला त्यांनी. आतडीच बाहेर काढली. अगाई, बघवत नव्हतं -'' बोलता बोलता अचानक ती मोठ्यांदा रडू लागली. ''आई ग, माझ्या चांगल्या धट्ट्याकट्ट्या माणसाला मारून टाकलं त्यांनी!''

विष्णुपद विचारात पडला. पण थोड्या वेळाने तिच्या रुक्ष केसांवर हात फिरवीत म्हणाला, ''रडू नको, रडू नकोस. झालं गेलं होऊन गेलं.''

बऱ्याच वेळानंतर तिचं रडू आवरल्यावर विष्णुपदने विचारलं, ''पोरं किती आहेत तुला?''

दाटून आलेल्या गळ्याने ती म्हणाली, ''एकही नाही.''

''हे त्यातल्या त्यात बरं झालं.''

निशी गप्प राहिली.

विष्णुपदने पुन्हा विचारलं, ''घरी आणखी कुणी आहे?''

''म्हातारी सासू आहे. तिची भूक कधी भागतच नाही. सारखी वखवखलेली असते. इतका मोठा डोंगरासारखा पोर गिळला तरी अजून पोट भरलं नाही. तिचं पोट भरता भरता एक दिवस मी पण मरून जाईन.''

''काही जमीनबिमीन?''

''असती तर अशी भाज्यांसाठी वणवण भटकले असते का?''

दोघं शोधत होते. पण आईसारखं ते विशाल मैदान आज अगदी कृपण झालं होतं, निर्दयी बनलं होतं. चार कासवं आणि पिकलेली पाच बेलफळं याखेरीज अजून काही हाती लागलं नव्हतं. त्यात निम्मी निम्मी वाटणी केल्यावर काय वाट्याला येणार होतं?

तिकडे हिवाळ्याची सायंकाळ आणखी उतरणीला लागली होती. उन्हाचं नावनिशाण नव्हतं. सूर्य पश्चिमेकडच्या झाडीआड कधी लपला ते विष्णुपद वा निशीला समजलंसुद्धा नाही. बघता बघता चहूकडे अंधार पसरू लागला.

सकाळपासून आभाळाला हत्तीसारखे ढग इतस्ततः झुलत होते. आता अचानक

त्यातले बरेचसे खाली उतरू लागले. थेंब थेंब पाणी पडू लागले. तशातच अंगावर शहारा आणणारा उत्तरेकडचा सोसाट्याचा वारा. कातडी आणि मांस भेदून थेट हाडांपर्यंत पोचत होता. हाडं कुडकुडत होती. गार गवतावरून धुकं उठत होतं.

उजवीकडून निशी म्हणाली, ''आज खूप थंडी आहे, नाही?''

विष्णुपदने उदासपणे उत्तर दिलं, ''हो.''

विष्णुपद वर वर निशीच्या प्रश्नांना उत्तरं देत होता खरा. पण मनातल्या मनात दुसराच कसला तरी विचार करीत होता. आपल्या वाटणीची दोन कासवं आणि अडीच बेलफळं नेऊन तो कुणाच्या तोंडी काय घालणार? म्हणाला, ''आणखी काही मिळाल्याखेरीज भागायचं नाही. माझ्या घरात पाच जण आहेत.''

निशी म्हणाली, ''खरंय तुझं म्हणणं. पण संध्याकाळ झाली आहे. पाऊस पण पडायला लागला आहे. आता काय मिळणार आहे?'' त्याच्या डोळ्यातून, त्याच्या आवाजातून, त्याच्या चेहऱ्यावरून संशय दिसून येत होता.

''बघ.'' बोलता बोलता विष्णुपदचे डोळे चकाकले. समोर बोटाने खुणावून उत्तेजित होऊन त्याने विचारलं, ''ते काय आहे?''

निशीने तिकडे नजर टाकून म्हटलं, ''डुक्कर आहेसं वाटतं!''

''हो.''

''तो मेला तिथं काय करतोय?''

विष्णुपद निरखून पाहू लागला. मग म्हणाला, ''माती खोदतोय.''

निशीने सांगितलं की डुक्कर माती उकरतोय त्या अर्थी त्याला तिथं नक्कीच काहीतरी सापडलं आहे. मातीखाली काही नसेल तर डुक्कर उगाच माती उकरत नाही.''

विष्णुपद म्हणाला, ''चल, जाऊन बघू या.'' त्याच्या मनात आणखी एक विचार विजेसारखा चमकून गेला. दुसरं काही मिळालं नाही तर या डुकरालाच मारून टाकावं. निदान मणभर तरी त्याचं वजन असेल. निशिबालाला निम्मा भाग देऊनदेखील जितकं मासं वाट्याला येईल त्यावर पाच जणांना मजेत तीनचार दिवस गुजराण करता येईल. आणि तीनचार दिवस जरी काम भागलं तरी पुढचं पुढे मग बघता येईल.

मनातली गोष्ट निशीला सांगताच ती हलक्या आवाजात म्हणाली, ''तुझं म्हणणं पटतंय. पण-''

''काय?''

''इतक्या जबर प्राण्याला तू पकडू शकणार नाहीस. त्यातून त्याला दात असले तर मग धडगत नाही.''

विष्णुपदने म्हटले, ''माझ्यापाशी कुऱ्हाड आहे, कोयता आहे.''

निशी म्हणाली, ''कुऱ्हाडीने किंवा कोयत्याने त्याला मारणं शक्य नाही.''

मेल्या स्वरात विष्णुपद म्हणाला, ''नाही मारता आलं तर न का येईना. एकदा प्रयत्न तर करून बघून देत. उपाशी मरायच्या ऐवजी डुकराशी दोन हात करून बघितलेलं काय वाईट-''

निशीला आणखी काही बोलायची संधी न देता विष्णुपद पुढे सरसावला. निशी निमूटपणे त्याच्या मागून चालू लागली.

जवळ जाऊन बघितलं तर दिसलं की डुकराला मोठाले सुळे नाहीत. पण रानडुक्कर आहे. माती उकरून त्याने भला मोठा खड्डा खणला आहे. खड्ड्यात डोकावून बघताच विष्णुपदचे डोळे विस्फारले. एका मोठ्या रताळ्याचा निम्मा भाग खाली जमिनीत दबलेला होता. आणि निम्मा भाग जमिनीवर डोकावत होता. डुक्कर माती उकरून रताळं बाहेर काढीत होते.

विष्णुपदने अंदाज लावला की रताळ्याचं वजन कमीत कमी दहा शेर तरी नक्कीच असेल. डुक्कर जरी मारता आलं नाही तरी हे रताळं मिळाल्यास काम भागेल. अचानक मनातल्या मनात त्याने ठरवून टाकलं की डुकराशी लढाई करण्यात काही अर्थ नाही. उलट त्याला हाकलून रताळं काढून घ्यायला हवं.

मागून लालचावलेल्या आवाजात निशी म्हणाली, ''किती मोठं रताळं आहे नाही?''

विष्णुपद उत्तरला, ''हो.''

डुक्कर एकाग्रपणे माती उकरत होतं. माणसांच्या आवाजाने दचकून त्याने नाकाड वर उचललं. त्याचे लहान लहान डोळे लालभडक दिसत होते. सारं आंग मातीने बरबटलेले होते.

विष्णुपदने त्याला पळवून लावण्यासाठी तोंड वेडावून आवाज काढला, ''हुडुत - हुडुत - हाड - हा ऽ ड -''

डुक्कर तसूभर हलले नाही. एकटक विष्णुपदकडे बघत राहिले. त्याच्या लहान डोळ्यांत संशय वाढू लागला.

विष्णुपदने पुन्हा तोच आवाज काढला. त्याच्याबरोबर निशीनेदेखील. पण डुक्कर हटले नाही.

विष्णुपद म्हणाला, ''अडेल आहे मेला. जाईलसं वाटत नाही.''

निशी म्हणाली, ''आपण रताळं घेणार असल्याचं त्याने ओळखलं वाटतं.''

''म्हणून काय झालं?'' विष्णुपद बोलू लागला. ''आरडाओरड करून काही उपयोग नाही. साल्याला कुऱ्हाडीच्या एका घावात लोळवतोच.'' असं म्हणून त्याने पुढे होऊन खांद्यावरची कुऱ्हाड काढून डुकराच्या मानेपाशी हाणली.

घाव नीट बसला नाही. डुकराच्या मानेजवळची कातडी थोडी खरचटली. डुक्कर थोडा वेळ हिंस्र दृष्टीने बघत राहिले. मग अचानक त्याने झडप घातली.

तो असा हल्ला करील याची विष्णुपदला अजिबात कल्पना नव्हती. दोघे जीव घेऊन पळाले.

त्यांना बरंच दूरवर पळवून लावल्यावर डुक्कर पुन्हा रताळयापाशी जाऊन उभं राहिलं. विष्णुपद आणि निशी पण दबले नाहीत. थोड्या वेळाने ते पुन्हा डुकरापाशी परतून आले. येताच विष्णुपदने पुन्हा घाव घातला. यावेळी डुकराची पाठ चांगलीच जखमी झाली. घायाळ डुकराने पुन्हा त्यांच्यावर हल्ला चढवला.

डुक्कर अंगावर धावून येताच विष्णुपद आणि निशी दूर पळून जायचे, त्यानंतर परत येऊन संधी मिळताच डुकरावर वार करायचे. बराच वेळ हे असं चाललं होतं.

इकडे थंडीची सायंकाळ आणखी दाट झाली होती. सावल्या झाडाझुडपांमध्ये दाट होऊन गोठून गेल्या होत्या. थोड्या वेळापूर्वी थेंब थेंब पाणी पडत होतं, आता जोरात पाऊस पडू लागला होता. जोडीला उत्तरेकडचा वारा होताच!

निशी हताश झाली होती. म्हणाली, ''जाऊ दे. त्या यमाच्या तोंडून काही ते रताळं काढता यायचं नाही.''

विष्णुपद हट्टाला पेटला होता. म्हणाला, ''मुळीच नाही. रताळं घेतल्याशिवाय मी इथून हलणार नाही. संधी मिळाली तर रताळं पण घेईन आणि या डुकराला पण खतम करीन. मला एक युक्ती सुचलीय. यावेळी आपण दोघांनी त्याच्या समोर नाही उभं रहायचं. मी समोर उभा राहीन. तू मागच्या बाजूला उभी रहा. तो माझ्याकडे धावला की तू घाव घाल. आणि तुझ्याकडे वळला की मी घाव घालीन.''

त्याच योजनेनुसार विष्णुपद आणि निशी डुकराच्या मागे पुढे उभे राहिले. डुकराला काय वाटले कोण जाणे. त्याला कदाचित वाटले असेल की आपण इतक्या कष्टाने रताळं शोधलं आणि हे दोन दावेदार उभे राहिले.

घाव घालण्यापूर्वीच अचानक मान वळवून डुक्कर विष्णुपदकडे धावलं. आणि त्याने इतक्या जोरात हल्ला केला की विष्णुपदला बचावासाठी वेळच नाही मिळाला. विष्णुपदच्या पोटात सकाळपासून अन्नाचा कणसुद्धा नव्हता गेला. अशक्तपणा वाटत होता. तशात मणभर वजनाच्या डुकराने धडक देताच तो पार कोलमडून पडला. त्याच वेळी आपल्या जांघेत तीक्ष्ण दात खुपसला जात असल्याचा भास त्याला झाला.

विष्णुपद जोरात किंचाळला, ''मेलो, मेलो, वाचवा -'' ओरडता ओरडता त्याचा हात कमरेपाशी गेला. झटक्यासरशी धारदार कोयता ओढून त्याने तो पूर्ण बळानिशी डुकराच्या नाकाड्यावर मारला. रक्ताची धार लागली.

मागून निशीने पण डुकरावर वार करायला सुरुवात केली. रक्तबंबाळ जनावराने विष्णुपदला सोडून निशीकडे मोर्चा वळवला. तिला पण धडक पेलवली नाही. ती पण भेलकांडत जाऊन पडली. डुकराचे दात तिची साडी आणि देह फाडू बघत होते. त्याच स्थितीत ती बेभान होऊन आंधळयासारखी कोयता हाणत राहिली.

विष्णुपदच्या जांघेत भली मोठी जखम झाली होती. त्यातून रक्त ठिबकत होतं. पण त्याने घाबरून तो बसून राहिला नाही. वेड्यासारखं झेपावून तो डुकराच्या

डोक्यावर कुऱ्हाडीचे घाव घालू लागला. निशीला सोडून डुक्कर पुन्हा विष्णुपदकडे वळले. त्याचवेळी निशीने जमिनीवरून उठून मागून त्याच्यावर हल्ला चढवला.

मार खाऊन डुक्कर कधी विष्णुपदकडे वळायचे तर कधी निशीकडे. बघता बघता थंडीच्या त्या झुंझरक्यात ते निर्जन मैदान धरतीचे आदिम रणांगण बनले. भक्ष्यासाठी दोन मानव आणि एक हिंस्र पशू झुंजत होते.

बराच वेळ झुंजल्यानंतर नाकाड्यावर विष्णुपदाच्या कुऱ्हाडीचा प्रचंड घाव बसून डुक्कर मोठ्यांदा किंचाळले. असह्य वेदनांनी ते थोडा वेळ जमिनीवर तडफडत राहिले. मग तीरासारखे धावत जाऊन पश्चिमेकडच्या रानात शिरून दिसेनासे झाले.

डुक्कर पळून गेल्यावर विष्णुपद आणि निशी बराच वेळ प्रेतवत् पडून राहिले. मग धापा टाकत उठले आणि रताळ्याचा बाकीचा भाग खोदून बाहेर काढला.

रताळं, कासव आणि बेलफळं एका जागी गोळा करून वाटणी करणार होते, तोच पावसाच्या धो धो सरी कोसळू लागल्या.

जोवर लढाई चालू होती तोवर कसलेही भान नव्हते. आवेग आणि अनादी हिंस्रपणा याखेरीज दुसरी कसलीच जाणीव तनमनाला नव्हती. आता त्यांना एकाएकी थंडी वाजू लागली. हाडांना कापरं भरलं. दात कडकडू लागले.

विष्णुपद म्हणाला, ''काय जीवघेणा पाऊस पडतोय-''

निशी थरथरत म्हणाली, ''अशी इथंच उभी राहिले तर मी मरून जाईन. काही सोय कर ना.''

''यावेळी आपण कुठं जाणार, तूच सांग -''

मग कसलासा विचार करून निशी म्हणाली, ''पश्चिमेला एक स्मशान आहे. तिथे एक झोपडी आहे. चल, तिथंच जाऊ या.''

विष्णुपदला आठवलं, ''हो, हो, चल.''

दोघेजण धावत धावत त्या स्मशानातल्या झोपडीत जाऊन पोचले. प्रेताबरोबर येणाऱ्या माणसांसाठी ती होती.

हातापायांवरचं रक्त पुसून विष्णुपद आणि निशी थोडा वेळ धापा टाकत बसले. मग विष्णुपद म्हणाला, ''खूप भूक लागलीय ग!''

निशी म्हणाली, ''मला पण!''

निशीने रताळ्याचा एक तुकडा कापला. विष्णुपदने कासवाची पाठ सोलून मास काढलं.

थोड्या वेळापूर्वी काही लोक एका प्रेताचं दहन करून गेले होते. तिथून निखारे आणून दोघांनी मांस आणि रताळं भाजलं. त्यानंतर खाऊन पिऊन दोघांनी तृप्तीने ढेकर दिली.

विष्णुपद म्हणाला, ''दिवसभरानंतर आता कुठं काही पोटात गेलं.''

निशी म्हणाली, ''माझ्या पण!''

"खाणं तर झालं. आता एखादी विडी कुठून मिळती तर!"

"हो. मला पण विड्याची खूप आवड आहे. मिळतं तर!"

इकडे पावसाचा जोर वाढला होता. विजा आभाळ भेदून कडाडत होत्या.

निशी म्हणाली, "आज पाऊस थांबेलसं वाटत नाही."

"हो." विष्णुपदने मान डोलवली.

"आजची रात्र इथंच घालवावी लागेल."

"हो."

थोड्या वेळाने विष्णुपद म्हणाला, "बसून काय होणार आहे? मी तरी जरा पडतो बुवा."

निशी म्हणाली, "मी पण पडते."

दोघे जण झोपडीतं दोन दिशांना आडवे झाले. मध्ये खूप अंतर होते.

रात्र आणखी दाट झाली तशी निशीने म्हटलं, "ऐकतोस का-"

झोपडीच्या दुसऱ्या बाजूने विष्णुपदने उत्तर दिले, "काय?"

"जरा माझ्यापाशी ये."

"का?"

"खूप थंडी आहे. जरा मला जवळ घे."

त्या विलक्षण गार रात्री एकमेकांच्या शरीराची ऊब देण्यासाठी निशी आणि विष्णुपद एकमेकांना चिकटून पडून राहिले.

दुसऱ्या दिवशी सकाळी बेलफळं, कासवं आणि प्राणपणाने लढून मिळवलेलं रताळं निम्मं निम्मं घेऊन निशी उत्तरेला निघून गेली आणि विष्णुपद दक्षिणेला निघून गेला.

# माझ्याकडे पहा
## शीर्षेन्दु मुखोपाध्याय

कृपा करून एकदा माझ्याकडे पहा. हा पहा - हा आहे मी! थोड्या वेळापूर्वी धक्काबुक्की करून मी बसच्या पायरीवर चढलो होतो. मग ठासून भरलेल्या गर्दीत इकडे तिकडे वाकून, याचा त्याचा पाय चिरडीत, उंदरासारखं बीळ करीत मी इथवर येऊन पोचलो आहे. बसमधलं हॅण्डल फार उंचावर आहे. मी बुटका माणूस आहे - तिथवर पोचता येत नाही. मी सीटच्या मागच्या बाजूला उभा राहिलो, मग अंग जरा सैल सोडलं! बसच्या धक्क्याने मी जेव्हा खाली पडू लागतो आणि आजूबाजूच्या लोकांचा आधार घेऊन सावरायचा प्रयत्न करतो तेव्हा आजूबाजूची लोकं काही फारशी नाराज होत नाहीत. कारण माझं वजन इतकं कमी आहे की कुणाच्या अंगावर पडलो तरी माझ्या ओझ्याचा व धक्क्याचा त्याला पत्ता लागत नाही. हो, आता मी बसच्या मागच्या बाजूला एका सीटला घट्ट धरून उभा आहे. माझ्या दोहों बाजूंना डोंगरासारखे उंचउंच लोक आहेत. त्यांच्यामुळे मी इतका झाकला गेलो आहे की बहुधा दिसतच नसेन. किंवा दिसलो तरी कुणी माझ्याकडे फारसं लक्ष देत नाही. यावेळी मी ज्याच्या शेजारी उभा आहे, ज्याच्या समोर उभा आहे, ते मला बघत असतील हे निश्चित. पण अगदी निर्लिप्तपणे! जणू मी नसतो तरी त्यामुळे नफानुकसान काही होणार नव्हतं. माझं वेगळेपण दिसून येईल असं माझ्या चेहऱ्यात काही नाही हेच कदाचित त्यामागचं कारण असावं. हो, मी फक्त पाच फूट दोन इंच उंच आहे, कृश आहे, पण डोळ्यांना खुपण्याइतका काही कृश नाही. रंगाने मी काळा आहे, पण पुन्हा माझ्याकडे बघू नये इतका काही काळाही नाही. चाळीस वर्षानंतर मस्तकावरचे केस हळू हळू गळू लागले आहेत - मात्र अजून मला टक्कल पडलेलं नाही - टक्कल पडलेल्यांकडे देखील कुणी कुणी पाहतंच की! त्यातून माझा चेहरा फार कुरूप नाही की फार सुंदर नाही. माझं नाक फेंदारलेलं नाही की धारदार नाही, डोळे मोठाले नसले तरी अगदीच मिचमिचेदेखील नाहीत. म्हणूनच मी जो या गर्दीत उभा आहे - दोन्ही बाजूंना उंच उंच लोक आहेत - या गर्दीत कुणी मला पाहिलं आहे? पाहिलं तरी नसेल किंवा पाहूनही लक्ष दिलं नसेल. मला ठाऊक आहे ते!

माझ्या लग्नानंतर एक गमतीदार प्रसंग घडला होता. 'बहूभात'[१] च्या एकदोन दिवसांनंतर मी बायकोबरोबर काही सामान खरेदी करायला बाजारात गेलो होतो. काही दिवसांनी सासरी जाणार होतो म्हणून काही कपडे वगैरे घ्यायचे होते. रस्त्यावर आल्यावर मी बायकोला विचारलं, ''न्यू मार्केट चलायचं?'' माझी ऐपत बघता खरेदीसाठी न्यू मार्केटला जाण्यात काही अर्थ नव्हता. आम्ही आमच्या घराजवळच्या बाजारातूनच स्वस्तपैकी कपडे विकत घेत असू, तरी मी जे बायकोला विचारलं त्यामागचं एक कारण हे होतं, की माझी बायको खेड्यातली होती. तिने न्यू मार्केट कधी पाहिलं नव्हतं. आणि दुसरं कारण हे होतं, की माझ्या सासरची मंडळी आमच्या मानाने जास्त श्रीमंत होती. माझ्या नव्या नवरीने खूष व्हावं आणि सासरच्या मंडळीनाही जरा वाटावं की आम्ही न्यू मार्केटमधून कपडे खरेदी केलेत. म्हणून मी न्यू मार्केटचा विषय काढला होता. पण न्यू मार्केटचा प्रस्ताव ही माझी एक मोठी चूक होती. कारण मी जर तिथे गेलो नसतो तर कदाचित हा प्रसंग घडला नसता. त्याचं असं झालं की न्यू मार्केटमध्ये शिरल्यावर तिथली चमचमणारी दुकानं बघून माझ्या बायकोचे डोळे दिपून गेले. कुठल्याही दुकानासमोर थांबून ती टक लावून शोकेसकडे बघू लागायची आणि मग सावकाश पाय ओढीत पुढे चालू लागायची. माझ्याकडे बघायचं सुद्धा ती विसरून गेली. नुकतंच लग्न झालेलं होतं. म्हणून बायकोवर इम्प्रेशन मारण्याकरता मी मोठे ऐटीत तिला एकेक वस्तू दाखवत होतो. पण कुठल्याही विशिष्ट वस्तूकडे लक्ष न देताच ती एकेक करून सर्व वस्तू पहात होती. माझी ऐट जरा जास्त वाढताच मी मुद्दामच मागे रेंगाळलो. पण माझ्याकडे लक्ष न देताच माझी बायको तशीच भारावल्यागत पुढे चालत राहिली. हे बघून मी एका जागी थांबलो. पण माझी बायको मात्र चालतच राहिली. तिचे उत्सुक डोळे दुकानांवर खिळले होते आणि गार्ड ऑफ ऑनर देताना शिपाई चालतात तशी ती चालली होती. मी दूर उभा राहून बघत होतो. झळाळणाऱ्या प्रकाशात, लोकांची गर्दी बाजूला सारीत माझी बायको एकटी पुढे चालली होती. मी तिच्याबरोबर चाललो आहे असे समजून मधून मधून बोलतही होती. पण मी खरंच बरोबर आहे की नाही ते काही तिने बघितलं नाही. अशीच खूप पुढे गेल्यावर तिने काहीतरी पाहिलं आणि मोठ्या उत्साहाने मला ते दाखवण्यासाठी बाजूला बघताच मी काही दिसलो नाही. तेव्हा ती थबकली आणि घाबरून चारी बाजूना नजर टाकीत मला शोधू लागली. त्यावेळी तिची थट्टा करायचा मोह काही मला आवरला नाही. न्यू मार्केटमध्ये

---

१ बहूभात - हिन्दू विवाहातील एक विशेष विधी. त्यात विवाहानंतर वराच्या घरची मंडळी सुनेच्या हातचा स्वैपाक जेवतात आणि तिला आपल्या कुटुंबाचेच एक अंग बनवितात.

चक्रव्यूहासारख्या ज्या अनेक गल्ल्या आहेत त्यापैकी माझ्यासमोरच जी गल्ली होती तिच्यात मी शिरलो. आता या गावकरी मुलीला शोधू देत मला! का तिचं माझ्याकडे लक्ष नव्हतं? आता छान मजा येईल. मी मनातल्या मनात हसलो आणि डोकावून बघितलं. माझी बायको रडवेली होऊन चहूकडे नजर टाकीत घाईने परत निघाली होती. तिला रडकुंडीला आलेलं बघून मला कसंसंच वाटलं. तरी पण आणखी थोडी गंमत करावी आणि मगच हा लपंडाव संपवावा असा विचार करून मी गल्लीत आणखी आतवर शिरलो. ती बिचारी वाट चुकलेल्या प्रवाशासारखी कितीदा तरी इकडून तिकडे आली गेली, इकडच्या तिकडच्या गल्लीत मला शोधत राहिली. मी तिच्यावर लक्ष ठेवून होतो. काही वेळाने मला असं वाटलं की मी जर सापडलो नाही तर ती चक्क रडायला लागेल, इतका तिचा चेहरा पडला होता. डोळे डबडबले होते आणि लाल झाले होते. म्हणून ती ज्या गल्लीतून चालली होती त्याच गल्लीत मी विरुद्ध दिशेने आत शिरलो. आणि हसत तिथे उभा राहिलो. ती समोरून चालत आली. आम्ही समोरासमोरही आलो. फार काय, ती माझ्यापासून एक फूट अंतरावरून निघून गेली तरी पण तिने मला ओळखलं नाही. मी थक्क झालो. तिने मला पाहिलं नाही की काय? मी पुन्हा दुसऱ्या रस्त्याने जाऊन दुसऱ्या एका गल्लीतल्या काचसामानाच्या दुकानासमोर भरपूर उजेडात जाऊन उभा राहिलो. ठीक त्याचवेळी ती समोरून चालत आली, तिने चारी बाजूच्या लोकांकडे नजर टाकली, तिचे डोळे माझ्या डोळ्यांना भिडले. पण ती पुन्हा मला सोडून पुढे निघून गेली. इतकंच नव्हे, पुढे जाऊन तिने एकदाही मागे वळून पाहिलं नाही. अशातऱ्हेने आमची कितीदा तरी भेट झाली - कधी पुस्तकांच्या दुकानासमोर, कधी फळांच्या दुकानासमोर, नाहीतर कधी बाहुल्यांच्या दुकानांच्या रांगेसमोर. पण एकदाही तिने मला ओळखलं नाही. भान हरवल्यासारखी मला शोधता शोधता ती मलाच सोडून पुढे जायची. माझ्या मनात आलं ही गावकरी पोरगी मोठी बिलंदर दिसते. मी मुद्दाम लपलोय हे जाणून आता ती मला मुद्दामच ओळख दाखवीत नाहीये. पण तिच्या चेहऱ्यावरची व्याकुळता वाढत चालली होती म्हणून तेही खरं वाटत नव्हतं. अखेर एका घड्याळाच्या दुकानासमोर मी तिची वाट अडवून उभा राहिलो. बराच वेळ माझ्याकडे पाहिल्यावर तिने एक दीर्घ उसासा सोडला आणि मग थरथरत हसत म्हणाली, ''तुम्ही? तुम्ही? कुठे होता इतका वेळ? मी केव्हाची शोधतेय तुम्हाला.'' आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यावेळी मला तिचं बोलणं खरं वाटलं. घरी परतताना मी तिला सांगितलं की तिच्याशी लपंडाव खेळताना मी तिला कितीदा तरी मला धरायची संधी दिली होती, मी तिच्या समोरच उभा होतो. माझ्या बोलण्यावर अगोदर तिचा विश्वासच बसला नाही. पण मी वारंवार सांगू लागलो तेव्हा ती थक्क होऊन म्हणाली, ''खरंच? असं असेल तर पुन्हा कधी लपू नका. नाहीतर मोठ्या अडचणीत सापडू.''

अहो थांबा, थांबा, मला इथंच उतरायचं आहे --. जरा बघून -- जरा बघून बाबा, माझा चष्मा --- हे बघा. कुणीच माझं बोलणं ऐकलं नाही. मी खाली उतरायच्या अगोदरच कंडक्टरने बस चालू करायची बेल वाजवली. दार अडवून उभा असलेला तो लठ्ठ काळा माणूस जरासुद्धा बाजूला सरकला नाही. हवाई शर्ट घातलेल्या त्या पोराने तो कोपर मारून माझा चष्मा वाकडा करून टाकला. म्हणूनच तर मी सांगत होतो की कुणीच माझ्याकडे लक्ष देत नाही, ट्राममध्ये नाही की बसमध्ये नाही की बाजारात नाही.

आजचा दिवस छान आहे. वाऱ्याची हळुवार फुंकर आणि कोवळ्या उन्हाची गोड ऊब लाडाने देणारा दिवस. शरद ऋतू असल्याने उकडत नाहीये. यावेळी रस्त्यावरून चालायला कसं छान वाटतंय. ते काय समोरच तर क्रॉसिंग आहे आणि त्यानंतर माझं ऑफिस. आता घ्या, क्रॉसिंगपाशी पोचून रस्ता ओलांडण्यासाठी मी पाय उचलला तोच ट्रॅफिक पोलिसाने हात खाली केला. आता माझी वाट अडवून गाड्यावर गाड्या धावत सुटल्या आहेत. काय रे बाबा ट्रॅफिक पोलिसा, मी रस्ता ओलांडतो आहे हे तुला दिसलं नाही का? आणखी जरा वेळ हात वरच उचललेला ठेवला असता तर काय बिघडलं असतं?

ज्या लिफ्टमधून मी दुसऱ्या मजल्यावर चाललोय ती बहुतेक शंभर वर्षे जुनी असावी. हिच्या चारी बाजूंना लोखंडाची काळी जाळी आहे, एखाद्या पिंजऱ्यासारखीच! मधून मधून ती थरथरू लागते आणि मग धापा टाकत सावकाश वर चढू लागते. गेली तेरा वर्षं मी या लिफ्टने वर जातोय. या तेरा वर्षांत आठवड्यातून सहा दिवस मला लिफ्टमन रामस्वरूप वर घेऊन जातो. हं, काय म्हणताय रामस्वरूप दादा? तुम्ही तर मला लहानपणापासून बघताय. - मी सव्वीस सत्तावीस वर्षांचा होतो, माझ्या चेहऱ्यावर म्हातारपणाची छाप नव्हती तेव्हापासून बघताय - माझं नाव काय आहे सांगा बघू? खरंच विचारलं तर रामस्वरूप लगेच वा, वा करून हसायला लागेल आणि म्हणेल, 'ही काय चेष्टा करताय गरिबाची? अहो, तुम्ही अरविंदबाबू नाही का?' साफ चूक. मी कधीही अरविंद नव्हतो. मी तर नेहमीच - बालपणापासूनच अरिन्दम बसु आहे.

मी बँकेत नोकरी करतो. दुसऱ्या मजल्यावर माझं ऑफिस आहे. सुरुवातीला मी वेगवेगळ्या खात्यांमध्ये होतो. गेल्या दहा वर्षांपासून कॅश विभागात बसतो. मी पटापट नोटा मोजू शकतो, हिशोबातही चोख आहे. म्हणूनच मला कॅशमधून काढून दुसरीकडे कुठे पाठवीत नाहीत. कधी पाठवलंच तर पुन्हा बोलावून घेतात. गेल्या दहा वर्षांपासून मी मोठ्या हुशारीने कॅशचं काम सांभाळतोय. कधी पेमेंटचं तर कधी रिसीटचं. पण बहुतेक पेमेंटमध्येच. कारण तिथे सर्वात जास्त हुशार माणसाची गरज असते. लोखंडी जाळीच्या पिंजऱ्यात मी बसतो. बरेच खण असलेला एक ड्रॉव्हर माझ्या छातीसमोर आहे. त्यातल्या कोणत्या खणात किती रुपयांच्या नोटा आहेत,

कोणत्या खणात कोणती चिल्लर आहे हे मी डोळे मिटूनही नेमकं सांगू शकतो. पेमेंट करताना मी ड्रॉव्हर उघडून मोजून पैसे बाहेर काढतो, मग ड्रॉव्हर बंद करतो, मग पुन्हा दुसऱ्यांदा मोजतो - मग --- त्यानंतर रुपये देऊन पुढच्या पेमेंटसाठी हात पुढे करतो, टोकन घेऊन पुन्हा ड्रॉव्हर उघडतो, रुपये काढून मोजायला सुरुवात करतो -- बस्. हेच सतत चालू असतं. जे लोक समोरच्या जाळीतून माझ्याकडे पहातात त्यांना माझं हे काम अतिशय कंटाळवाणं, अगदी नीरस वाटतं! जाळीतून ते माझ्याकडे पाहतात खरं. पण लक्षात ठेवीत नाहीत. रामबाबू आमचे खूप जुने गिऱ्हाईक आहेत - मोठा कारखाना आहे. एजन्टदेखील त्यांचे स्वागत करतात. अतिशय खुसपट काढणारे आहेत. माणूस न पाठवता बहुधा स्वतःच येतात आणि चेकचे पैसे घेऊन जातात. कितीदा तरी मी त्यांना पेमेंट केलं आहे आणि त्यांनीदेखील जाळीपलीकडून प्रसन्न मुद्रेने माझे आभार मानले आहेत. एकदा माझ्या थोरल्या मेहुण्याने कलकत्त्याला येऊन खूप पैसे उडवले होते. त्याच सुमारास तो मला पार्क स्ट्रीटवरच्या एका मोठ्या रेस्टॉरंटमध्ये घेऊन गेला होता. तिथे जाऊन बघतो तर रामबाबू! एकटेच बसले होते. हातात शुभ्र जिन, विलक्षण स्वप्नाळू डोळे. खरं सांगतो, बढतीच्या गोष्टी माझ्या चटकन् फारशा लक्षात येत नाहीत. निदान त्यासाठी रामबाबूंना भेटावं असा विचारसुद्धा माझ्या मनाला कधी शिवला नाही. जुनं ओळखीचं माणूस म्हणून मी भेटायला पुढे झालो होतो. रामबाबू भुवया उंचावून म्हणाले, ''तुम्हाला कुठंतरी पाहिलंय. कुठं बरं? आठवतच नाही.'' त्यांचं हे बोलणं ऐकून माझ्या मेहुण्यांसमोर मला मोठी लाज वाटली. या माणसानं जर खरंच मला ओळखलं नाही, हा माणूस जर इतका गर्विष्ठ असेल तर माझा फारच अपमान होईल. म्हणून मी निरुत्साही स्वरात माझ्या बँकेचं नाव आणि मी तिथे कॅश खात्यात काम करीत असल्याचं सांगितलं --- ऐकताच नितळ जिनसारखा त्यांचा चेहरा चमकला. आनंदाने हसून म्हणाले, ''ओहो, ओळखलं. सारखं सारखं त्या जाळीआड तुम्हाला बघून त्याचीच सवय झाली म्हणून अचानक या जागी बघून --- मला काय म्हणायचं आहे ते आलं ना लक्षात? त्याचं असं आहे - पर्स्पेक्टिव्ह-माणसापाशी त्याखेरीज दुसरं काय असतं? कशावरून त्याला ओळखायचं? तुमचं व्यक्तित्व त्या जाळीशी नि पिंजऱ्याशी जोडलेलं आहे, तसंच माझं या सूटबूट, टाय आणि टकलाशी सांधलेलं आहे. आपल्याला जर या गोष्टींपासून वेगळं केलं तर तुम्ही आणि मी - आपला खरा काही परिचयच नाही असं तुम्हाला दिसून येईल. थोड्या वेळापूर्वी मी पर्स्पेक्टिव्हचाच विचार करीत होतो. लहानपणी आम्ही रेल्वे कॉलनीत रहात होतो. माझ्या बाबांची टेलीक्लार्कची नोकरी होती. कटिहरच्या आमच्या क्वार्टरमध्ये शेजारची एक मुलगी खूप वेळा यायची. तिची आई सावत्र होती. त्यामुळे घरात तिला आईची माया मिळत नसे. ती नेहमी माझ्या आईपाशी अगदी स्वैपाकघरात बसायची. फाटक्या फ्रॉकने गुडघे झाकून आखडून बसायची. कधी ती आईला पोळ्या

लाटून द्यायची तर कधी माझ्या रडक्या धाकट्या बहिणीला कडेवर घेऊन खेळवायची, झोपवायची. आई थट्टेनं मला म्हणायची, 'हिच्याशी तुझं लग्न लावीन." ते ऐकून मी त्या मुलीकडे लक्षपूर्वक पहायचा आणि मला एक वेगळीच धुंदी चढायची. किती करुण, कृश, कोमजलेला चेहरा आणि तरी किती सुंदर! पण ती जणू जगात फार दिवस जगण्यासाठी आलीच नव्हती."

इतकं सांगून रामबाबूंनी एक दीर्घ उसासा सोडला आणि मी उत्सुकतेनं विचारलं, "पुढे काय झालं? तिचं निधन झालं का?"

रामबाबूनी मान हलवली, "छे, छे. तसे व्हायचं काय कारण? पुढे मोठा झाल्यावर मी तिच्याशी लग्न केलं. ती अजून माझी बायकोच आहे. इतकी लठ्ठ झाली आहे! तापट आणि हेकेखोरही! माझ्यावरही खूप वर्चस्व गाजवते. तिला फ्रिज उघडताना, दागिने हाताळताना, गड्यांवर रागावताना किंवा शोफरला गाडी काढायला सांगताना जेव्हा मी ऐकतो तेव्हा हीच ती मुलगी यावर विश्वासच बसत नाही. ती आजारी असताना एकदा आई तिला दोन संत्री देऊन आली होती. तेव्हा तिला किती आनंद झाला होता. आज बघा-तिच्याशी खूप जोरात भांडून मी बाहेर पडलो आहे. ते प्रेम कुठं नाहीसं झालं याचाच विचार करीत आहे. इथं बसल्या बसल्या ते जुने दिवस आठवले. तिचं ते चुलीपाशी बसणं, फाटका फ्रॉक गुडघ्यापर्यंत घट्ट ओढून ताणून घेणं आठवलं. मला माझ्या आईचा चेहरा आठवला. किती मायेनं ती त्या गरीब बापड्या पोरीकडे बघायची. ते आठवताच माझा राग मावळला. पुन्हा प्रेमाचं भरतं आलं. आता घरी जाऊन तिची मनधरणी करीन, तिचा राग घालवीन." इतकं बोलून रामबाबूंनी जिनचा एक घुटका घेतला आणि हसत म्हणाले, "ती जी जाळी आहे ना, जिच्या आतून मी तुम्हाला बघतो तीच खरी आहे – ती जाळी --"

हा जो तेवीसचोवीस वर्षांचा मुलगा पेमेंट घेण्यासाठी उभा आहे ना, विमनस्कपणे हातातल्या टोकनने लाकडी काउंटवर ठक ठक वाजवीत बसला आहे, तो मला ओळखतो. त्याचे वडील जुन्या गाड्यांच्या खरेदी – विक्रीचा धंदा करतात. पूर्वी त्याचे वडील बँकेत यायचे, हल्ली हा येतो. कधी अचानक नजरानजर झाली तर मी हसून चौकशी करतो, "काय, बाबा बरे आहेत ना?" तो आनंदाने मान हलवून उत्तरतो, "हो." पण मला जर इथून अचानक एक दिवस बाजूला करून माझ्या जागी दुसऱ्या एखाद्या किरकोळ माणसाला आणून बसवलं तर त्याला फारसा फरक जाणवेल असं मला वाटत नाही. तो तसाच विमनस्कपणे लाकडी काउंटरवर पितळेचं टोकन वाजवीत राहील, विमनस्कपणे बघत राहील, नजरानजर झाल्यास त्या माणसाकडे पाहून ओळख असल्यासारखं थोडंसं स्मित करील. चूक लक्षात यायला त्याला थोडा वेळ लागेल. कारण तो माझ्याकडे कधी पहातच नसतो. यावेळी तो कदाचित आपल्या नव्या प्रेयसीचा विचार करीत असावा, नाहीतर

लवकरच स्कूटर घ्यायचा बेत आखत असावा. मान वळवून त्याने एकदा रिसेप्शनवरल्या मुलीकडे पाहिलं. मग घड्याळाकडे नजर टाकली. एकदा टोकनचा नंबर पाहिला, जाळीतून आत पाहिलं. माझे हात रटाळपणे नोटा मोजत होते. क्षणभर माझ्याकडे बघून त्याने नजर वळवली. पण माझी खात्री आहे की त्याने मला बघितलं नाही. दोन वाजायला पंधरा मिनिटं कमी आहेत. दोन वाजले की मी कॅश बंद करून लंचसाठी खाली जाईन त्यावेळी समजा त्याने मला फुटपाथवर चहा पिताना बघितलं तर तो काय मला ओळखील होय?

काय बाबा, केळी कशी दिली? चाळीस पैशांना दोन? इतकी महाग? हो, हो, मर्तवानची आहेत ठाऊक आहे, मला काय मर्तवानची केळी ओळखता येत नाहीत? हा सुंदर पिवळा रंग, गुळगुळीत साल, मोठा आकार-मर्तवान बघताच लगेच ओळखू येतो. तर बाबा आज नशिबात केळी दिसत नाहीत. कालच तर खाल्लं होतं. लागोपाठ दोन दिवस केळी खाऊन कसं भागेल? बरं – जाऊ दे. एक दे बघू. दोन नको. एक पुरे. हे घे बाबा वीस पैसे. वा, काय मस्त आहे केळं! केळं खाऊन झाल्यावर मी बराच वेळ साल मुठीत धरून ठेवली. दहापंधरा मिनिटं जरा इकडे तिकडे हिंडलो. केळ्याची साल स्मृतीसारखी हातातच होती. माझ्या चहूबाजूंचे लोक शांतपणे इकडे तिकडे जात येत होते. त्यांचे चेहरे आणि डोळे एकदम निर्विकार होते. ही माणसं कधी भांडणतंटा करीत नाहीत, यांना देशासाठी वा राष्ट्रासाठी कधी प्राण द्यावे लागत नाहीत. फार काय, या सर्वांनी मिळून एखादं महत्कार्यही पार पाडलेलं नाही. राष्ट्र हळू हळू मरत आहे. पण ही मंडळी आपल्यातच दंग होऊन वावरत आहेत - एकमेकांविषयी यांना कसलीही ओढ नाही, अगदी निस्पृह आहेत सर्वजण! यांना काळाचे भान नाही. यांच्या दृश्टीने एकोणीस आणि एकोणसत्तर या फक्त संख्या आहेत. दोन हजार वर्षांच्या इतिहासांशी यांना काही कर्तव्य नाही. 'टेलीपथी' किंवा 'क्रीक रो' या शब्दांसारखाच 'भारतवर्ष' हा देखील यांच्या लेखी एक शब्द फक्त आहे.

कृपा करून मला पहा. हा आहे मी-अरिन्दम बसु - अरिन्दम बसु - हा उंच नाही, कृश नाही, गोरा नाही - फक्त एक माणूस आहे. मी 'टेलीपथी' नाही की 'क्रीक रो' नाही की 'भारतवर्ष' नाही - या शब्दांबरोबर अरिन्दम बसु - या शब्दात थोडा फरक आहे खरा. पण तो कधी तुमच्या लक्षात येईल का?

जाऊ दे या सर्व गोष्टी. कधी कधी मलाच शंका वाटू लागते. खरंच का मी आहे? की मी नाहीच? बँकेच्या या जाळीत हात पुढे करून पैसे मोजून लोक घेऊन जातात. कुणी कुणी आभार मानतात. पण माणूस बदलला तरी ते असेच हात पुढे करून पैसे मोजून घेऊन जातील आणि कुणी कुणी आभारही मानतील. जाळीपलीकडे काही मोठा बदल झाल्याचं त्यांच्या लक्षातच येणार नाही. तो न्यू मार्केटमधला प्रसंगच घ्या - माझी बायको मला शोधत हिंडतेय - मला समोर बघूनदेखील, नजरानजर

होऊनसुद्धा मला सोडून ती निघून जाते - किती आश्चर्याची गोष्ट आहे, हा माणूस गेला कुठे?

केळ्याची ती साल मी नीट काळजीपूर्वक रस्त्याच्या मध्ये ठेवतो. उदासीन सभ्य गृहस्थांनो, तुमच्यापैकी कुणी याच्यावर पाय ठेवला, तर घसरता घसरता बचकून तो आपलं चैतन्य पुन्हा मिळवील. तुम्हाला जर जास्त मार लागला नाही, तुम्ही खाली पडता पडता सावरलात तर आपला खूप मोठा फायदा झाल्याचं तुमच्या लक्षात येईल. तुम्ही नीट चारी बाजूला पहाल - आपण कोणत्या रस्त्याने कुणीकडे चाललो आहोत ते तुम्हाला आठवेल - मोठा अपघात झाला असता तर आपले हातपाय मोडले असते नाहीतर डोकं फुटलं असतं हा विचार मनात येऊन भोवतालच्या संकटमय वातावरणाप्रती तुम्ही जास्त सावध व्हाल - तुमच्या अंतरंगातील सुषुप्त 'मी' जागृत होऊन 'जिवंत राहणं किती चांगलं आहे' याचा कदाचित विचार करू लागेल - त्यावेळी कदाचित तुम्ही मानवाच्या बाबतीत अधिक जागरूक व्हाल - आणि सांगता येत नाही, पण तुम्हाला कदाचित आठवेल की आज एकोणीसशे एकूणसत्तर सालाची सोळा जुलै तारीख आहे, तुम्हाला त्याचा पार विसर पडलेला असतो - आणि तुम्हाला आठवेल की या वर्षी आपण चाळीशी ओलांडली आहे - महाशय, त्यावेळी तुम्हाला उमजेल की या युद्ध व क्रांतिहीन भारतवर्षातील एका निस्तेज दुपारी रस्त्यावर केळ्याची साल टाकून मी तुमच्यावर फार काही अपकार केलेले नाहीत.

यावेळी तुम्ही चंद्राचा विचार करता आहात का? आणि त्या तीन धाडसी माणसांची गोष्ट? नका विचार करू महाशय, त्या सर्व गोष्टींचा विचार नका करू. त्या सर्व गोष्टींचा विचार करून आपला काय फायदा? त्याने माणसं उगाचच विलक्षण उत्तेजित होतात आणि मग कधी कधी दाट विषण्णता येते. त्यांच्यापाशी खूप चांगली यंत्रं आहेत. ते लोक व्यवस्थितपणे चंद्रावर पोचतील आणि सहीसलामत परतही येतील. पण ते सर्व मनात आणून तुम्ही उगाच उत्तेजित आणि विमनस्क होऊ नका. रस्ता पाहून चाला. राजभवनाच्या समोर वळणावर वळताच किती सुंदर लांब रुंद मैदान आहे, मोकळं आभाळ आहे, पहा ना. आजूबाजूला जी मंडळी जा – ये करत आहेत त्यांनाही पहा. शक्य असेल तितके इतरांचे चेहरे ओळखून घ्या - म्हणजे त्यांची पुन्हा कुठे गाठ पडली तर त्यांना ओळखता येईल. या रम्य सायंकाळी मैदानाच्या किनाऱ्याने मी तुमच्याबरोबरच चालत आहे- मला पहा. पहा ना - नुकताच मी ऑफिसमधून बाहेर पडलो आहे. आज थोडं लवकर निघालो आहे. कारण मॅच बघायला जायचं आहे. तुम्हीदेखील तिकडेच निघालात वाटतं - खरं ना?

पहा तर काय मूर्ख मुलगा आहे! ऑफ साइडला उभा राहून इतकी चांगली संधी वाया घालवली. आता फक्त दहा मिनिटं उरली आहेत, अजून गोल झालेला नाही. आणि तो मुलगा-अरे देवा, त्याला ते लाल सोनेरी जाकीट कुणी घातलं? मैदानातून

बाहेर हाकला त्याला अगोदर. मित्रांनो, तुमच्या शेलक्या शिव्यांनी त्याचं भूत पळवून लावा बघू. काय करू? माझ्या जिभेवर वाईट शब्द येत नाहीत. पण बघा, रागाने माझे हातपाय थरथरत आहेत. आज सकाळपासूनच चंद्र आणि त्या तीन धाडसी जणांचा विचार करून करून माझ्या शिरा ताणल्या गेल्या आहेत. भरीला ती रद्दी टीम आमच्या टीमला एका पॉईंटने जिंकत आहे. एक पॉईन्ट! किती धोक्याची गोष्ट आहे. आता फक्त आठ-नऊ मिनिटंच उरली आहेत. तुम्हाला काय वाटतं दादा, गोल होईल? कसा होईल? रद्दी टीमचे सगळे खेळाडू मागे येऊन गोल समोर भिंतीसारखे उभे राहिलेत. आणि हे कसे खेळताहेत कुणास ठाऊक? यांना गोल करावंसं वाटत नाही वाटतं. हा जो मुलगा आहे ना - ऑफ साइडला उभा राहून त्याने आजची सुवर्णसंधी हातची घालवली. त्याच्यापाशी जाऊन त्याला सांगावंसं मला वाटतंय की, "बघ , मला बघ, मी आहे अरिन्दम बसु, या टीमला मी लहानपणापासून पाठिंबा देत आलोय. या टीमचा विजय झाला तर देवाला प्रसाद वाहातो आणि टीम हारली तर आत्मघातकी विचार माझ्या मनात येऊ लागतात". पण दादा, या सर्व गोष्टी तुम्हाला काय म्हणा कळणार? तुम्हाला थोडंच ठाऊक आहे की मी- या गर्दीमधली एक विशिष्ट व्यक्ती - किती दुःखाने भरल्या डोळ्यांनी घड्याळाकडे पहात आहे. त्याचं सोयरसुतक कुणालाच नाही हे खरं, मी हसलो काय, नि रडलो काय, मला कोण बघतंय?

नाही, शेवटी गोल झाला नाहीच. रेफरीने शिट्टी वाजवली. खेळ संपला. आता कृपा करून एकदा माझ्याकडे पहा. मी किती व्यथित झालो आहे. माझे खांदेच मोडले जणू! आपल्या टीमवर माझं किती प्रेम आहे ते पहा. पण टीमला त्यामुळे काहीच फरक पडत नाही. ते मला ओळखत सुद्धा नाहीत. तरीदेखील प्रत्येक यश, अपयशाच्या वेळी मी किती हसलो आहे - ओरडलो आहे - रडलो आहे - अनोळखी लोकांच्या पाठीवर थाप मारली आहे. उगाचच त्याने कुणालाच काही फायदा - तोटा झाला नाही. पहा ना, आज सकाळपासून मी चंद्र आणि तीन जणांविषयी जो विचार करतोय - त्या पायी धड जेवलोदेखील नाही. आता यात कुणाचं काय जाणार आहे?

कृपा करून एकदा माझ्याकडे पहा. छे, छे, मला ठाऊक आहे, तुम्ही लीग टेबलमधील आपल्या टीमच्या स्थितीचा विचार करता आहात. त्यातून तुम्हाला चंद्र व त्या तीन जणांचा देखील विचार करावा लागत आहे. जगात काय काय चाललंय देव जाणे! माणूस साडेएकोणतीस फुटांची लाँग जम्प मारत आहे, प्रेसिडेंटला गोळी घातली जात आहे, निवडणुकीत आपली पार्टी पराभूत होत आहे, क्रान्ती व्हायला खूप उशीर होत आहे. म्हणूनच मी, अरिन्दम बसु, बँकेतला कॅश क्लार्क, तुमच्या इतक्या जवळ असूनही तुम्हाला दिसत नाही आहे.

हे पहा. दुसऱ्या मजल्यावरच्या कठड्यावरून माझा चार वर्षांचा धाकटा मुलगा, हापू, वाकून बघतोय. भारी खोडकर आहे. सकाळपासून धोशा लावलाय की,

'रथाच्या जत्रेला जायचंय बाबा, तुम्ही लवकर परत या.' माझ्यासाठीच तो तिथं वाट पहात थांबला आहे. विस्कटलेल्या केसांखाली त्याचे डोळे लुकलुकताहेत, मला इतक्या लांबूनसुद्धा दिसत आहे.

मी जिन्यावर पाय ठेवायचा अवकाश तो धाडधाड जिना उतरून खाली आला. त्याची आई वरून ओरडते आहे, 'हापू कुठं गेला रे? ए हापू-'' हापू आनंदाने मला चिकटला, ''कित्ती उशीर केला बाबा. जायचं नाही?''

हो, बाहेरून परत आल्यावर याच माझ्या कुटुंबातील लोकांत मी समाधानाचा श्वास घेतो. मी मुलाला कडेवर घेतलं. त्याच्या अंगाला घामाचा गोड वास येतोय. त्याच्या मऊ अंगाला हिवाळ्यातल्या उन्हासारखी थोडीशी ऊब आहे. तोंड लपवल्यावर वाटतं की मी जणू एखादं अदृश्य स्नान करीत आहे. म्हणालो, ''जाऊ या बाळ. पण अगोदर खूप भूक लागली आहे. जरा दम घेऊन जेवून घेतो.''

मी जितका वेळ विश्रांती घेत होतो तितका वेळ हापू मला चिकटून बसला. घाईत म्हणाला, ''लवकर करा ना बाबा.'' आईने त्याला धमकावलं तेव्हा मी प्रेमळपणे म्हणालो, ''का उगाच रागावतेस त्याला? पोरच आहे.'' खरं म्हणजे तो असा अंगाला चिकटून बसलेला मला खूप आवडतं.

अतिशय खोडकर आहे. जत्रेत पाय ठेवताच हात सोडून पळायला बघत होता. म्हणालो, ''हापू, असं करायचं नाही. माझा हात धरून ठेव. नीट हात धरून ठेवलास तरच तुला जत्रा बघायला मिळेल.'' तो आपला इकडे तिकडे बघतो आणि मग मोठ्यांदा किंचाळून विचारतो, ''ते काय आहे बाबा? आणि ते? त्या तिकडे?'' मी त्याला उत्तर देतो, ''तो पाळणा आहे. तो सर्कसचा तंबू आहे. आणि ही मृत्यूची विहीर आहे.''

हातात एक अख्खा पापड घेऊन हापू पाळण्यात बसलाय, तो बघा तो दिसतोय. आकाशापाशी वर खळाळून हसत हात हलवतो आहे - सूं करून खाली येतो आहे, मग पुन्हा वर जातो आहे - सारखा माझ्याकडे पहात हसतोय. बघून मलाही आनंद होतोय.

मृत्यूच्या विहिरीच्या वर प्लॅटफॉर्मवर उभं राहून त्याला दाखवलं - भिंतीच्या आधारे मोटार सायकल कशी गरगर फिरते, मोठ्यांदा आवाज करीत वर खाली जाते येते. मला चिकटून तो बघत राहिला.

त्यानंतर दोघांनी अर्धा तास सर्कस पाहिली. दोन डोक्यांचा माणूस, गाणारी बाहुली, आठ फूट उंचीचा माणूस. हापूच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. डोळे विस्फारले होते.

बाहेर येऊन मी जरा त्याला मोकळा सोडला. तो माझ्याबरोबर चालू लागला. मी धरलेला त्याचा हात घामेजला होता. म्हणून मी त्याचा हात सोडून दिला.

माझा हात सोडून तो पुढे पुढे चालला आहे. दुकानात मांडून ठेवलेल्या शिट्ट्या

तो वाकून बघतो. मग पुढे जाऊन दुसऱ्या एका दुकानासमोर उभा रहातो. तिथे विमानांची शर्यत लागलेली आहे. त्यानंतर तो हळूहळू पुढे चालू लागतो. एअरगन आणि रंगीबेरंगी चेंडू बघता बघता सावकाश पाऊल टाकीत आहे --- हळू हळू तो गर्दीत शिरत आहे -- मी त्या वेळी आपल्या टीमचाच विचार करीत होतो - आज उगाचच एक पॉईंट वाया गेला - हुं! म्हणे चंद्राकडे निघालेत तिघे जण - पोचतील का ते तिथं?

अचानक लक्षात आलं, हापू दिसत नाही कुठं? क्षणापूर्वीच तर गर्दीत मी त्याचा निळ्या रंगाचा शर्ट बघितला होता. बस्. त्याचवेळी तो दिसेनासा झाला. हापू, हापू, हाका मारीत मी धावू लागलो.

तुमच्यापैकी कुणी निळा शर्ट घातलेल्या चार वर्षांच्या एका मुलाला बघितलं आहे? हापू नाव आहे त्याचं. अतिशय खोडकर आहे. नाही पाहिलंत? विखुरलेले केस, लुकलुकणारे खट्याळ डोळे --- छे, छे, त्या खेळण्यांच्या दुकानासमोर उभा आहे तो नव्हे. दिसायला काहीसा तसाच आहे खरं! नाही, त्याच्या चेहऱ्यावरची काही विशिष्ट खूण मला आठवत नाही - अगदी सामान्य चेहरा आहे, जवळ जवळ माझ्यासारखाच! इतकंच फक्त मी सांगू शकतो की तो चार वर्षांचा आहे आणि त्याने निळा शर्ट घातलेला आहे. हो, तसले निळे शर्ट बऱ्याच मुलांनी घातलेले आहेत. आणि चार वर्षांची मुलंही इथे बरीच आहेत. नाही, ते नेमकं मला सांगता यायचं नाही - या हजारो मुलामुलींमध्ये नेमका कोणता - नेमका कोणता आहे माझा हापू - आणि वाटतं की हापूलादेखील ते सांगता यायचं नाही - या इतक्या लोकांत - नेमका कोणता माणूस, कळलं ना, एकदा त्याची आईदेखील नीट ओळखू शकली नव्हती - तुम्हाला जर हापू कुठे दिसला तर त्याला सांगा की मी इथे आहे - मी, त्याचा बाबा - बस्स! जरा कृपा करून नीट माझ्याकडे पहा - काइंडली - विसरू नका-

# पार्श्वभूमी
## देवेश राय

दिवसभर वारा वेड्यासारखा वाहत होता. चैत्र महिन्यातल्यासारखा वारा दिवसभर वेड्यासारखा वाहत होता- अगदी दिवसभर. वर्ग घेऊन कॉमन रूममध्ये जाताना शाळेच्या उत्तरेकडील इमारतीकडे विनयचं लक्ष गेलं. कॉमनरूममधून वर्गात जाताना विनयला यूकॅलिप्टसच्या झाडाचा शेंडा दिसला होता. मात्र ज्या कबरीच्या दक्षिणपूर्वेला ते झाड आहे ती काही इथून दिसत नाही.

अशा हवेत शरीरातील पाण्याच्या भागाचे जास्त बाष्पीभवन झाल्याने कातडी कशी शुष्क आणि खरखरीत झाली आहे. तोंडावर हात फिरवला तर ताप आल्यासारखं वाटतंय. नाहीतर मग कपडे स्वच्छ असते, धुतलेले, आजच वापरायला काढलेले, दाढीसुद्धा आजच केलेली असती, तर कदाचित इतकं शुष्क वा खरखरीत वाटलं नसतं.

शाळेच्या उत्तरेकडील इमारतीच्या डोक्यावर आभाळाखेरीज दुसरं कधी काही नव्हतं. यूकॅलिप्टसच्या झाडाच्या शेंड्याहून अधिक उंच काही नव्हतं. तेच आभाळ आणि यूकॅलिप्टस जणू पूर्ण नसल्याने शून्यपणाचा आभास निर्माण करीत होते - गुरुदशाग्रस्त विद्यार्थ्यांच्या हजेरीमागे लपलेल्या शून्यपणासारखंच! जणू तिथे काहीतरी होतं पण ते आता नाही आहे - प्रवास संपत आल्याच्या वेळेसारखं. या शून्यपणाला विनयने स्वतःशी एकरूप करून टाकलं होतं. म्हणूनच या अवेळी वसंत वाऱ्याने त्याला जितकं आनंदित व्हायला हवं होतं तितकं न होता, तनमनात कधी काळी असलेल्या पण आता हरवलेल्या कुठल्याशा अनुभूतीचं दडपण त्याला जाणवत होतं. अशोक मुलांबरोबर क्रीडांगणावर क्रिकेट खेळत होता. अशोकची पँट आणि विकेटच्या मागे उभ्या रहायच्या त्याच्या शैलीनेच विनयचं लक्ष वेधून घेतलं होतं. काळ्या फळ्यावर पांढऱ्या खडूने विनयने एक चित्र रेखाटलं होतं. आभाळात झेप घेण्याच्या तयारीत झाडाच्या फांदीवर बसलेला एक पक्षी . विनय त्या चित्राकडे पहात होता. त्यानंतर दाराशी जाऊन वारा अंगावर घेत उभा राहिला. दाढी आज सकाळी केलेली असती आणि धोतरकुडता आजचेच धुतलेले असते तर या वसंतवाऱ्याचं त्याने मनापासून स्वागत केले असते. शरीरातील पाण्याचा अंश कमी झाल्याने गाल फुटले होते. चेहरा खरखरीत झाला होता. त्यावर वारा झेलत डोळे मिचकावून विनय जणू स्वतःला झिजवत होता. वसंतवारा दक्षिणेचा मलयवारा

असतो. हा उत्तर बंगाल आहे, दक्षिणेकडे समुद्र आहे, समुद्रकाठी कलकत्ता आहे. हा वारा कलकत्त्याहून येतोय हा विचार जणू विनयला झीज सोसण्यासाठी भाग पाडतोय. म्हणूनच त्याने पुढच्या वर्गात फळ्यावर एका रिकाम्या बशीवर एक कप रेखाटला होता.

संध्याकाळी वारा कमी झाला होता. कृष्णपक्षाचा पहिला दिवस. चंद्र उगवायला उशीर होता. मंद वाऱ्यात रात्रीची थंडी आणखी बोचणारी. रस्त्यावरची धूळ स्वच्छ.

चालताना एक खास विशिष्ट प्रकारचा, लंगडणारा आवाज निघावा अशी सँडल्सची दशा होती. लोकांच्या पायांच्या आवाजात तो आवाज ऐकू येत नसे, त्याकडे कुणाचे लक्षही जात नसे. पण सायंकाळच्या या निर्जनतेत विनयला तो आवाज स्पष्ट ऐकू येत होता. लंगडणारा आवाज ऐकू येत होता, गहन रात्री अचानक झोपमोड झाल्यावर घड्याळाचा आवाज ऐकू यावा तसा - एकसारखा, सतत, अर्थहीन. इतका एकसुरी, निश्चित आणि विरक्तिहीन की आता तो कधीच थांबणार नाही, सतत येतच राहील असं विनयला वाटलं. अचानक विनय थांबला. आवाजही थांबला. म्हणजे हा आवाज माझ्याच पावलांचा तर! मीच चालत असल्याने माझाच. हे निश्चित झाल्याने विनय पुन्हा चालू लागला. लंगडणारा, विरक्तिहीन, एकसुरी, न बदलणारा, न थांबणारा. आताच सँडल्स ठीक करून घेतो, लगेच व्याकुळ, बेचैन रोगी एखाद्या विकाराच्या झटक्यात शरीर आखडून घेतो, ढिलं सोडतो, हात हलवतो आणि डोळे विस्फारून अत्यंत अपरिहार्य व नितांत आवश्यक अशी एखादी अनिश्चित मागणी करून पुढच्याच क्षणी शिथिल होऊन पेंगू लागतो, त्याचप्रमाणे जोडे ठीक करून घ्यायच्या विचाराने उत्तेजित झाल्यानंतर दुसऱ्याच क्षणी विनय ढिला पडला. ठक-घे, कर ठक. ठक-घे, कर ठक. ठक-घे, कर ठक. एकच आवाज, फक्त एक. अंधार असो वा प्रकाश, कृष्णपक्ष असो वा शुक्लपक्ष, दाढी केलेली असो वा नसो, - एकच आवाज. जर जनता असती - नाही आहे- म्हणून- छकडा गाडी चालू द्या. बैलगाडी चालू द्या, कचकच होऊ द्या, कर्र कर्र होऊ द्या. कुणी मनाई करणारं नाही, ओरडणारं नाही, कुणी नोकर नाही, कुणी मालक नाही, सगळे पब्लिक आहेत. ठक-घे, कर ठक. ठक-घे, कर ठक. ज्वरग्रस्त रोग्यासारखे काही कर्कश आवाज करून विनयने जणू आपल्या अनुभूतींना मुक्त करायचा प्रयत्न केला. पायांच्या आवाजावरून त्याला वाटलं की पायांचा आवाज थांबल्याची प्रतिक्रिया त्याच्या ओळखीची नाही, हे शहरदेखील त्याच्या ओळखीचं नाही, म्हणून ठक-घे, कर ठक चालू देत.

आपल्या दिवसभरच्या संवेदनांना, विशेष करून संध्याकाळच्या वेळेला, रस्त्यावरून चालताना, या शब्दांत व्यक्त करून, विनयच्या पोटाच्या खालच्या भागापासून ते गळ्यापर्यंत भकास हास्याचा ओकारीसारखा भाव गोळा झाला.

हसण्याची सभ्य रीत विसरून विनय एखाद्या दारुड्यासारखा हसायचा जिवापाड

प्रयत्न करू लागला, हसण्याचा दुर्गंध सुकवून टाकण्यासाठी असेल कदाचित. उद्‌गाराच्या प्रथम प्रयासाच्या वेळी तो थांबला नाही. कारण त्यावेळी तो विचार करीत होता की अन्नप्राशनापासून ते आजवर पोटात कितीतरी वस्तू गोळा झालेल्या आहेत. पचून पचून, सडून सडून ढोल झाल्या आहेत. वा, वा, काय सांगावं? घ्या आणखी कांदे बटाटे, संध्याकाळच्या वेळी - मनातला विचार संपेपर्यंत त्याने तीनचार वेळा ढेकर द्यायचा प्रयत्न केला. गळ्याच्या शिरेला एक ताण जाणवला, विचार संपवून एकदोनदा प्रयत्न करून त्याने एक ढेकर दिली. तोंड वासायला विसरला म्हणून वास शोषून घेता आला नाही. यावेळी आ वासून एकदोनदा प्रयत्न केल्यावर - अरे, हे काय होतंय - म्हणून स्वतःलाच धमकावून तो पुन्हा चालू लागला. त्याचबरोबर तो आवाज पुन्हा येऊ लागला. ठक-घे, कर ठक, ठक-घे, कर ठक. आवाज ऐकत नसल्याचं नाटक करून विनय विचार करू लागला - चालतो आहे खरा, पण कुठं चाललोय त्याचा विचारच केला नाही, केला होता का? नाही, घरून निघताना देखील विचार केला नाही. सकाळी चहा घ्यावा त्याप्रमाणे संध्याकाळी सुधीरदाच्या घरी जायलाच हवं का? जाऊन तरी काय होणार आहे? फार फार तर आणखी एकदा वर्तमानपत्र वाचून होईल. नाहीतर बाहेरच्या कुर्चीवर बसून राहील, नाहीतर त्या मुलीशी- काय बरं नाव तिचं? गुलाब, चंपा की जाई? की पूसी-फूसी?

विनयचं विचारसूत्र हरवलं. ते सूत्र हरवताच दुसरा एक दोर हाती लागला. ठक-घे, कर ठक, ठक-घे, कर ठक. पायांच्या ज्या आवाजाच्या बाबतीत तो बेफिकीर झाला होता, कुठल्याशा फटीतून त्याने पुन्हा आक्रमण केलं. ठक-घे, कर ठक, ठक-घे, कर ठक, नाही जाणार, नाही जाणार, सुधीरदाच्या घरी नाही जाणार. समोरच गल्ली दिसू लागली. म्हणून विनयने पुन्हा एकदा स्वतःलाच म्हटलं, नाही जाणार, नाही जाणार, मुळीच नाही जाणार! गल्ली आली. डावीकडे न वळता, नाही जाणार, नाही जाणार, म्हणत म्हणत आणखी एक दोन पावलं चालून विनय थांबला. स्वतःलाच त्याने धमकावलं, हे काय चालवलं आहे? नुसता फाजीलपणा! निदान सुधीरदाचं घर तरी आहे जायला. चल. नाहीतर नुसता घरातच सगळा वेळ घालवावा लागेल.

विनय डावीकडे वळला. ठक-घे, कर ठक. ठक-घे, कर ठक. काय कटकट आहे. सगळ्या गोष्टी विरघळत चालल्या आहेत. आज जाऊन बाबीच्या गाण्यांच्या वहीत चित्र काढून देईन. हो, मुलीचं नाव आहे बाबी. बालिकेचं नाव आहे बाबी. ठक-घे, कर ठक. ठक-घे, कर ठक. तोच एक आवाज, तोच एक. अंधार असो वा उजेड. सुधीरबाबूंच्या घरापाशी पोचून विनय विषण्ण झाला. कलकत्त्याची आठवण होऊन तो अतिशय व्यथित झाला,. कलकत्त्याच्या आठवणीने तो विलक्षण बेचैन झाला. आईवडील, बहीणभाऊ सर्वांनी भरलेलं घर सोडून, मित्रमंडळींनी दाटलेलं तिथलं

कॉफी हाऊस सोडून, लोकांनी भरलेल्या तिथल्या एका ट्राममधून तो इकडे आला आहे. गेट उघडण्यासाठी पायांचा एकसुरी आवाज थोडा वेळ थांबवला. गेट उघडता उघडता एक दीर्घ निःश्वास टाकला. त्यानंतर पुन्हा ठक-घे, कर ठक. ठक-घे, कर ठक. तोच एक आवाज.

विनय जणू एखादा नाविक असावा. कलकत्ता बंदरात जहाजाने नांगर सोडल्यावर सायंकाळ घालवण्यासाठी त्याला बंगाल आसामपासून ते मध्य प्रदेशापर्यंतच्या विस्तृत पृष्ठभूमीवर सोडलं असावं.

पुन्हा तोच आवाज. अमावास्या असो वा पौर्णिमा, थंडी असो वा उन्हाळा, तेच एक दृश्य, स्थिर दृश्य, वा चलचित्र. चिरंतन आकाश, चंद्र, नक्षत्र आणि वृक्षांसवे जे हे दृश्य निर्माण करताता तेदेखील निष्प्राण आहेत. खरं म्हणजे या स्थिर पटावर त्यांनी अभिनय करायचा होता. या सर्व अभिनेता-अभिनेत्रींनी जीवनाचं अनुकरणं करणं शिकून घेतलं आहे. अनुकरणात कला नसते. यांनी जर कलानिर्मिती केली असती तर याच स्थिर सनातन दृश्यपटावर कितीतरी सुखान्तिका, दुःखान्तिका घडल्या असत्या. पण नाही, सारं काही नुसतं प्रहसन होऊन राहिलं. अरेरे!

तेच एक! उजेड असो वा अंधार (कृष्णपक्ष असल्यास मध्यरात्री दृश्य बदलेल, हो, सायंकाळच्या तुलनेत हे परिवर्तन घडते. शुक्लपक्षाची पहिली रात्र आणि कृष्णपक्षाची अखेरची रात्र प्रागैतिहासिक असतात.) दक्षिण पूर्वेकडच्या कोपऱ्यातील आंब्याच्या झाडावरील हिवाळ्यातलं ऊन लांबलचक असतं. ऊन शोधून बसता येतं, पण चंद्र शोधून? स्वैंपाकघर लांबीला थोडं कमी आहे. उंचीलाही थोडं कमी आहे, जास्त कमी नाही. वरचे पत्रे बदललेले नाहीत. थोरल्या मुलीच्या लग्नाच्या वेळी सुधीरबाबूंनी फरशी घातली होती. आणि त्यावेळी जी रेलिंग घातली होती, ती जवळ जवळ छताला स्पर्श करून लागली आहे. जीव गुदमरू लागतो. व्हरांड्याच्या एका कोपऱ्यात श्राद्धाचं सामान पडलं आहे. सुधीरबाबूंच्या आईच्या श्राद्धासाठी आणलेलं. स्वैपाकघर पूर्वेला आहे, पश्चिमाभिमुख. उत्तरेच्या बाजूला दोन कोठड्या असलेली एक खोली आहे आणि दक्षिणेला एक लांब खोली आहे.

तेच एक दृश्य, तेच एक. प्रकाश असो वा अंधार. सकाळची दृश्यं बदलतात, शरद ऋतूत सकाळचं बहुतेक एक ईषत् स्थिर रूप असतं - एरवी अन्य दिवसांत ते बदलत असते. धावपळ करणारी सकाळ सारखी बदलत असते. दुपारी बुडी मारून पोहत असते. तिसरा प्रहर टिकत नाही. स्वस्त खोबरेल तेलाचा वास चुरमुऱ्याच्या वाटीला येतोय. संध्याकाळी मिनूला वेणीफणी करायची असते. वेणी केल्याखेरीज रस्त्यावर जाणं तिला कसं शक्य आहे? आता ती पंधराची आहे. शाळेतून परत आल्यावर आपल्या दादाला, मला, विनयला गूळ चुरमुरे खायला दिल्याखेरीज मीनूला बाहेर कसं जाता येईल? म्हणूनच मिनूच्या हातचा खोबरेल तेलाचा वास माझ्या चुरमुऱ्याच्या वाटीत सामावून जातो. अरेरे, मिनूला किती त्रास आहे!

सायंकाळच्या वेळी, आता या संध्याकाळच्या वेळी, चराचरात, धर्मशाळेबाहेर असते तशी नीरवता कशी काय? की बंदराची पृष्ठ भूमी नेहमीच अशी स्मशानासारखी असते? की हे माझ्याच घरात आहे? या घरात आहे? की माझ्या मनात आहे? ठक-घे, कर ठक. ठक-घे, कर ठक. सगळे चालताहेत हे घर आणि आम्ही या घरगाडीचे प्रवासी. स्टेशन कधी येणार आहे कुणास ठाऊक?

दोन कोठड्या असलेल्या उत्तरेकडच्या खोलीशेजारून आत जाण्यासाठी एक पत्र्याचा दरवाजा आहे. खोलीला तीन बाजूंनी बऱ्याच खिडक्या आहेत. पश्चिमेकडच्या भिंतीलगत असलेल्या बाबीच्या टेबलावर सरस्वतीचं एक चित्र आणि डोकेदुखीचं औषध आहे. मुलीचं डोकं दुखत असतं. अभ्यासाच्या टेबलावर कंदिलाचा प्रकाश असतो. पण बाबी बसली की तो दिसेनासा होतो, दिवा दिसत नाही. पण पंधरा-सोळा वर्षांच्या त्या मुलीच्या चहूबाजूंनी जणू प्रकाश झऱ्यासारखा पाझरत असतो. पश्चिमेकडच्या खिडक्या बंद आहेत, पूर्वेकडच्या खिडक्या उघड्या आहेत, बाबी पूर्वेकडच्या खिडकीकडे पाठ करून बसते. म्हणूनच मुलीच्या चेहऱ्याच्या चारी बाजूंनी प्रकाशाचा झरा पूर्वेकडच्या खिडकीतून बाहेर वहात असतो. कुणी प्रेक्षक असता तर त्याला दिसलं असतं - बाबीच्या टेबलावरील कंदिलाचा प्रकाश पूर्वेकडच्या खिडकीतून बाहेर पडून या पत्र्याच्या दारावर धुक्यासारखा अस्पष्ट उजेड पसरतो. कुणी प्रेक्षक असता तर त्याला दिसलं असतं - या कंदिलाच्या प्रकाशासमोर बाबीच्या चेहऱ्याची रूपरेषा दिसते. (पतिव्रतेचं वलय ते हेच का? पण या रेषेत वर्तुळाकाराचा निर्देश आहे, किंचित ताणलेल्या अवयवांचे वैशिष्ट्य आहे आणि त्यात भुरभुरणारे केस. आपण एक चित्र असल्याचं बाबीला ठाऊक नाही, आपण चित्र असल्याचं चित्राला ठाऊक नाही, माणूस चित्र असल्याचं प्रेक्षकांना ठाऊक नाही. चित्र माणूस असल्याचं कवीला ठाऊक आहे - बाबी गाणं गाते - 'तू काय निव्वळ चित्र आहेस?'[१]

पत्र्याच्या दारातून आत गेल्यावर आहे - विहिरीभोवती बांधलेला चबुतरा, कुंपण आणि उत्तरेकडे भिंत. दोहोंच्या मध्ये अंधार. बांबूच्या कुंपणाला असलेली एक खिडकी व त्यावर लावलेली चिक. खिडकीसमोर टेबल, टेबलासमोर चंदन. चंदनच्या बोटाचं टोक दातासमोर. चंदन पश्चिमेकडे पाठ करून पूर्वेकडे तोंड करतो. कंदिलाचा क्षीण प्रकाश त्याच्या चेहऱ्यावर सावल्यांचा खेळ खेळत असतो. ऊन-सावल्याच्या खेळातून काय माणसाचं व्यक्तिमत्त्व दिसून येत असतं? कंदील उजवीकडे आहे. चंदनचं नाक जरा वर आहे. म्हणून डाव्या डोळ्याच्या कोपऱ्यात अंधार आहे. सँडो बनियन, रुंद खांदे, खेळाडूंसारखे छोटे छोटे केस, मजबूत जबडा,

---

१ रवीन्द्रनाथांच्या एका अतिशय प्रसिद्ध कवितेची एक ओळ

सारंच काही दणकट आहे. मात्र डोळे असे निस्तेज का? नखं का कुरतडतोय चंदन? समोरच्या खिडकीतून झिरपणाऱ्या प्रकाशाच्या झऱ्यातून माणसाचं एक डोकं वहात येतं. धड नाहीच. चंदन भ्याड आहे?

त्यानंतर खोलीच्या लहानशा तुकड्यापलीकडे डावीकडे स्वैपाकघर, स्वैपाकघराच्या ओसरीवर, कोठडीत चिमणीची मिणमिणती ज्योत, सावली फेकते, पुसून टाकते, उजेड पसरते, पुसून टाकते. कुंपणाच्या फटींमधून दोऱ्यासारख्या प्रकाशरेषा खोलीत, स्वैपाकघराच्या पायऱ्यांची सावली खोलीत. सावली पकडण्यासाठी आभाळ खाली उतरलं असतं, खाली, नेमकं छताच्या टोकाच्या वर, तर चिमणीच्या प्रकाशात स्वैपाकघराच्या खाली छताची सावलीदेखील पडू शकली असती. ओसरीच्या एका कोपऱ्यात ठासून भरले आहे - लाकूडफाटा, पोती, कोळसे - अंधारात एकमेकांना चिकटून प्रकाशाच्या आकस्मिकपणामुळे त्रस्त - कथेतील धर्मशाळेतल्या प्रवाशांच्या सामानासुमानासारखे. कोठडीच्या आत एका लहानशा चुलीच्या लहानशा विस्तवासमोर सुधीरबाबूंची बायको स्वैपाक करतेय. चिमणीचा परिचित प्रकाश चैत्रातील वाऱ्यासारखा थरारतो; पण त्यामुळे सुधीरबाबूंची तीस वर्षांची पत्नी अनोळखी का वाटू लागते?

गोधूलीच्या वेळी चराचर स्पष्ट असतं. संध्याकाळी वाहून जातं. विचार करा. संध्याकाळी. विचार करा. विचार करावाच लागेल, संध्याकाळी. मी आता विचार करीन. वहिनींशी इकडच्या तिकडच्या दोनचार गप्पा मारल्यावर, दक्षिणेकडच्या खोलीच्या व्हरांड्यात खुर्चीवर बसून विचार करीन - कसला कसला विचार करायचं ठरवलं होतं. आणि आता कसला विचार करतोय.

"कोण?" वहिनीच्या आवाज ऐकताच डोळे लुकलुकतात. लहानशा पाटावर गुडघे वर करून उकिडवी बसली आहे. गुडघ्यांवर हात टेकले आहेत. उजव्या हातात विळीसारखी काही वस्तू आहे. डाव्या हातात काय आहे? पावलांची चाहूल लागताच कमरेच्या वरचा भाग ताठ केला आहे. मानही वर उचलली आहे.

"मी आहे विनय-" विनय स्वैपाकघराच्या पायरीवर पाय ठेवतो.

'विनय? ये, ये. घरी सर्व खुशाल आहेत ना?" विनयचं उत्तर ऐकल्यावर वहिनीचं ऊर्ध्वांग शिथिल होतं. डाव्या हाताने चुलीतला विस्तव प्रज्वलित करू लागली. काही ठिणग्या उडाल्या. तशी तिने डोळे मिटून तोंड बाजूला केलं. प्रश्नार्थक मुद्रेने तिने विनयकडे पाहिलं. या प्रश्नाच्या उत्तरादाखल विनय नेहमी 'हं' म्हणून उंबऱ्यावर बसतो. वहिनी रोज रोज हा प्रश्न का विचारते? सवय? रोज तेच, तेच. रोज तीच. एक गोष्ट, तीच बेलाला कदाचित हे समजत नाही. त्यांच्या मनाची जवळीकच कंठात दूरत्वाचा स्वर भरून टाकते.

"बै-स-" वहिनी अगोदरच बसलेल्या विनयला म्हणते. विनय एक काडी घेण्यासाठी हात पुढे करतो. काडी हातात घेऊन जमिनीवर रेघोट्या ओढू लागतो.

वहिना काडी बघते, रेघोट्याही बघते. विनय काडी फेकून देतो.

"शाळेत गेला होतास?" वहिनीचा प्रश्न या नंतरचा प्रश्न असेल जेवलास कुठे? त्या अगोदरच उठावं. कुणी आलं तर वहिनी मजेत गप्पा मारू शकते. तिला स्वतःला काही सांगायचं नसतं. तीस वर्षांपूर्वी माहेरी ज्या काही गोष्टी शिकून आली होती त्या पाच वर्षातच संपल्या. इथे, या गावंढळ वस्तीत, विषय शोधून सापडत नाही. जिथे विषय निर्माण होतात त्या जागा अजून वहिनीच्या झालेल्या नाहीत. वहिनी अशी का बघतेय? तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारची किशोरावस्था आहे. ते पाहून, तिने बाबी-चन्दन-सोना-रूपा-हीरा अशी नावं का ठेवली ते लक्षात येते. पण यावेळी ती नाहीये. का? चुलीची धग? डोळ्यातला धूर?

"सुधीर नाही आला?" विनयने उभं राहून वहिनीला विचारलं.

"नाही. कुठं निघालास?" वहिनीने चुलीकडे पहात विनयला विचारलं.

"त्या खोलीत-सुधीरदा नाही आले?"

"ट्यूशनला गेले आहेत."

कसला विचार करायचं ठरवलं होतं? कातरवेळेच्या हुरहुरीचा इतिहास. प्रथम अध्याय - सोना, रूपा, हीरा-तथ्यांचा अभाव. द्वितीय अध्याय- बाबी. तृतीय अध्याय-मी. चतुर्थ अध्याय-वहिनी. पंचम अध्याय-सुधीरदा. बाबी कसला विचार करते?

सुचित्रा मित्रचं एक चित्र काढून द्यायला बाबीनं सांगितलं होतं. नाही काढलं, नाही काढणार. बाबी तू अभ्यास सोड, गाणं सोड, कपडेलत्ते चुबक, स्वैपाकघर धू. हातांना हळदीचा वास येऊ दे, अंगाला हळद लावून लाल शेल्याच्या स्वागतम् खालून निघून जा. नाहीतर तू मरशील, मरशील. जा, मर विनयला हसू आलं, पोटात नाही, ओठांवर बाबी बसु - मरायला येत आहे, कोण वाचवणार? संध्याकाळच्या वेळेला असला अभद्र विचार करू नये म्हणतात, दक्षिणेकडच्या दारी जाऊ नये म्हणतात. दक्षिणेकडचं दार उघडलं, मेलो, मेलो. बऱ्याच दिवसांपासून अंथरुणाला खिळून राहिलेल्या रोग्याच्या हास्यासारखं विनयला आपलं हसू वाटलं. म्हणूनच तो असल्या रोगट गोष्टींचा विचार करतो आहे. पण सरस्वतीच्या चित्रापाशी ठेवलेल्या डोकेदुखीच्या औषधाकडे पहात संध्याकाळच्या वेळेला बाबी सचित्रा मित्रचा विचार करते का? विचार करते. वयाप्रमाणे विचार करते. सगळ्या गोष्टी जतन करून करून मन मोठं होत जातं, मन मोठं होता होता --- बाबीने सुचित्रा मित्रचं चित्र मागितलं आहे, देईन रेखाटून - पण त्या अगोदर ते गाणं ऐकायलं हवं - आणखी अंधारात ठेवू नकोस, मला बघू दे - अंधार, दाट अंधार आहे - मला स्वतःला बघू दे-बाबी, तुझं 'मीपण' कुठे आहे? मला दाखवशील? माझं 'मीपण' तर पोकळ आहे. आयुष्यभर शून्याचा शोध, अरेरे!

''विनय, चहा घेणार?''

''नको.''

बेला अजून असा विलक्षण विचार करीत होती? नाही. बेला काळजी नाही, उशीर आहे. चैतन्य नाही. अस्तित्व आहे. मी देखील असाच आहे. व्यक्तीला व्यक्तित्व असतं. व्यक्ती शहरात राहते. मला व्यक्तित्व नाही. माझं तर सव्वीस वर्षांचं पाप आहे. मला पंधरा वर्षांची मुग्धता हवी होती. बाबी-ते गाणं तरी म्हण - मला स्वतःलाच बघू दे.

इथं शरीराचं स्टिमुल्स आहे. मनाचं? कुठेय? मन गवताची एक काडी, इतकं नाजुक, बारीक-मना, कुठे आहेस रे तू? अरे मना, कुठे आहेस तू? मना रे, तू माझ्या देहात ये, ये! ये रे! माझ्या शुष्क देहात वादळाचं रूप घेऊन ये. ये रे मना, ये!

मनाच्या संदर्भात वादळाचा विचार करताच आकाश, समुद्र, पर्वत सर्वांनी एकरूप होऊन त्याच्या मनात एक विलक्षण चित्र निर्माण करून टाकलं. या सर्व क्षुल्लक गोष्टी ऐकता ऐकता एखादी मोठी गोष्ट हातून निसटून जाते, हरवते. मोठी, विस्तृत, 'वाइड', 'वाइल्ड' ('वाइड' शी यमक साधण्यासाठीच 'वाइल्ड' आलं, पण ते लक्षात येऊनही विनयनने तो शब्द रद्द केला नाही.) 'वाइड' मध्येच तर 'वाइल्डनेस' रहातो-काहीच नसल्यास चित्र रेखाटायची इच्छा कुठून होईल? इथलं चित्र, कंदिलाच्या आजूबाजूचे भुतासारखे चेहरे, मुलांचे, ओळखू येणार नाहीत, लोकांच्या शरीरांच्या रेषांचे इशारे, रंग, लाइनींच्या प्रकाशावर उजळ रंगांची सावली पडतेय, किंवा मग वहिनीच्या कमरेच्या वरच्या भागाचे अचानक व्यग्र होणं, कुणाच्या तरी पावलांच्या चाहुलीने, द्रोणलतासारखी रेखा, दोन पायात तोंड घालून बसलेला कुत्रा अचानक वर बघतो, पशूदेखील सुंदर आहे, डोळ्यांनी माणसासारखा, पण वहिनीच्या चेहऱ्यावरचं ते कैशोर्य कुठे गेलं? विनय डोळे मिटून जणू खोदलेल्या मूर्तीच्या लुप्त रेषा शोधतो. वहिनीची ती किशोरावस्था कोणत्या रेषेत आहे?

खूप रुंद रंगाची कुठलीशी मोठी वस्तू, काही रुंदशी, कुठली जबर अशी वस्तू. समोरच्या सर्व विषयांच्या रेषा संकीर्ण आणि वर्ण निष्प्राण. सुचित्रा मित्रच्या चित्रात बाबीला काय पहायचं आहे? मला त्यात काय दाखवायचं आहे? राहू देत. माझं माझ्यापाशीच!

गगनेन्द्रनाथ ठाकुरनी रेखाटलेली यक्षपुरी[१] - (अंधुक प्रकाश, छायाप्रकाशाच्या त्रिकोणी तुकड्यांनी कधी सुवर्णस्तंभाचा, कधी मानवदेहाचा निर्देश, नन्दिनीची पसरलेली बोटं, लाल कण्हेरच्या गुच्छांचा लाल रंग-किती गुंतागुंतीचं, अशक्य नाही.); अवनीन्द्रनाथचा शहाजहान-(किती उदास, विषण्ण, आकृत्या जणू

---

१ रवीन्द्रनाथांचे प्रसिद्ध नाटक 'लालकण्हेर' चं एक दृश्य.

नाहीतच, रेखा जणू पुसल्या जात असाव्यात, थंडीच्या दिवसात आरशावर जणू निःश्वासाचा पडदा - सूक्ष्म, सहन होत नाही, नाही होत.); रवीन्द्रनाथचं नृत्य - (प्राचीन ईजिप्तसारखं आदित्व, हातापायांच्या साध्या मुद्रा, आदित्व तर हवंच, हं, आ-दि-त्व, हिब्रू मंत्रोच्चारण, आदित्व, 'लाउड' रेखा, पण रंग इतके बिकट का आहेत, मुद्रा क्रमशः सैतानाच्या आरतीसारख्या का, आणि चेहऱ्यावर जणू मृत देहाच्या आधारे रेखाटलेल्या अवयव-चित्राची अमानुषिकता, मरणं, जगणं, कुठं, 'लाउड' रंगांत, 'लाउड रेषां'त - बाबी, म्हणूनच तर तुझं गाणं इतकं आवतं, 'लाउड' गळा, उदार, उदात्त, सुचित्रासारखी बाबी, तू सुचित्रा मित्र होशील. बाबी, तू सुचित्रा मित्र होशील?); नन्दलाल बसुचा शिव - (नाही, नाही, अरे नाही. ज्याच्या घरी अन्नपूर्णा असावी, त्याने अन्नासाठी आक्रोश करावा हा तर सर्वात मोठा दारुण प्रमाद आहे. प्रमाद, प्रमाद, प्रमाद-नाही, नाही, अरे नाही.); यामिनी रायचं कृष्ण जन्माष्टमी - (वा, वा, तिरपी बासरी, त्रिभंगी मुरारी, त्रिभंगी कुठं आहे? बस्, एक गुडघा तेवढा मुडपलेला आहे, त्यावर अवघ्या शरीराचा भार पुरासारखा उतरलेला आहे, शाल वृक्षासारखी ऋजुता, मासोळीसारखे डोळे, एकेक नेत्र, एकेका मासोळीसारखा, स्वच्छ जलात विहरणारा, मणीमध्ये किशोरीचा विस्मय-देवा रे, इतकी स्वच्छता, इतकी सरलता, इतका विस्मय सहन करायची ताकद माझ्यात नाही.); व्हॅन गॉगचं क्रॉस ऑन द स्ट्रीम-(अरे, मला वाचवा, मला नाही सहन होत हा छळ, काळा कावळा, कोकिळ नव्हे, काळा कावळा, आकाशासारखी गती, उद्ग्रीव, पंखांत शृंखला, वादळ, खाली महाकाव्याची नदी, हाय, मला हे सहन होत नाही. कुणी आहे? मला वाचवा, देवा रे, मला कोण वाचवील, काळ्या कावळ्याच्या पंखांआड सूर्य बेपत्ता, या अंधारात खालचा अमर्याद प्रवाह खेचत आहे, किनारा नसलेल्या या प्रवाहात मला वाहून जायचं नाही, मला किनारा द्या, घर द्या, बाबी, कुठं आहेस तू, कावळे रक्तासाठी आसुसले आहेत, माझ्या छातीत आता रक्त नाहीये, या काळ्या अंधारात माझ्या रक्ताने महाकाव्याचा सागर लाल झाला आहे, बाबी, तू कुठं आहेस, मना, तू कुठं आहेस, माझ्या अस्थिपंजरात अपार व्यथा आहे, व्हॅन गॉगच्या कावळ्याचे पंख नंदलालच्या शिवाचे पंजर होऊन जातात); नंदलालचा अर्जुन, अर्जुन, अहाहा, शापित अर्जुन, 'रफ ड्रॉईंग', 'रफ' रेषा, विराट चेहरा, विराट वक्ष, गुडघ्यापर्यंतच्या मांड्या गोलाकार, गुडघा वक्र आहे, हाताच्या एका कोपरावर विसावला आहे, त्या बाहूचा स्नायू जणू स्थलपद्माची पाकळी असावा, दुसरा हात आश्रयासारखा आहे, विद्रोहासारखा आहे, साऱ्या शरीराच्या स्नायूंचे चकित हावभाव, जणू दोन पंजांमध्ये तोंड घालून बसलेला सिंह चाहूल लागल्याने दचकला असावा, पाठ आश्रयासारखी-जणू एखादं पिंपळाचं झाड असावं (मला सापडला बुवा, आदि आणि लिरिक, मला सापडला बुवा सापडला, मी चित्र रेखाटीन-समुद्रासारखं 'रफ', चराचरा सारखं नटलेलं, महाकाव्यासारखं महन् आणि लिरिकसारखं करुण, मी जरूर रेखाटीन.) बाबी, मी अर्जुन आहे.

प्रतिज्ञेच्या त्या क्षणी त्याला दिसले स्वैपाकघराच्या बांबूच्या कुंपणातील फटींमधून खोलीत येणारे उजेडाचे थेंब, खोलीत पडणारी स्वैपाकघराची सावली, त्या खोलीच्या आतून येणारा प्रकाश दाराच्या चौकटीवर ओल्या साडीसारखा लपटलेला, तिकडच्या दोन खोल्यांतील धुक्यासारखा उजेड. मला सापडलं रे सापडलं, मी रेखाटणार-या मंत्राचा जप करता करता डोळे उघडून, जप करता करताच डोळे मिटून त्याच्या लक्षात आलं-घनदाट रात्री, खूप लांबवर कोल्ह्यांच्या रडण्यासारखं स्मशानातलं क्रंदन खोलवरून ऐकू येतेय. कंदिलाच्या भुतासारख्या प्रकाशाच्या आजूबाजूला तुटक्या रेखांचा चेहरा कंदिलाच्या विवर्ण प्रकाशात उजळ रंगाचे फिकेपण, ओल्या साडीसारखा प्रकाश, काजव्यांसारखा प्रकाश, द्रोणलतेसारखी शरीराची रेषा, अचानक विद्यमान कैशोर्याचं अचानक अंतर्धान, कुंपणावरील सावलीची खिडकी, आणि भिंतीच्या खिडकीच्या मधोमध किशोराचे अस्वस्थ डोळे, पाठ वळवून बसलेल्या किशोरी समोर ठेवलेलं डोकेदुखीचं औषध- सर्वांनी मिळून विनयला घेरून टाकलं. विनयला त्यांना करुण स्वरात सांगावंसं वाटलं, 'मी प्रसन्ननारायण विद्यालयाचा ड्रॉईंगमास्तर आहे. मी नाही काढणार, मी नाही चित्र काढणार.''

''कोण? विनयकाका?''

''हूं.''

''असे चुपचाप का बसलात?''

''काय करू? तुझा अभ्यास संपला?''

''छट्, अभ्यास करायला आवडत नाही.''

''काय आवडतं?''

''गाणं.''

''गा.''

''नको, आई रागावेल.''

''नाही रागवायची, मी सांगतो.''

''आज नरेनकाकांकडे गेले होते. त्यांच्या खालच्या मजल्यावरच्या बॅनर्जींनी गाणं ऐकण्यासाठी बोलावून नेलं होतं.''

''काय गायलीस?''

''खूप आवडलं.''

''का?''

बाबीने उत्तर दिलं नाही.

खोलीत कुंपणाच्या फटीतून येणारा काजव्यांसारखा प्रकाश. एकमेकांची नजर चुकवण्यासाठी ते दोघे प्रकाशबिंदूनी रेखांकित जागेकडे टक लावून पहात आहेत. त्या गुंतागुंतीच्या रेखाचित्राकडे

प्रतिज्ञेच्या त्या क्षणी त्याला दिसले स्वैपाकघराच्या बांबूच्या कुंपणातील फटींमधून खोलीत येणारे उजेडाचे थेंब, खोलीत पडणारी स्वैपाकघराची सावली, त्या खोलीच्या आतून येणारा प्रकाश दाराच्या चौकटीवर ओल्या साडीसारखा लपटलेला, तिकडच्या दोन खोल्यांतील धुक्यासारखा उजेड. मला सापडलं रे सापडलं, मी रेखाटणार-या मंत्राचा जप करता करता डोळे उघडून, जप करता करताच डोळे मिटून त्याच्या लक्षात आलं-घनदाट रात्री, खूप लांबवर कोल्ह्यांच्या रडण्यासारखं स्मशानातलं क्रंदन खोलवरून ऐकू येतेय. कंदिलाच्या भुतासारख्या प्रकाशाच्या आजूबाजूला तुटक्या रेखांचा चेहरा कंदिलाच्या विवर्ण प्रकाशात उजळ रंगाचे फिकेपण, ओल्या साडीसारखा प्रकाश, काजव्यांसारखा प्रकाश, द्रोणलतेसारखी शरीराची रेषा, अचानक विद्यमान कैशोर्याचं अचानक अंतर्धान, कुंपणावरील सावलीची खिडकी, आणि भिंतीच्या खिडकीच्या मधोमध किशोराचे अस्वस्थ डोळे, पाठ वळवून बसलेल्या किशोरी समोर ठेवलेलं डोकेदुखीचं औषध- सर्वांनी मिळून विनयला घेरून टाकलं. विनयला त्यांना करुण स्वरात सांगावंसं वाटलं, 'मी प्रसन्ननारायण विद्यालयाचा ड्रॉईंगमास्तर आहे. मी नाही काढणार, मी नाही चित्र काढणार.''

''कोण? विनयकाका?''

''हूं.''

''असे चुपचाप का बसलात?''

''काय करू? तुझा अभ्यास संपला?''

''छट्, अभ्यास करायला आवडत नाही.''

''काय आवडतं?''

''गाणं.''

''गा.''

''नको, आई रागावेल.''

''नाही रागवायची, मी सांगतो.''

''आज नरेनकाकांकडे गेले होते. त्यांच्या खालच्या मजल्यावरच्या बॅनर्जींनी गाणं ऐकण्यासाठी बोलावून नेलं होतं.''

''काय गायलीस?''

''खूप आवडलं.''

''का?''

बाबीने उत्तर दिलं नाही.

खोलीत कुंपणाच्या फटीतून येणारा काजव्यांसारखा प्रकाश. एकमेकांची नजर चुकवण्यासाठी ते दोघे प्रकाशबिंदूनी रेखांकित जागेकडे टक लावून पहात आहेत. त्या गुंतागुंतीच्या रेखाचित्राकडे टक लावून पाहता पाहता विनयला आठवलं की

आज दिवसभर वारा चैत्रातल्यासारखा अंदाधुंद वाहात राहिला आहे. त्यामुळे निसर्गात व त्याच्या देहात एक शून्यत्वाची जाणीव निर्माण झाली आहे. त्या प्रकाशबिंदू रेखांकित जागेवर दृष्टी खिळवून बाबी जणू अनिवार्य पतनापासून बचाव करीत आहे. दूर कुठेतरी हरवून जाऊ पाहणारा शो तिच्या चेहऱ्यावर आणि डोळ्यात आहे. त्या खोलीला केंद्र करून त्या दोघांमध्ये एक निस्तब्धता पसरलेली आहे. वाटेल त्या क्षणी ती निस्तब्धता सशब्द दीर्घश्वासाने गर्भपात करण्याची शक्यता आहे. आणि जणू त्या सर्वनाशाला प्रतिबंध करण्यासाठीच दोघांनी चेहरे व डोळ्यांच्या ह्या स्वगत हावभावांनी स्वतःला गुंतवून ठेवायचा प्रयत्न केला. त्यावेळी दोघांच्या डोळ्यांसमोर एक व्याकुळपणा नाना रूपे धारण करून नाना आकारांत भग्न होऊन पुन्हा नव्या रूपात नव्या पद्धतीने भंग होत दुसऱ्यांदा नवे रूप ग्रहण करू लागली.

हिस्टीरियाचा रोगी जसा थोडा वेळ एखाद्या अपर्थिव व अनिश्चित तत्त्वाशी झगडत मग पार्थिव व निश्चित वस्तूकडे असहाय्यासारखा न्याहाळत राहतो अगदी तसेच हे दोघे या वेळी परस्परांकडे बघत आहेत. विनय हसला, छातीत दुधाचा थेंब नसलेली एखादी आई हसावी तसा. तरीसुद्धा मुलं दूध मागत असावीत आणि दुसऱ्या एखाद्या निकोप व दुग्धवती जननीचा पत्ता लागून एखादा मुलगा निघून गेला असावा. झटदिशी बाबीकडे पहात तो म्हणाला, ''सांगितलं नाहीस, नरेन् बाबूकडे काय झालं?''

गुडाघ्यांआड तोंड लपवून बाबी इतका वेळ संकोचून बसली होती. आता बैठक बदलून ती पद्मासन घालून बसली. एकदा मानेला झटका देऊन केस वगैरे ठीक केले. आणि तिची गोष्ट ऐकण्यासाठी विनयदेखील नीट सावरून बसला. आणि बाबी जणू पाणकोंबडा झाली.

त्यानंतर विषादाचा कुठलासा झरा वळणं घेत घेत. अचानक बाबीच्या कंठातून बाहेर पडला आणि बाबीने उंच आवाजात गीत छेडलं, ''निशीथे की कये गेलो मने.''[१]

सुरुवातीच्या पाच शब्दांमधूनच विषम ताल व्यक्त झाला. अगोदर 'की जानि'[२] मंद्र, तरल स्वरात ध्वनित झालं, मग दुसरा 'की जानि' ध्वनित झाला तार, तरलतर स्वरात. गंभीर व तरल स्वरांच्या विपरीत सहवासाने व्याकुळता पसरली. ''से कि घुमे''[३] - सरल गंभीर 'घु' च्या ऊर्ध्वगामी '३' मध्ये निम्नगामी अचानक स्तब्ध 'मे' बरोबर उत्कर्ण मृगनाभि हरिणी, द्रोणालतासारखी रेखा.

---

१ 'रात्री तू माझ्या मनात काय सांगून गेलास.?

२ काय ठाऊक

३ तो काय झोपेत आहे

"से कि जागरणे[४]"- जा-ग-र-णे- प्रत्येक अक्षरावर एक लहान तरंग, आनंद-द्विधा-संशय-आग्रह. पुन्हा तेच मंद स्वरात 'की जानि', डोळे मिटून. या खोलीत प्रकाश अंधारासारखा अंधुक आहे. आंब्याच्या झाडामुळे चांदणं पोचू शकत नाही. "नाना काजे नाना मते फिरि घरे, फिरि पथे"[५] या खोलीतून त्या खोलीत, त्या खोलीतून या खोलीत, वाटेत, एकांतात, आणि प्रत्येक वेळी रात्रंदिवस तो कानातल्या कानात काय सांगतो कुणास ठाऊक. मिनूला सायंकाळ बोलावते. माझ्या चुरमुऱ्याच्या वाटीला खोबरेल तेलाचा वास. आईला रात्रीच्या वेळी - 'आई झोप येत्येय तुला?' "से कथा कि अगोचरेबाजे क्षणे क्षणे-[६]" कुणास ठाऊक? माझ्या शरीराचा जो भाग मला दिसतो त्याच्या मागे कुठेतरी किंवा या शरीराच्या अवस्थानाच्या बाहेर कुठे हृदयनामक एखादं स्थान आहे. कळू शकलं असतं तर? कुणास ठाऊक? हाहाकार, बाबा, हाहाकार.
"से कथा कि अकारणे व्यथिछे हृदय"[७] चर्चच्या प्रार्थना संगीताप्रमाणे एकावेळी चार चार ध्वनी, अखेरचा ध्वनी विस्तृत, "ए कि भय"[८] आणि तो परत येतो न येतो तोच आणखी लहर "ए कि जय"[९] लहरीवर लहर, तरंगावर तरंग, व्याकुळ तट, एखादी प्रचंड प्रार्थना सागरलहरींप्रमाणे आघातावर आघात करीत चक्काचूर करून टाकते, नष्ट करून टाकते, वाहून नेत, बुडवून टाकीत, संकीर्ण क्षुद्र मास विरघळून टाकीत, हाडांना शिजवून नसांमधून रक्त काढीत, रक्ताच्या लालभडक रंगाने प्रवाळ द्वीप, सृष्टीचा द्वीप निर्माण करते. निर्माण करीत आहे, रक्ताच्या रंगाने, - सृष्टी, सृष्टी, सृष्टी. पृथ्वीभर वाऱ्याची उलथापालथ - सृष्टी. आ-दि, लि-रि-क-ल. मी चित्र रेखाटीन, मी गाईन, मी समुद्र पाहीन. अग ए मुली, मान वर करून शुष्क ओठांवर कुठला आग्रह धरून, कुठला छळ सहन करीत तू क्रूसविद्ध येशू ख्रिस्ताच्या पायाशी भक्तासारखी बसली आहेस? अग ए, या अकाली वृद्धत्वाच्या सव्वीसाव्यात, गुडघ्यांवर मस्तक खाली करून, रुंद पाठीला ॲटलाससारखं पसरून मी कोणत्या विषादाने, कोणत्या त्रासाने गीत ऐकतोय - रात्री, या रात्री, काय सांगून गेलं मनात-सहन होत नाही, नाही होत सहन- "से कथा कि काने बारे बारे कय" 'आर नय', "आर नय"[१०] मिटलेली दृष्टी, ध्यानमग्न दृष्टी, अर्धवट मिटलेले

---

४ तो काय जागा आहे

५ नानाप्रकारच्या कामात व विचारांत दंग, कधी आत, कधी बाहेर येजा करते.

६ ती गोष्ट क्षणोक्षणी मला नकळत वाजत राहते.

७ ती गोष्ट काय अकारणच हृदयाचं मंथन करीत आहे.

८ ही काय भीती आहे.

९ ही काय विजय आहे.

१० ती गोष्ट काय ती कानांमध्ये पुन्हा पुन्हा सांगते -आणखी नाही, आणखी नाही.

डोळे, शिवाच्या ध्यानात, भुवयांपाशी केसांच्या दोन लांब रेखा, बासरी वाजत आहे, मनात की वनात? बासरीतून कोण छेडीत आहे, काय सांगत आहे, कुणास ठाऊक- ''से कथा कि नानासुरे बोले मोरे चलो दूरे-''[1] प्रत्येक वेळी चार शब्दांनंतर एक लहानशी लहर, ध्यानाची गोष्ट, मनातरी गोष्ट, उत्कर्ष मृगनाभी हरिणी, प्रार्थना तरंगाने उध्वस्त तटाची आत्म-लय, चल दूर, चल दूर, दूर- समुद्राच्या संगमावर, दूर-भर समुद्रात, दूर-समुद्राच्या तळाशी, दूर-अथांग जलराशीच्या अंतरंगात, तळाशी, दूर-समुद्रतळाच्या आकाशात. माझ्या शिरांमधून रक्त शोषून घ्या, हाडांमधून मज्जा, सृष्टीतील एक द्वीप, प्रवाळ द्वीप, रक्तवर्णाचा द्वीप निर्माण करा. बाबी बालिके, मी हात जोडून माझी सगळी पापं तुझ्या चरणी अर्पण करतो.

नदी पर्वतावरून समुद्रात जाते. गंगा ब्रह्मपुत्रेने आणलेल्या सुपीक मातीने एक देश, भूगोलातलं एक नाव, पृथ्वीवरचे काही लोक, काही सुंदर निसर्गदृश्ये तयार होतात.

नदी सागराला मिळते. ''चल दूर'', मुख, गंगेचं मुख, कलकत्ता एक बंदर आहे, कलकत्ता एक नाम आहे, समुद्राच्याकाठी, त्याच्या मागे आणि आजूबाजूला आणखीहीकितीतरी नावं आहेत. कलकत्ता आणि मग समुद्र. कलकत्ता समुद्राजवळ, भागीरथीच्यातीरी वसलेलं एक बंदर आहे- आसाम, बंगाल, बिहार, ओडिसा, उत्तर प्रदेश, मध्यप्रदेश ही त्याची पार्श्वभूमी आहे. त्यानंतर समुद्र!

या अंधारात ते दोघे रवीन्द्रनाथाच्या एका गीताचे हस्तलिखित होऊन जातात- काट मारलेली अक्षरं, अर्धवट ओळी, इकडे तिकडे केलेल्या सह्या आणि अंतर्वर्ती स्वरांचा भरणा!

---

१ नानाप्रकारच्या सुरात ती मला सांगत आहे, चल, कुठे दूर चल

# परिचय

## १. ताराशंकर बंद्योपाध्याय (१८८९-१९७१)

शरच्चंद्रानंतर बंगाली कथासाहित्याचे अध्वर्यू. कथा, कादंबऱ्या, नाटक व गीतरचनेत सिद्धहस्त. रवीद्रनाथांनी यांच्याविषयी व्यक्त केलेलं मत उल्लेखनीय आहे. - 'जमीन आणि माणसाला ते ओळखतात, त्यांच्याशी त्याचं नातं आहे.' हे नातं फक्त बाह्य नसून, आंतरिक आहे. शरत्-स्मृती पुरस्कार (१९४७), रवीन्द्र-स्मृती पुरस्कार (१९५५), साहित्य अकादमी पुरस्कार (१९५६), ज्ञानपीठ पुरस्कार (१९६६) मिळवले. कलकत्ता, उत्तर बंग, जादवपूर आणि रवीद्र भारती विश्वविद्यालयांची मानद डी. लिट्. ची पदवी मिळाली. राष्ट्रपतींकडून राज्यसभेचे सदस्य म्हणून नेमणूक, तसेच साहित्य अकादमीचे वरिष्ठ सदस्य होते. यांच्या अनेक कथा-कादंबऱ्यांचे विविध भारतीय भाषांमधून अनुवाद झाले असून काहींवर चित्रपटही निघाले आहेत. जन्म वीरभूम जिल्ह्याच्या लायपूर गावात झाला आणि मृत्यू कलकत्त्यात. वीरभूममधल्या अधोगतीस लागलेल्या जमीनदार घराण्यातले होते. लेखन हेच उपजीविकेचं साधन होतं. भारत सरकारने यांना 'पद्मभूषण' ही पदवी देऊन यांचा सन्मान केला होता.

## २ बनफूल (१८९९-१९७९)

खरे नाव बलाश्चांद मुखोपाध्याय. धंद्याने डॉक्टर. कलकत्ता मेडिकल कॉलेजची परीक्षा पास केल्यावर बरेच दिवस भागलपूरमध्ये वैद्यकीय व्यवसाय करीत राहिले. अखेरच्या काळात कलकत्त्याला रहात असत. कथा, कादंबरी आणि नाट्यलेखनात सिद्धहस्त. कथानक आणि शैली दोन्ही दृष्टींनी अद्वितीय अशा असंख्य कथा लिहिल्या. कलकत्ता विश्वविद्यालयाचे शरत्-स्मृती पुरस्कार (१९५२), आनंद पुरस्कार (१९६०) आणि रवीन्द्र पुरस्कार (१९६२) मिळवले. यांच्या कथा, कादंबऱ्यांतील पात्रांच्या बहुविधतेने व बहुरंगीपणाने वाचकांना स्तिमित करून सोडले आहे. यांनी नाटकंही लिहिली आहेत.

## ३. अचिन्त्यकुमार सेनगुप्त (१९०३ -)

'कल्लोल गोष्टी' चे असामान्य प्रमुख लेखक. सव्यसाची कथा, कादंबऱ्या,

कविता, चरित्र, बालसाहित्य, नाटक प्रत्येक क्षेत्रात लेखणी चालवली व नाव मिळवले. तीक्ष्ण अवलोकन, गंभीर सहानुभूती आणि अपार संवेदनशीलता यांनी यांच्या कथाकृती ओतप्रोत आहेत. न्याय विभागात काम केले. काही वर्षांपूर्वी डिस्ट्रीक्ट जजच्या पदावरून सेवानिवृत्त झाले. पूर्व बंगालचे गरीब मुसलमान स्त्री-पुरुष, सरकारी कारभारी, राजधानीचे उच्चवर्णीय नागरिक, सामाजातील नाना वर्गांकडे त्यांनी आपल्या विश्लषण दृष्टीने पाहिलं. लेखनातील शब्दलालित्य उल्लेखनीय आहे.

## ४. अन्नदाशंकर राय (१९०४ -)

जन्म चंकानल. आय. सी. एस. (१९२७), सेवानिवृत्त (१९५१), युरोपचा प्रवास (१९२७-२९), जपानचा प्रवास (१९५७), पश्चिम जर्मनी व इंग्लंडचा प्रवास (१९६३), साहित्य अकादमी पुरस्कार (१९६२). 'पथे प्रवाशे' (१९३१) या प्रवासवर्णनात्मक ग्रंथामुळे ख्यातिलाभ. सव्यसाची लेखक. 'सत्यासत्य' (१९३२-४२) आणि 'रत्न व श्रीमती' (१९५६-७३) या प्रसिद्ध कादंबऱ्या. सुमारे ४० लघुतम कथा लिहिल्या. दोन कथासंग्रह - 'गल्प' (१९६०), 'कथा' (१९७०). एकूण कथासंख्या सुमारे शंभर. विषयवैचित्र्य व बहुविधतेच्या दृष्टीने कथा उल्लेखनीय. वास्तवाचा शोध ही त्यांची कलासाधना. कथालेखनाचे दोन विभाग. पहिला विभाग १९३०-५६ आणि दुसरा विभाग (१९५९ च्या पुढे). 'मीन पियासी' ही दुसऱ्या विभागातील कलाकृती. प्रथम विभागात मानव जीवनाच्या बाह्य अंगाकडे लक्ष, दुसऱ्या विभागात अंतरंगाचा शोध. सुरुवातीला ओडिआ, इंग्रजी व बंगालीत लेखन. हल्ली फक्त बंगालीत सातत्याने लेखन. निवासस्थान - कलकत्ता.

## ५. प्रेमेन्द्र मित्र (१९०४ -)

'कल्लोल गोष्टी' चे नामवंत लेखक. कथा, काव्य, गीत, निबंध, पटकथा, बालसाहित्य इत्यादी साहित्याचे सर्व प्रकार यशस्वीरीत्या हाताळले. 'घनदा' आणि 'पराशर वर्माची कथा' या ललितकृतींनी आबालवृद्ध सर्वांनाच मुग्ध करून टाकलं. आयुष्यातला काही भाग काशीत गेला. अनेक प्रकारची कामं केली. आकाशवाणीच्या कलकत्ता केंद्राचे काही दिवस साहित्य-सल्लागार होते. अखेरीस साहित्यलेखनातच आयुष्याचे उद्दिष्ट सापडले. लेखनात मानव जीवनाप्रती अपार औढ आढळते. बाह्य जीवनाऐवजी आंतरिक मनाचा ठाव घेण्याकडे अधिक कल आहे. मनात खोलवर डोकावून पाहण्याची इच्छा असते. शरत् स्मृती पुरस्कार, रवीन्द्र स्मृती पुरस्कार (१९५८) साहित्य अकादमी पुरस्कार (१९५७) मिळाले आहे. 'पद्मश्री' पदवीही लाभलेली आहे.

## ६. सतीनाथ भादुडी (१९०६-१९६५)

घर पूर्णियात होतं. काही दिवस राजकारणही केलं. बिहार कॉंग्रेस क्षेत्रात विख्यात होते. ऑगस्ट चळवळीत भाग घेऊन तुरुंगवासही भोगला. कारावासातील त्या जीवनावर आधारित आपली पहिली कादंबरी लिहिली - 'जागर' या पहिल्याच कांदबरीने भरपूर प्रसिद्धी मिळवून दिली. याच कादंबरीला रवीन्द्र स्मृती पुरस्कार (१९५०) मिळाला. आणि मान्यवर लेखकांत गणना होऊ लागली. यांचं 'सत्यिभ्रमण काहिनी' एक असामान्य 'जर्नल' आहे. मनाच्या खोल तळात ते मुक्तपणे वावरतात. मानवीमनाच्या सूक्ष्मातिसूक्ष्म समस्या व भावनांच्या विश्लेषणात निपुण असलेले सतीनाथ लेखकांचे लेखक होते. 'ढोंडाइ चग्नि मानस' (दोन भाग) ला भारतीय कादंबरी वाङ्मयात अद्वितीय स्थान आहे

## ७. आशापूर्णादेवी (१९०९ -)

मानवी मनाच्या गूढ रहस्यांची उकल करण्यात आशापूर्णादेवी सिद्धहस्त आहेत. मानवी जीवनाविषयी त्यांना अपार सहानुभूती आहे. जगरहाटीतील अगदी सामान्याहून सामान्य माणसाचेदेखील बहुविध बहुरंगात चित्रण करण्यातील त्यांची हातोटी असामान्य आहे. विलक्षण आहे. लेखनातून त्यांनी आपला समाज व आपले कौटुंबिक जीवन अभिव्यक्त केले आहे. लीला पुरस्कार आणि रवीन्द्र पुरस्कार (१९६६) त्यांना मिळाले आहेत. अनेक कलाकृतींवर चित्रपटही निर्माण झाले आहेत. १९७७ साली भारतीय ज्ञानपीठाचे पारितोषिक त्यांना मिळाले.

## ८. सुबोध घोष (१९१० -)

असामान्य दमदार लेखक. कथा, कादंबरी व निबंध लेखनात सिद्धहस्त. विविध विषयांची गोडी आहे. सुरुवातीचे जीवन छोटा नागपूर विभागात गेले. त्यांच्या बऱ्याचशा ललितकृतींमध्ये या प्रदेशाची पार्श्वभूमी आहे. 'शतकिया' कादंबरी हे त्याचे सर्वोत्कृष्ट उदाहरण होय. विविध आणि व्यापक अनुभूतींमुळे यांच्या लेखनात विदग्धता आणि शिल्पकलेच्या नैपुण्याचे सुंदर सामंजस्य दिसून येते. जन्म जहारीबागमध्ये. सध्या कलकत्त्याच्या एका दैनिकाचे सहसंपादक. त्यांचे भाषाप्रभुत्व उल्लेखनीय आहे. आदिवासी जीवनापासून ते युद्धाशी संबंधित जीवनापर्यंत, नृतवापासून ते ललित कलांपर्यंत सर्व विषय त्यांनी यशस्वीरीत्या हाताळले आहेत. मानवी मनाच्या चोरकप्प्यांचे रहस्य उलगडून दाखवण्यात त्यांचा हात धरू शकणारे फार कमी आहेत.

## ९. नरेन्द्रनाथ मित्र (१९१६ -)

मितभाषी आणि मृदुभाषी नरेन्द्रनाथ यांच्या कथा, कादंबऱ्यादेखील एकप्रकारे त्यांच्या स्वभावाला अनुसरून अशाच आहेत. मध्यमवर्गीय जीवनाच्या चित्रणाकडे

त्यांनी विशेष लक्ष दिलेले दिसते. दुर्बोध मानवी मनाचे गूढ उकलण्यात आणि मनोविश्लेषण करण्यात त्यांनी आपल्या ज्या गहन अन्तर्दृष्टीचा परिचय दिला आहे ती उल्लेखनीय आहे. त्यांच्या समकालीन लेखकांचे त्यांच्याविषयी मत आहे, 'आमच्यापैकी नरेन्द्रनाथानेच सर्वात अधिक व्यापक व उत्कृष्ट कथा लिहिलेल्या आहेत.' कथानकाची मांडणी व व्यक्तिचित्रण यातून त्यांचे लेखनकौशल्य सहज दिसून येते. दैनिकाशी संबंध असून कलकत्त्यात राहातात. जन्मस्थान फरीदपूर.

## १०. नारायण गंगोपाध्याय (१९१८ -)

नरेन्द्रनाथ आणि नारायण गंगोपाध्याय दोघांनी एकाच वेळी साहित्यक्षेत्रात पाऊल ठेवलं. जन्मस्थान-दिनापूर कलकत्ता विश्वविद्यालयात बंगाली भाषा व साहित्याचे, प्राध्यापक होते. कथा, कादंबरी, काव्य, नाटक, पटकथा, निबंध, बालसाहित्य, गीत, वृत्तपत्रीय लेखन - सगळ्यातच प्रभुत्व. त्यांच्या लेखनातून बाह्यजगत व अंतर्जगत यात एकप्रकारचे सामंजस्य दिसून येते. त्यांचे लेखन रोमँटिक आहे, तसेच रिॲलिस्टिकही आहे. त्यांच्या लेखनाचा डोलारा काव्यमय भाषेवर उभारलेला असतो. मानवाइतकेच निसर्गालाही त्यांच्या लेखनात महत्त्व मिळाल्याने आढळते. ते एक रोमँटिक निसर्गवेडे आहेत; पण त्याचबरोबर समाजाचे कठोर टीकाकारही आहेत.

## ११. संतोषकुमार घोष (१९२० -)

नरेन्द्रनाथ मित्र व नारायण गंगोपाध्याय यांच्याबरोबरच साहित्य क्षेत्रात अवतीर्ण झाले. जन्म फरीपूरला. किशोरावस्था ओलांडली तेव्हापासून कलकत्त्यात रहात आहेत. शहरी जीवनाचे प्रामुख्याने चित्रण. ग्रामीण जीवनाविषयी कधी काही लिहिलं नाही. कथा, कादंबरी, नाटक, कविता, निबंध लेखनात सिद्धहस्त. असामान्य भाषाप्रभुत्व. त्यांच्या लेखनात 'फॉर्म' कडेही लक्ष दिलेलं असतं. शैलीलाही ते महत्त्वपूर्ण मानतात. मार्मिक, असामान्य कला त्यांना साध्य झालेली आहे. ते एक जागृत लेखक आहेत. काही दिवस दिल्लीत राहिले होते. संप्रती दैनिक वर्तमानपत्राचे सहसंपादक आहेत.

## १२. ज्योतिरिन्द्र नन्दी (१९१२ -)

युद्धोत्तर कालातील मध्यमवर्गीय व निम्नमध्यमवर्गीय जीवनाचे भाष्यकार. ते चिंतनशील लेखक आहेत. आणि मनोविश्लेषणाच्या बाबतीत त्यांनी आपला स्वतःचाच मार्ग चोखाळला आहे. त्यांची भाषाशैलीही विशिष्ट आहे. मानसिक आघात-प्रत्याघात यांचे चित्रण करण्यात ते निपुण आहेत. त्यांच्या कथांमधून फक्त समकालीन समाजातील वैगुण्यंच दाखवली जात नाहीत; तर मानवजीवनात दैवाचा

जो भाग आहे तो देखील दर्शविलेला आहे. या बाबतीतसुद्धा त्यांनी आपले आगळे वैशिष्ट्य राखले आहे.

## १३. समरेश बसु (१९२१ -)

नरेन्द्रानाथ, नारायण, संतोषकुमार यांच्याबरोबरच एका दमात ज्यांचं नाव घेतलं जातं ते लेखक आहेत समरेश बसु. ते नागरिक लेखक नाहीत. बांगलादेशच्या मातीचे आत्मीय लेखक आहेत-जीवनवादी. जन्मस्थान ढाका. आयुष्यात अनेक प्रकारची कामं केली. अखेर साहित्याला उपजीविकेचं साधन ठरवलं. मानवी जीवनाविषयीची त्यांची जिज्ञासा आणि सहानुभूती अपरिमेय आहे. त्यांच्या कथा-कादंबऱ्यांतून याचे पुरावे जागोजागी आढळतात. आपल्या कथांमधून त्यांनी फक्त मानवाचाच नव्हे, तर निसर्गाचाही परामर्ष घेतलेला आहे. 'कालकूट' या टोपणनावाने त्यांनी प्रवासवर्णनात्मक कथा लिहिलेल्या आहेत. गीते लिहितात, गातातसुद्धा. माणिक व ताराशंकर यांच्या पठडीतील समरेश बसूंनी आज आपले वेगळेपण स्थापित करण्यात यश मिळवले आहे. अनुभूतीच्या माध्यमाने त्यांनी जीवनाला ओळखलं आहे. या अनुभूतीशी गहन आंतरिकतेचा समन्वय साधला आहे.

## १४. विमल कर (१९१८ -)

चिंतनशील वृत्तीचे लेखक. विशिष्ट दृष्टिकोनातून त्यांनी जविनाकडे पाहिलं आहे. सुरुवातीला त्यांनी डॉक्टरकीचा अभ्यास केला होता. ते शिक्षण काही पुरं केलं नाही. पण त्या शिक्षणामुळे आलेल्या शल्यचिकित्सकाच्या निरासक्त दृष्टीचा आपल्या कथा, कादंबऱ्यांतून पुरेपूर उपयोग करून घेतला. बंगाली कथासाहित्यातील नव्या चळवळीचे प्रवर्तक. मनन व बुद्धी ही त्यांची हत्यारे आहेत. स्वतःच्या आवेगाला कधी आवर घातला नाही, पण आवेगाला कधी शरणही गेले नाहीत. बालपण हजारीबागला. संप्रती कलकत्त्याच्या एका विख्यात साहित्य पत्रिकेशी संबंध आहेत. जन्म चोवीस परगणा जिल्ह्यात झाला. जीवनाच्या निकट त्यांनी मृत्यूचे दर्शन केले आहे. जीवनचैतन्य व मृत्युबोध हे दोन्ही एकाच वेळी त्यांच्या कथाकादंबऱ्यांतून दिसून येतात कित्येक कथांवर चित्रपटनिर्मिती झाली आहे.

## १५. रमापद चौधुरी (१९२२-)

बंगाली कथासाहित्याचे आघाडीचे कथाकार. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी त्यांनी लेखनाला सुरुवात केली. जन्मस्थान खडगपूर. नोकरीसाठी काही दिवस छोटा नागपूर येथे वास्तव्य. कित्येक प्रकारच्या नोकऱ्या केल्यावर आता ते कलकत्त्याच्या एका दैनिकाच्या संपादकीय विभागात काम करीत आहेत. कधी काळी अरण्याच्या पार्श्वभूवर चांगल्या कथा लिहिल्या आहेत. आता बहुतेक नागरी जविनाशी संबंधित कथा, कादंबऱ्या लिहितात. त्यांच्या कथांवर चित्रपटही निर्माण झालेत. भाषेचे

लालित्य व वैभव उल्लेखनीय. विषयाच्या विविधतेकडे त्यांचं लक्ष आहेच, शिवाय 'ट्रीटमेंट' मध्येही ते दक्ष आहेत. आयुष्यात अनेक घाटांचं पाणी प्यायले, पण मनाने मात्र स्थितप्रज्ञच आहेत.

## १६. सैयद मुस्तफा सिराज (१९३० -)

स्वातंत्र्योत्तर कालातील त्या मानाने तरुण लेखकांत समावेश. जन्म मुर्शिदाबादच्या खेड्यात झाला. जीवनाचे विलक्षण ज्ञान. मुर्शिदाबादच्या फिरत्या नाटक मंडळीचे 'मास्तर' वा गीतकार होते (१९५०-५८), त्यापूर्वी वार्तहरचं काम करायचे (१९४९-५०), सध्या कलकत्त्याच्या एका प्रख्यात दैनिकात. ताराशंकरच्या शैलीत लेखनाला सुरुवात करून आपला स्वतःचा वेगळा मार्ग शोधून काढला. पहिली कथा 'देश' मध्ये लिहिली 'आलोबासा ओ डाउन ट्रेन.' सध्या लेखनावरच उपजीविका. बंगालच्या अगदी थेट गावातल्या लोकांना जसं त्यांच्या कथांमधून स्थान मिळालं आहे तसंच शहरच्या लोकांनाही आहे. समाजाभिमुख लेखन खूप लिहीत असतात.

## १७. मति नन्दी (१९३२.-)

उत्तर कलकत्त्याच्या एका प्रतिष्ठित घराण्यात जन्म. ऑटोमोबाइल इंजिनीअरिंगमध्ये डिप्लोमा मिळवला आहे. दोन वर्षं स्टेट ट्रान्स्पोर्टमध्ये प्रशिक्षण घेतल्यावर पत्रकारितेकडे वळले. सध्या कलकत्त्याच्या एका दैनिकातील क्रीडा विभागाचे संपादक आहेत. क्रिकेटची आवड. क्रिकेटवर तीन पुस्तके लिहिली आहेत. 'छाद' (छत) नावाची कथा 'देश' मध्ये प्रसिद्ध झाल्यावर (१९५६) वाचकांचे लक्ष त्यांच्याकडे वेधले. लेखनाशैली ऋजू आहे. विपुलता थोडी कमीच. भक्कम जमिनीवर उभे राहून मानवाप्रती विश्वास कायम राखणे हा त्यांचा स्वभाव आहे. मध्यमवर्गीय व निम्नमध्यवर्गीय जीवनाचे चित्रांकन करणारे निपुण कथाकार.

## १८. सुनील गंगोपाध्याय (१९३४ -)

जन्मस्थान - फरीदपूर. कवी आणि कथाकार. 'देश' मध्ये प्रसिद्ध झालेल्या. 'एकटि कविता' ने वाचकांचे लक्ष वेधून घेतले. कवी सुनील अधिक लोकप्रिय आहे की कथाकार सुनील हे सांगणे कठीण आहे. अनेक तऱ्हेच्या नोकऱ्या केल्या. सध्या कलकत्त्याच्या एका दैनिकात काम करतात. युरोप व अमेरिकेचा दौरा केला आहे (१९६३ साली). खूप लिहितात. त्यांच्या काही कथांवर चित्रपटही निघाले आहेत. बदललेल्या मध्यमवर्गीय जीवनातील अनेक संवेदना व अनुभवांना सहृदयपणे कुशलपूर्वक कथेच्या माध्यमाने व्यक्त केले आहे. भाषेचं लालित्य अभिव्यक्तीची शैली आणि मनाची पकड घेणारे कथानक यामुळे सुनीलला लोकप्रियता मिळाली आहे.

## १९. प्रफुल्ल राय (१९३४-)

जन्म - ढाका. प्रादेशिक जीवनावरील कादंबरी लेखनाने साहित्यिक जीवनास सुरुवात केली. 'देश' मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'पूर्वपार्वती' कादंबरीने त्यांना आघाडीवर आणून बसवलं. त्यांच्या विख्यात कादंबरी 'कोयापातार नौको' (केवड्याच्या पानाची नाव) मध्ये वर्तमान बंगाली जीवनाचा आलेख आहे. सध्या कलकत्त्याच्या एका दैनिक पत्राच्या संपादकीय विभागात आहेत. त्यांच्या कित्येक कलाकृतींवर चित्रपट निघाले आहेत. मनापासून सहृदयपणे लेखन करतात. कथानकाची मांडणी व व्यक्तिचित्रण दोहोंवर समान प्रभुत्व.

## २०. शीर्षेन्दु मुखोपाध्याय (१९३५ -)

जन्म मैमनसिंह (बांगला देश) येथे. अध्यापक. १९५९ साली 'देश' मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'जलतरंग' कथेने ख्याती मिळवून दिली. आतापर्यंत दोन कादंबऱ्या आणि पन्नासहून अधिक कथा लिहिल्या आहेत. त्यांच्या कथाकादंबऱ्यांमधून वास्तवता व अन्तर्मनातील संघर्ष दिसून येतो. शीर्षेन्दूच्या कथांमधून अनिश्चितता नसते; तर स्थिर विश्वास, अस्तित्व बोध आणि अवचेतनाविषयी आस्था आहे. सुसंबद्ध शैलीतील आपल्या कथांमधून ते अन्तर्मनातील सत्याचा गहन शोध घेतात.

## २१. देवेश राय (१९३६ -)

जलपैगुडीच्या ए. सी. कॉलजातील बंगाली विभागाशी निगडित. सहाव्या दशकाच्या बंगाली कथा चळवळीचे अग्रगण्य लेखक. पहिला कथासंग्रह 'देवेश रायेर गल्प' १९६९ साली प्रसिद्ध झाला आणि पहिली कादंबरी या वर्षी प्रसिद्ध होणार आहे. मोजकेच लिहून विपुल ख्याती मिळवली आहे. १९५५ साली 'देश' मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'हाड काटा' कथेने वाचकांच्या नजरेत भरले. आजवर ७० हून अधिक कथा लिहिल्या आहेत.

Printed by Bharat Mudranalaya, Shahdara, Delhi-110032